आंतरभारतीय पुस्तकमाला

# कथा भारती
# मल्याळम लघुकथा


लेखक

ओमचेरी एन. एन. पिल्लै

अनुवादक

सुनील सुभेदार





नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

# भूमिका

जवळ जवळ गेल्या तीस वर्षांपासून कथा हा मल्याळममधील सर्वांत प्रभावशाली आणि विकासोन्मुख वाङ्मयप्रकार आहे. विद्वान समीक्षकांच्या मते तो इतका विकसित आणि समृद्ध आहे की त्याची तुलना जगातल्या कोणत्याही कथासाहित्याशी होऊ शकते. राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय स्पर्धांत मल्याळम कथा सर्वोत्कृष्ट म्हणून घोषित केली गेली आहे. स्पर्धेव्यतिरिक्तही देश-कालाचे बंधन झुगारून देऊन आपली विश्वात्मकता शेकडो कथा सिद्ध करतात.

मल्याळम कथेच्या प्रगतीमागे दीर्घ प्रयत्नांचा इतिहास आहे. पाश्चात्य साहित्याशी उत्तम परिचय असणाऱ्या प्रतिभाशाली मल्याळी लेखकांनी या भाषेतील कथेचा पाया या शतकापूर्वीच घातला. वॉशिंग्टन इर्विंग, नॉथेनील हॉथॉर्न आणि एडगर ॲलन पो यांना डोळ्यांपुढे ठेवून त्यांनी वाचकांच्या मनोरंजनासाठी ऐतिहासिक आणि सामाजिक कादंबऱ्यांची रचना केली. या साहित्यकृतींनी काळाची मागणी पूर्ण केली; व त्यामुळे त्यांना शीघ्र प्रसिद्धी आणि लोकप्रियता मिळाली. समकालीन सामाजिक परिस्थितीचे यथार्थ चित्रण घडवील अशा प्रकारची कथावस्तू किंवा घटनांचे असे वर्णन या कथांत असावे याची जाणीव ना लेखकांना होती ना वाचकांना ! आजच्या मानवद्वेष्टया वातावरणात त्यांचे साहित्य निःसत्त्व वाटत असले तरी मल्याळम भाषेतील सुरुवातीच्या साहित्याचे परिशीलन करता किंवा अन्य भाषांतील कथावाङ्मयाचा विकास पाहता या मार्गदर्शक लेखकांची कामगिरी सर्व दृष्टींनी उल्लेखनीय ठरते ही गोष्ट स्पष्ट होते. मूर्कोथ कुमारन, वेंगायिल कुंजिरामन नायनार, ओडुविल कुंजिकृष्ण मेनोन, एम. आर. के. सी., अम्बाडी नारायणन पोदुवाल, के. सुकुमारन, सी. एस. गोपाल पणिक्कर, एस. रामवारियर आणि ई. वी. कृष्णपिल्लै इत्यादी लेखकांना मल्याळम कथेची पूर्वपीठिका तयार करण्याचे श्रेय दिले पाहिजे.

आधुनिक मल्याळम कथेचा आरंभ 1930 सालापासून होतो. तेव्हाचे तरुण साहित्यिक कार्ल मार्क्स, सिगमंड फ्रॉईड आणि फ्रेंच साहित्य यांनी मंत्रमुग्ध झालेले

होते. विश्वसाहित्याच्या नव्या रूपांच्या परिचयाने आणि सखोल अभ्यासाने त्यांना सामाजिक चळवळीत भाग घेण्याची प्रेरणा दिली आणि त्यांनी आपली प्रतिभा मानवाचे माहात्म्य वाढवण्यासाठी व त्याच्या उन्नतीच्या मार्गातील अडथळे दूर करण्यासाठी राबवावयाला प्रारंभ केला. साहित्यिकाचे स्थान हस्तिदंती मनोरा हे नसून जीवनाच्या प्रत्यक्ष संघर्षांत आहे, याची जाणीव त्यांना झाली होती. वास्तववादी जीवनाची ओळख पटल्याने साहित्यिकांच्या दृष्टिकोनात आमूलाग्र परिवर्तन घडून आले. सामाजिक परिस्थितीविरुद्ध त्यांचे मन बंड करून उठले व त्याने लेखकाच्या भाषेला जखडून टाकणारी संकुचितपणाची बंधने तोडून नष्ट केली. या लेखकांनी आर्थिक विषमता, जमीनदारीचे दडपण, धार्मिक अंधश्रद्धा आणि राजकीय अन्याय यांच्याखाली भरडल्या जाणाऱ्या लोकांच्या प्रश्नांना तोंड फोडले.

या क्रांतीच्या भावनेतून मल्याळम साहित्यात नवे युग अवतरले आणि साहित्यिकांचा एक वर्ग आपल्या अनुभूती अधिकच नेटक्या भाषेत उच्च कलात्मक रीतीने मांडू लागला. तकषी शिवशंकर पिल्लै, पी. केशवदेव, पोन्कुन्नम वर्की आणि वैक्कम मुहम्मद बशीर यांच्या तुफानी व्यक्तित्वाने मल्याळम साहित्य घुसळून टाकले.

भूतकाळाचे सिंहावलोकन करताना आपल्या ध्यानात येते की हे मार्गदर्शक साहित्यिक निर्माण झाले तेव्हा समाजाला नवी दिशा व नवी दृष्टी देण्याची फार आवश्यकता होती. वर्णाश्रमव्यवस्था आणि जमीनदारी पद्धत यांवर बहुजनसमाजाची अंधश्रद्धा असल्यामुळे वरिष्ठ वर्गांचे चांगले फावले. वेदनेच्या चरकात पिळल्या जाणाऱ्या बहुजनसमाजाने क्रांतीची ध्वजा उभारणे अवश्य होते; कमीत कमी आपले शोषक कोण आहेत याची जाणीव त्यांना सुधारकांनी करून द्यायला हवी होती. ते महान कार्य या लेखकांनी केले.

सामान्य जनतेच्या आर्थिक आणि सामाजिक शोषणाकडे कोणत्याही राजकीय चळवळींचे लक्ष तोपर्यंत गेले नव्हते. समाजसुधारक आपल्या कार्यात मग्न होते व त्यांच्या कार्यामुळे अवनतीची मूळ कारणे शोधली न जाता उलट समाजाचा तेजोभंग मात्र झाला. त्यामुळे साहित्यिकांवरील जबाबदारी अधिकच वाढली होती.

या लेखकांचे स्वागत करावयाला केरळमधील वाचक वर्ग उत्सुक होता, भाषा व साहित्य यांविषयी लोकांमध्ये फार रुची निर्माण झाली होती व कलेसाठी कला, हे ब्रीद बाळगून लेखन करणाऱ्यांचे साहित्य आवडीने वाचले जात होते. पण यांत प्रतिबिंब उमटले होते ते फक्त वरिष्ठ वर्गाचे. या सुमारास मल्याळममध्ये अनेक नियतकालिके प्रकाशित झाली ती विशेषतः साहित्यविषयक होती.

सामान्य जनतेच्या भावना आणि जीर्ण रूढींवरील प्रखर टीका तकषी यांच्या साहित्यात दिसते. केशवदेव यांना मजूर संघटनांत जे अनुभव आले होते, त्यांच्या आधारावर त्यांनी शोषण आणि दमन यांविरुद्ध लेखणी चालवली –– धारदार शब्द आणि टोचणारी शैली. पोन्कुन्नम वर्की स्वत: कॅथॉलिक असले तरी त्यांनी कॅथॉलिक समाजांतील दुष्प्रवृत्तींकडे आणि भ्रष्टाचाराकडे क्षमाशील दृष्टीने पाहिले नाही. उलट, त्या समाजातील सभ्यतेचा मुखवटा फाडण्यात आनंद मानला. हेच धाडस ललितांबिका अंतर्जनम यांनी दाखविले. त्यांचा जन्म ज्या नंबुतिरी समाजात झाला, त्याचे दोषाविष्करण त्यांनी प्रभावी रीतीने केले. वैक्कम मुहम्मद बशीर यांनी मुस्लिम बांधवांना अज्ञानातून मुक्त करण्याचा आणि राजकीय दडपशाहीतून सोडवण्याचा प्रयत्न केला. कारूर नीलकंठ पिल्लै यांनी सामान्य जनतेच्या आशा-आकांक्षा अत्यंत भावपूर्ण शब्दांत रेखाटल्या. इतर लेखकांनीही सामाजिक अन्यायांविरुद्धच्या या धर्मयुद्धात भाग घेतला.

या लेखकांनी आपली सर्जनशील प्रतिभा सामाजिक दोषांचे अन्वेषण करण्यासाठीच केवळ राबविली असे नव्हे, तर जीवनातील समस्या आणि मानवी जीवनांतील तीव्र संघर्ष यांचाही त्यांनी साहित्यातून परामर्ष घेतला. या बाबतीत एस. के. पोट्टेकाट आणि पी. सी. कुट्टिकृष्णन यांची नावे उल्लेखनीय आहेत.

वेट्टूर रामन नायर, ई. एम. कोवूर, नागवल्ली आर. एस. कुरूप, सरस्वती अम्मा, पोंजिक्करा राफी या आणि इतर लेखकांनी मल्याळम कथा-साहित्य समृद्ध केले. भावदर्शन आणि भाषाशैली या बाबतीत यांतील काही लेखक इतर कोणापेक्षाही कनिष्ठ नाहीत. मल्याळम कथासाहित्य त्यामुळेच इतर वाङ्मय–प्रकारांपेक्षा अधिक समर्थ झाले आहे.

केरळातील पुरोगामी लेखकांच्या आंदोलनाप्रमाणेच साहित्यातही उत्थानाचे आणि पतनाचे दिवस आले. लेखकांची सामाजिक बांधिलकी वाचकांना काही काळ अतिशय आकृष्ट करायची तर नंतर तिची अवहेलना करावीशी वाटायची. सामाजिक बांधिलकीचा सिद्धांत कधीकधी इतका ताणला गेला की लेखनकला, शिल्पकला, यांची कुत्सा होऊ लागली. आधुनिक जागतिक साहित्याचाही प्रभाव पडतच होता. सर्जनशील साहित्य निर्माण करण्याच्या आपल्या इच्छेवर कोणत्याही प्रकारची बंधने घालून घ्यायला लेखक तयार नव्हते. समाजाचे वरपांगी चित्रण करण्यापेक्षा अंतरंगाचे स्वरूप रंगवण्याला त्यांच्यापैकी काहीजण प्रवृत्त झाले. मानवी मनाला ग्रासणाऱ्या असंतोष, अतृप्ती व अस्वस्थता या भावना व्यक्त करण्याला त्यांनी प्राधान्य

दिले. कथेतील घटना कालानुक्रमाने सांगण्यापेक्षा चित्तवृत्ती आणि वातावरण यांच्या द्वारे जीवनातील अनुभवांचा वाचकांना परिचय करून देणे ते श्रेयस्कर मानू लागले. कथेचा सनातन घाट व तंत्र त्यांना अपुरे वाटू लागले. नव्या लेखकांचे आदर्श सॉमरसेट मॉम, स्टाईन बेक यांसारखे लेखक नव्हते. ते आता जेम्स जॉईस, काफ्का आणि कामूकडे वळत होते. व्हर्जिनिया वूल्फ, मार्सेल प्राउस्ट यांच्याकडे कलले आणि ते चेतना-प्रवाहाच्या (स्ट्रीम ऑफ कॉन्शसनेस) तंत्राकडे वळले. त्यामुळे कथेतून कथानक हद्दपार झाले. या कथेतून अस्वस्थतेशिवाय दुसरे काही पदरात पडत नाही.

तरीही कथेची ही नवी धाटणी महत्त्वशून्य होती, असे काही म्हणता येणार नाही. या लेखकांनी समकालीन वातावरण आणि अस्मिता यांचे निरीक्षण काळजीपूर्वक केले आहे. नवीन पिढीच्या या कथांवर एक आक्षेप वारंवार घेतला जातो की त्या अस्पष्ट आणि अश्लील आहेत. अर्थात अपवाद आहेतच.

एम. टी. वासुदेवन नायर, टी. पद्मनाभन, के. टी. मुहम्मद, पारप्पुरत्तु, नंदनार, माधविकुट्टी, कोविलन, एम. पी नारायण पिल्लै, काक्कनाटन, एम मुकुंदन, वी. के. एन., ओ. वी. विजयन, एन. पी. मुहम्मद, पुतूर उण्णिकृष्णन, मलयाट्टूर रामकृष्णन आणि जी. विवेकानंदन हे या पिढीतले महत्त्वपूर्ण आणि प्रतिभाशाली लेखक आहेत.

मल्याळम कथासाहित्याचे प्रतिनिधित्व या संग्रहाइतके दुसरा कोणताही संग्रह करू शकत नाही. संकलकाचे काम अत्यंत कठीण तर असतेच, शिवाय ते वैयक्तिक अभिरुचीने नियंत्रित होते. एका लेखकाच्या अनेक चांगल्या कथांतून एक निवडणे अधिकच जिकिरीचे असते. त्यामुळे संकलकाचा निर्णय वैयक्तिक अभिरुचीकडे अधिकच झुकतो. उदाहरणार्थ, मल्याळम साहित्यातील आरंभीचे कथाकार या संग्रहात अंतर्भूत करण्यात आले नाहीत. कारण, त्या कथांचे विषय आता जुने झाले आहेत. आधुनिक काळातीलही काही जुन्या, फार जुन्या नसलेल्या, लेखकांच्या कथा स्थलाभावामुळे समाविष्ट करता आल्या नाहीत. हा संग्रह वाचकात मल्याळम साहित्याविषयी अभिरुची उत्पन्न करील, अशी आशा वाटते. इतर प्रतिभाशाली लेखकांचे साहित्य असलेले संग्रह प्रसिद्ध होणे, हे आता त्यांच्या मागणीवरच अवलंबून आहे.

—— ओमचेरी एन. एन. पिल्लै

# अनुक्रमणिका

# भावी पती

—पी. केशवदेव

भावी पती श्रीमंत, सुंदर विद्वान आणि यशस्वी असला पाहिजे. रजनीलाही असेच वाटत होते. घरात तिच्या लग्नाचा विषय निघाला, तेव्हा तिने सर्वगुणसंपन्न पतीची एक सुंदर मूर्ती आपल्या मनावर कोरून घेतली.

भावी पती कसा असला पाहिजे हाच शाळेतल्या सगळ्या मैत्रिणींच्या गप्पांचा विषय असे. पद्माक्षीला आपला नवरा वकील असावा असे वाटते तर नलिनीला पोलीस इन्स्पेक्टरशी लग्न करायचे आहे. इन्स्पेक्टरच्या मानमरातबाचे वर्णन ती अधिकच फुगवून करते आणि आपल्या म्हणण्याला बळकटी आणते. उलट, न्यायाधीशाशीच लग्न करावयाचे असे लीलावतीने पक्के ठरवले आहे. न्यायाधीशाच्या गुणांचे वर्णन करण्यात ती एकदा रंगली की तिच्या मुद्रेवरील भाव बिलकुल न्यायाधीशाच्या बायकोसारखे दिसत. आपला भावी पती दुसरीच्या भावी पतीपेक्षा कोणत्याही बाबतीत कनिष्ठ असावा हे त्यांच्यापैकी कोणालाच सहन होण्यासारखे नव्हते. त्यामुळे या विषयावर चर्चा करीत असताना त्या कधीकधी भांडायच्या. मुलींच्या आवडींना सुस्पष्ट रूप येते ते या रीतीनेच.

मैत्रीणींशी हुज्जत घालीत नलिनी म्हणाली, " पोलीस इन्स्पेक्टर दिसल्याबरोबर सगळे थरथर कापू लागतात. "

उत्तरादाखल लीलावती म्हणाली, " न्यायधीश अपराध्याला फाशीचीसुद्धा शिक्षा देऊ शकतो, हे तर तुला माहीतच आहे. "

तेवढ्यात पद्माने मधेच तोंड घातले, " वकील नसेल, तर इन्स्पेक्टर आणि न्यायाधीश करूच काय शकतील ! "

शेवटी सरोजिनी म्हणाली. " माझे पती सुसंपन्न, विद्वान आणि सुंदर असतील. त्यांच्यासमोर सगळे कुत्र्या-किड्यांसारखे क्षुद्र वाटतील. सगळा समाज माझ्या पतीचा आदर-सत्कार करील. "

भावी पती सुंदर असला पाहिजे या बाबतीत मात्र सर्व मैत्रिणींचे एकमत होते.

सगळ्या मैत्रिणींत पहिल्यांदा चर्चा सुरू झाली ती नलिनीच्या लग्नाची. तिने ही बातमी सगळ्या मैत्रिणींपासून लपवून ठेवली होती. लग्न पक्के झाल्यावर तिने शिक्षण सोडले. शिक्षण का सोडले याची उत्सुकतेने चौकशी करायला गेल्या तेव्हा तिच्या मैत्रिणींना लग्नाची बातमी कळली. हेही समजले की तिचा भावी पती कोण-त्याशा कारखान्यात अवघ्या तीस रुपये महिन्यावर मुनीम आहे. सुंदर नसेल, पण फारसा कुरूपही नव्हता.

लग्नाला लीलावती, सरोजिनी, पद्माक्षी वगैरे सगळ्या मैत्रिणी आल्या. त्यांना वाटत होते की मनाजोगता पती न मिळाल्यामुळे ती दु:खी असेल. पण ती प्रफुल्लित होती. मग त्यांनी विचार केला, ' ती गंमत म्हणून सगळे बोलत असावी. '

लीलावतीने अखेर तिला विचारलेच, " बिचाऱ्या मुनिमाची बायको व्हायला तुला आवडलं ?"

" आपली आवडनिवड कोण विचारतो ? " नलिनीने उत्तर दिले, " तरीही जो कुणी मला मिळत आहे, त्याचा आनंदानं स्वीकार करावा, हेच अखेर योग्य नाही का ?"

नलिनीला पद्माक्षी म्हणाली, " तुला पोलीस इन्स्पेक्टर मिळू शकला असता. मग तू मुनिमाशी का लग्न करतेस ?"

किंचित दु:खी आवाजात नलिनी म्हणाली, " हा सगळा भाग्याचा खेळ आहे. आपण ठरवतो एक अन नशिबात लिहिलेलं असतं भलतंच. "

नशिबाच्या गोष्टी ऐकून सरोजनीला राग आला. ती म्हणाली " नशिबाला कशाला बोल लावतेस ! आम्ही जो विचार पक्का करतो तो प्रत्यक्षात उतरविण्याचं सामर्थ्यही आमच्यात आहे. फक्त वाट पाहायची तयारी हवी. तू पहाशीलच आमचं लग्न आमच्या इच्छेप्रमाणं होईल. "

नलिनी निग्रही आवाजात म्हणाली, " माझी परिस्थिती कशीही असली तरी मी संतुष्ट राहण्याचा प्रयत्न करीन. "

यानंतर त्यांचा वादविवाद थांबला आणि मैत्रिणींनी शुभेच्छा व्यक्त केल्यावर नलिनीचा विवाह पार पडला. समारंभानंतर सगळ्या मैत्रिणी आपापल्या घरी निघून गेल्या.

## २

नलिनीचा विवाह झाल्यावरही सरोजिनी, पद्माक्षी, लीलावती वगैरे मैत्रिणी एकत्र

शाळेत जात राहिल्या आणि भावी पती या विषयावर वादविवादही करीत राहिल्या. नलिनीप्रमाणे आपण जाळ्यात अडकावयाचे नाही की नशिबापुढे मान तुकवायची नाही अशी त्यांनी प्रतिज्ञा केली. त्या सगळ्यात बुद्धिवादी कोणी असेल, तर ती पद्माक्षी होती. ती म्हणाली, "आपल्या परिस्थितीप्रमाणं नलिनीनं योग्य तेच केलंय. मोठमोठ्या प्रतिज्ञा पूर्ण झाल्याच पाहिजेत, असं काही नाही."

पद्माक्षीच्या बोलण्याचा सरोजनीला राग आला. ती विरोध करीत म्हणाली, "पद्माक्षी, कशा पोकळ गोष्टी बोलतेस ! आमच्यात काय कमी आहे ! – शिक्षण कमी नाही की सौंदर्य कमी नाही !"

सरोजिनीचा विचार लीलावतीला पूर्णतः मान्य होता. ती म्हणाली, "आमचे शिक्षण अन रूप पहाता आमची अपेक्षा अगदी सामान्य आहे."

तरीही त्यांची चेष्टा करीत पद्माक्षी म्हणाली, "भगिनींनो, आजकाल शिक्षण अन रूप यांना कोण विचारतो ? व्यवहार फक्त पैसा जाणतो, म्हणूनच जग संपत्तीच्या मागं धावतं. पैशापुढं सगळं व्यर्थ आहे. आमच्यापेक्षा कितीतरी अधिक शिकलेल्या सौंदर्यवती अविवाहित पडलेल्या आहेत."

आपला राग पद्माक्षीवर काढीत सरोजिनी म्हणाली, "तू श्रीमंत आहेस, म्हणूनच संपत्तीची बाजू घेतेस. श्रीमंतीमुळं तू घमेंडखोर झालीयस. तुझी श्रीमंती तुलाच लखलाभ असो. आम्ही गरीब असलो तर काय झालं ? आम्हांलाही इच्छा आहेत, अपेक्षा आहेत. आमच्या अपेक्षेप्रमाणं आम्हांला नवरा मिळाला नाही, तर आम्ही अविवाहितच राहू."

यावर पद्माक्षी काही बोलली नाही.

सरोजिनीने प्रतिज्ञा केली की, "मला वरमाला घालायला वकील मिळाला नाही तर मी दुसऱ्या कुणाला वरणार नाही."

आपल्या भावी पतीच्या सहवासाचा आनंद सरोजिनीला कधीकधी मनोराज्यात गुंग झाल्यावर मिळावयाचा आणि आपण त्याच्याबरोबर हिंडत आहोत, लोक आपला आदर-सत्कार करीत आहेत, असा तिला भास व्हायचा. तिला स्वप्न पडावयाचे— 'वकीलसाहेबांकडे खूप लोक आपल्या अडचणी घेऊन येतील. क्वचित ते नसताना आपल्यालाही निर्णय देण्याची संधी प्राप्त होईल ... न्यायाधीश, इन्स्पेक्टर वगैरे मंडळी माझ्या यजमानांशी अदबीनं वागतील... स्त्रियांना माझा पती पाहून हेवा वाटेल पण त्यांचे हात तिथपर्यंत पोचणार नाहीत. ते माझे एकटीचे असतील !'

सरोजिनीला कोणतीच मैत्रीण विरोध करीत नसे. ती विचार करायची,

' माझं लग्न होऊच द्या, या सगळ्या माझ्यापुढं मान झुकवतील. '

एक वर्ष गेले. तिघी मॅट्रिक झाल्या. कॉलेजात जायची इच्छा सगळ्यांनाच होती; पण सरोजिनी आणि लीलावतीची आर्थिक स्थिती कॉलेजात प्रवेश घेण्याइतकी अनुकूल नव्हती.

सरोजिनीचे वडील सामान्य शेतकरी होते. खूप मेहनत करून ते घर चालवीत होते. सरोजिनीला मॅट्रिकपर्यंत शिकवणेच त्यांना फार जड गेले होते. आता तर सरोजिनीचे दोन भाऊही हायस्कूलपर्यंत पोचलेले होते. सरोजिनीचे कॉलेज आणि भावंडांची इंग्रजी शाळा यांचा खर्च वडिलांच्या आवाक्याबाहेर होता. तिला कॉलेजात पाठविले, तर घरी उपासमारीची वेळ येईल.

सरोजिनीचे आई-वडील विचार करीत – ' मुलगी मॅट्रिक झाली, आता आणखी शिकवण्याचा काय उपयोग ? आता तिचं लग्न करून टाकणंच योग्य. ' आपल्या शिक्षित, सुंदर मुलीला वकील पती मिळेल अशी तिच्या वडिलांचीही अपेक्षा होती आणि तिचे लग्न थाटामाटात करण्याची मानसिक तयारीही त्यांनी ठेवलेली होती. सरोजिनीची आई म्हणे, ' मोठेपणाच्या गोष्टी राहू देत. आपली परिस्थिती ध्यानात घेऊन एखाद्या सामान्य स्थळी लग्न जुळवावं अन मुलगी उजवून टाकावी हेच योग्य. ' सरोजिनीला आईचे विचार खपत नसत. ती अप्रत्यक्ष विरोध करीत म्हणे, " ओह ! आईची तर इच्छा दिसते की मी ..."

पद्माक्षीचे वडील धनाढ्य आहेत. ते आपल्या मुलीला उच्च शिक्षण सहज देऊ शकतात, पण तरीही त्यांनी पद्माक्षीसाठी वरसंशोधनाला सुरुवात केली. त्यांच्या प्रयत्नांना लवकरच यश आले. एक देखणा एंजीनियर युवक त्यांनी पद्माक्षीसाठी निवडला. तो तरतरित तरुण पद्माक्षीला पहायला आला. आपल्या सुसंस्कृत वर्तनाने त्याने सगळ्यांना प्रभावित केले. त्याच दिवशी सरोजिनी आणि लीलावती पद्माक्षीला भेटायला आल्या. तो नवयुवक पद्माक्षीला अनुरूप आहे, हे सगळ्यांनाच एकदम मान्य झाले. लीलावतीलाही तो आवडला. तिने सरोजिनीचे मत जाणण्याचा प्रयत्न केला, पण सरोजिनी ' हूं ' म्हणून गप्प राहिली.

लीलावती म्हणाली, " पद्माक्षीला वकिलाशी लग्न करायचं होतं पण एंजीनियरचं वकिलापेक्षाही चांगलं स्थळ तिला मिळालं. ती भाग्यवान आहे. "

सरोजिनी म्हणाली, " यात भाग्याचा काय संबंध ? आम्हांला याहीपेक्षा चांगलं स्थळ मिळेल. "

दोघींनी पद्माक्षीचा निरोप घेतला.

सरोजिनीने घरी पोचल्यावर विचार केला तेव्हा तिला मनोमन पटले की पद्-माक्षीने उत्तम नवरा पटकावला आहे. पण तरीही तिने आपली स्वतःची समजूत काढली की त्याची प्रकृती नाजूक आणि बुद्धी प्रगल्भ असली तरी माझ्यासाठी मी त्याला होकार दिला नसता. तिला खात्रीने वाटले— ' माझा पती यापेक्षाही योग्य अन् सुंदर असेल. त्याच्या तुलनेत इतर वर तुच्छ आहेत. ' ती अहोरात्र आपल्या पतीच्या सहवासाच्या मनोराज्यात गुंग राहायची. कधी तिला भास व्हायचा की एक सुंदर नवयुवक तिच्याकडे प्रेमाने पहात आहे. तो आकर्षित झालेला पाहून ती त्याच्या दिशेने चालू लागली तसा तो एकदम अदृश्य झाला. स्वप्नात ती त्याला हाक मारी; पण त्याच क्षणी डोळे उघडत आणि कठोर वास्तवाचा आघात तिला सहन करावा लागे. पण ती निराश झाली नाही. तिने पापण्या मिटून घेतल्या. त्याच क्षणी तिचे अराध्य दैवत तिला काही अंतरावर दिसले. ती हळुहळू त्याच्याकडे सरकू लागली.

पद्माक्षीचा विवाह थाटामाटात पार पडला. सासरी जाताना ती सरोजिनीच्या घरावरून गेली. त्या वेळी सरोजिनी दारातच उभी होती. पद्माक्षी आपल्या पतीच्या मागोमाग कलहंसगामिनीसारखी चालली होती. हे दृश्य सरोजिनीला असह्य झाले पद्माक्षीने सरोजिनीजवळ जाऊन तिचा निरोप घेतला आणि नियमित पत्र-व्यवहाराबरोबरच तिच्या लग्नाची बातमीही लवकरच कळावी अशी अपेक्षा. व्यक्त केली.

" हूं ! " सरोजिनी उत्तरादाखल म्हणाली. पद्माक्षी प्रसन्न चित्ताने निघून गेली. सरोजिनीच्या नेत्रातून दोन अश्रू टपकले.

## ३

त्या नाजूक देखण्या तरुणाच्या सहवासाच्या मनोराज्यात रंगून जाणे हाच आजकाल सरोजिनीचा एकच उद्योग असतो. ती सुशिक्षित शिवाय सुंदर असल्यामुळे स्वयंपाक करणे हे आपले काम नाही असे ती समजत असे. अन्न शिजल्यावरच ती स्वयंपाकघरात डोकावी. स्नान झाल्यावर कुंकू लावण्यासाठी आरसा हातात घेतला की आपल्याच सौंदर्याच्या अवलोकनात तिचे भान हरपे. मन तृप्त झाल्यावर पलंगावर पडल्या पडल्या ती इंग्रजी पुस्तक हातात घेई पण मन कुठल्याकुठे भरकटत जाई.

शेजारणी सरोजिनीच्या आईला म्हणत, " मुलीला घरकाम शिकवणार नसाल, तर लग्नानंतर तिचं कसं निभेल ? "

आई उत्तर देई, "ती शिकलेली आहे, काम कशी करील! लग्न झाल्यावर स्वतःच शिकून घेईल. वडिलांची लाडकी आहे. तिला कामं सांगितली, तर त्यांना राग येतो."

असेच काही महिने गेले. अनेक ठिकाणी सरोजिनीच्या विवाहाचा विषय निघाला. एका विमा-एजंटाने, न्यायालयांतल्या पेशकाराने आणि एका व्यापाऱ्याच्या मुलाने तिला पसंत केले. सरोजिनीच्या आई-वडिलांनी त्या तिघांचाही आदर-सत्कार केला व त्यांतल्या कुणा एकाची निवड करण्याबद्दल सरोजिनीला सुचविले; पण सरोजिनीला त्यांतला कोणीच पसंत पडला नाही.

अखेर सरोजिनीच्या विवाहाचा विषय मागे पडला. सरोजिनी आईला म्हणाली, "या तऱ्हेच्या लोकांबरोबर माझं लग्न ठरवलं, तर मी जीव देईन."

सरोजिनीच्या घराजवळ एक प्राथमिक शाळा आहे. तिथे एका नव्या अध्यापकाची नेमणूक झाली. त्याचे नाव एम. आर. मुट्टम. वर्तमानपत्रांतून त्याच्या काही कविता प्रसिद्ध झाल्या आहेत. आजकाल ते सरोजिनीच्या शेजारीच रहातात. सरोजिनी स्नानाला निघाली की ते एकटक तिच्याकडे पहात. कधीकधी सरोजिनीची उदास नजरही त्याच्यावर पडे.

एका संध्याकाळी मुट्टम सरोजिनीच्या घरी आला आणि आईशी गप्पागोष्टी करू लागला. सरोजिनीही संभाषणात सामील झाली. त्याने आपल्या गूढगुंजनात्मक प्रेमकविताही वाचून दाखविल्या. सरोजिनीने खूप प्रशंसा केली.

आता अध्यापक तिच्या घरी जाऊयेऊ लागले आणि प्रेमगीतांच्या साह्याने आपले हृद्गत व्यक्त करू लागले. अध्यापकांच्या ध्यानात आले होते की प्रेमाच्या गोष्टी सरोजिनीला आवडतात. त्यामुळे ते विविध प्रकारांनी प्रेमाचे गोडवे गाऊ लागले — प्रेम सौंदर्याचा निर्झर आहे. मुक्तीचे द्वार आहे, शांतीची हाक आहे, ब्रह्माची सत्ता आहे, इत्यादी, इत्यादी. सरोजिनीला कळले तर काही नाही. पण, ते बोलणे अधिकाधिक ऐकावे अशी ओढ तिला सतत लागलेली असे.

एके दिवशी सरोजिनीने अध्यापकाला विचारले, "जिची दृष्टभेटही झालेली नाही, अशा व्यक्तीवर प्रेम बसू शकते?"

त्या युवकाने तिच्याकडे नजर फिरविली आणि तो म्हणाला, "हो, जरूर, दिव्य प्रणय काय करू शकत नाही?"

सरोजिनीने पुन्हा विचारले, "एखाद्या व्यक्तीची मुळीच माहिती नसली, तरीही तिच्याबरोबर प्रणय होऊ शकतो?"

अध्यापक म्हणाले, " शक्य आहे. कारण प्रेमगीत आमच्या मनन – चिंतनाची ज्वाला आहे, ती ईश्वराची लीला आहे. "

सरोजिनीने विचारले, " न ऐकलेल्या, न पाहिलेल्या व्यक्तीवरचं प्रेम काय सफल होणार ? "

अध्यापक म्हणाले, " जरूर सफल होईल. मीच त्याचं उदाहरण आहे. "

सरोजिनी म्हणाली, " आपण पाहिलं नाही, तिच्याविषयी काही ऐकलं नाही आणि तरीही प्रेम करून बसलांत. आपलं प्रेम सफल झालं ?"

त्याने आवेशात येऊन उत्तर दिले, " हो, आत्तांच सफल झालंय. पहाण्याबोलण्या पूर्वीपासूनच माझं तुझ्यावर प्रेम होतं. आता तर ते सफल झालंय. ही सगळी ईश्वरी लीला आहे. "

सरोजिनी कुद्ध होत म्हणाली, " बडबड बंद करा. माझं तुमच्यावर मुळीच प्रेम नाही. "

आश्चर्यचकित होऊन तो म्हणाला, " दिव्य अन पवित्र प्रेमाची निंदा करू नकोस. "

सरोजिनी म्हणाली, " मी प्रेमाची निंदा करीत नाही, पण मी एका दुसऱ्याच व्यक्तीला आपलं प्रेम अर्पण केलंय. "

" तो भाग्यवान कोण आहे ? " त्याने विचारले.

" तो भाग्यवान आहे, कुबेर आहे, कोमल आहे, पंडित आहे आणि सुयोग्य आहे. कुठं तो आणि कुठं बिचारा तू ! "

अध्यापक हसत म्हणाले, " त्याचं तुझ्यावर प्रेम आहे ? "

" ते कळावं म्हणूनच मी तुम्हांला विचारीत होते. मी त्याला कधी पाहिलं नाही की त्याच्याविषयी कधी काही ऐकलं नाही. " सरोजिनीने उत्तर दिले.

अध्यापक स्फोट झाल्यासारखा हसला आणि म्हणाला, " तुझं प्रेम अवश्य सफल होईल. "

तो निघून गेला. हळूहळू त्याने सरोजिनीकडे येणे बंद केले.

## ४

चारपाच वर्षे निघून गेली. आपल्या सुंदर, सुकोमल, कुबेर आणि पंडित पतीची प्रतीक्षा करीत सरोजिनी काल्पनिक विश्वात वावरत होती. ती काल्पनिक पतीचा हात पकडून हळुहळू चालते. तो दूर अंतरावरून बोलावतो तेव्हा ती मान झुकवून

समोर उभी रहाते आणि मग ती दोघे मधुर संभाषणात रममाण होऊन जातात. तिचा पती तिचे चुंबन घेतो आणि मग दोघे एकरूप होऊन जातात. जीवनातील कठोर वास्तव कधीकधी तिचे डोळे उघडते व पती काही वेळ विलीन होऊन जातो पण तिने पापण्या मिटल्या मात्र, पतिदेव पुन्हा प्रकट होतात.

ही केवळ कल्पना आहे, कल्पना !

आता सरोजिनीचे आई-वडीलही तिचा तिरस्कार करू लागले आहेत. कारण तिचा त्यांना भार वाटतो. काम न करता राहाण्याइतकी त्यांची अनुकूलता नव्हती हे एक, शिवाय तिचे असे रहाणे जगाला आवडत नव्हते. म्हणूनच तिची आई वडिलांना म्हणाली, "मुलीचं कुणाशी तरी लग्न लावून दिलंच पाहिजे. ती इथं राणीसारखी ठिय्या मारून बसलीय. आपण तिला बसल्या बसल्या गिळायलाही घालू शकत नाही. तुम्ही अन ती बसला आहात न्यायाधीशाची वाट पहात. आणखी किती वाट पहायचीय ? वाट पहाता पहाता ती म्हातारी होऊन जाईल. जाऊ द्या, मला काय ?"

तिचे वडीलही तिच्या आईशी सहमत होतात. "त्या वेळी एजंटाशी विवाह करता आला असता. श्रीमंत होता, दणदाकट होता अन दिसायलाही विशेष वाईट नव्हता. मुनीमही चांगला होता, पण मुलीला उच्च स्थळ हवं होतं. अन आता तर कुणीच येत नाही."

पुन:पुन्हा हे ऐकून सरोजिनी दु:खी होऊ लागली. तिला निराशेने घेरले. नवे कपडे आणि फुले मिळावीत म्हणून ती जीव टाकायची. आई खवळायची पण वडील गप्प रहायचे. आता तिला स्नानासाठी साबण मिळेनासा झाला. क्रीमपावडरींच्या जागी आता स्वयंपाक-घरातील धूर जमू लागला. आई तिला कामे सांगू लागली. तिचे कपडेही फाटायला आले होते.

स्वयंपाक करण्याची आवड पूर्वीही तिला नव्हतीच. आता ते काम अंगावर येऊनच पडले, तेव्हा तिला ते सहन झाले नाही. तिला तर काल्पनिक जगातल्या काल्पनिक पतीचा सहवास हवा होता.

काम करताना जीवनाचे कठोर स्वरूप अनुभवाला आले, तेव्हा तिच्या लक्षात आले की जीवन म्हणजे केवळ स्वप्न किंवा कल्पना नव्हे. जीवन पाषाणाहूनही कठोर आहे. हे सत्य तिच्या मैत्रिणींनी आधीच जाणले आणि म्हणूनच तर आपल्या मनातला पती सोडून नलिनीने मुनीम व पद्माक्षीने एंजीनियर पत्करला. लीलावतीची तिला काही बातमी कळली नव्हती. तिला मागणी घालणाऱ्या लोकांविषयी ती

विचार करायची, पण त्याचा आता उपयोग नव्हता, मुनिमाशी, व्यापाऱ्याच्या मुलाशी किंवा एजंटाशी तिने लग्न केले असते, तर त्यांनी तिच्यावर प्रेम केले असते, तिला सुखात ठेवले असते. या विचाराने तिला कधीकधी रडूही येई.

वरप्राप्तीसाठी सोमवारचे व्रत करायला तिला आईने सांगितले. ती दर सोमवारी मंदिरात जाऊन प्रदक्षिणा घालू लागली. एका सोमवारी तिने पाहिले – लीलावती अध्यापकाबरोबर आली आहे. त्यांना एकत्र पाहून सरोजिनी एकदम स्तब्ध झाली. सरोजिनीचा हात हातात घेत क्षमायाचनेच्या स्वरात लीलावती म्हणाली, " लग्न अगदी साध्या पद्धतीनं झालं, म्हणूनच कुणाला निमंत्रण दिलं नाही. "

सरोजिनी यावर काही बोलली नाही. गप्पा करण्यासाठी तिने लीलावतीला जवळ ओढून घेतले. काही वेळाने दोघी मैत्रिणींनी परस्परांचा निरोप घेतला. तिने पाहिले, जाताना अध्यापकाच्या मुद्रेवर विजयश्री मिळाल्याचे स्मित विलसत होते.

५

मानवाच्या आशाआकांक्षा तुडवीत निष्ठुर काळ जीवन पुढे ओढून नेत आहे. सरोजिनी आता बत्तीस वर्षांची झाली आहे.

एके दिवशी तिने काळजीपूर्वक आपले रूप न्याहाळले, ते रूपडे पाहून तिच्या तोंडून निघाले, " अरे देवा ! " तेल संपल्यावर विझलेली वात आकसून जाते तशा सुरकुत्या सरोजिनीच्या चेहऱ्यावर पडलेल्या होत्या.

रात्री सगळे झोपल्यावर ती दिव्याशी विचारात मग्न होऊन बसली होती. त्याच वेळी चहाचे दुकान चालविणारा कोंती घरात आला. त्याला केव्हाही घरात येण्याची मुभा होती. कारण, सर्वांचा त्याच्यावर पूर्ण विश्वास होता.

कोंती एकटाच आहे, त्याने विवाह केला नाही. वयात आली तेव्हापासून सरोजिनी त्याला चहाच्या दुकानावर बसलेला बघत आली आहे. पान खाऊन खाऊन त्याचे तोंड अधिकच बेढब झाले आहे. कोंतीला कोणी लग्नाविषयी विचारले की तो म्हणतो, " तुम्ही सगळे लग्न करून सुखात रहा. त्यातच मलाही सुख आहे. "

सरोजिनीजवळ बसत कोंतीने विचारले, " दिव्याजवळ बसून तू कोणतं स्वप्न पहातेस ? "

सरोजिनीने उत्तर दिले, " झोप येत नव्हती, म्हणून सहजच इथं बसले होते. आईला बोलवू ? "

" नको, नको." तो अंगणात पिंक टाकीत म्हणाला, " आता किती दिवस अशीच एकटी रहाणार, सरोजिनी ? "

प्रश्नाचे मर्म कळूनही सरोजिनी बेपर्वाईने म्हणाली, " बसत नाही, निजायला जातेच. "

त्याने पुन्हा प्रश्न विचारला, " एकटं रहाणं योग्य आहे का ? "

सरोजिनी म्हणाली, " तूदेखील एकटाच तर रहातोस. "

कोंतीला ग्लानी आली. काही वेळ गप्प राहून तो म्हणाला, " माझी गोष्ट वेगळी आहे. "

सरोजिनी म्हणाली, " माझीही गोष्ट वेगळीच आहे. हा सगळा नशिबाचा खेळ आहे. "

काही वेळ दोघेही गप्प बसले. आज सरोजिनीच्या सगळ्या आशा आणि अभिलाषा अश्रूंचे रूप घेऊन वाहू लागल्या. अवरुद्ध कंठाने ती म्हणाली, " माझ्यासाठी विधात्यानं लिहिलेला हा अटळ ललाटलेख आहे, कोंतीभय्या ! "

कोंतीही म्हणाला, " हो ! हा सगळा विधात्याचा खेळ आहे " थोड्या वेळाने कोंतीने काही बोलण्याचा प्रयत्न केला परंतु त्याच्या तोंडातून शब्दच फुटला नाही.

पूर्वेकडे आपल्या पूर्ण तेजाने प्रकाशत चंद्र वर आला होता. दोघेही तिकडेच पाहू लागले. कोंतीला काहीतरी म्हणावयाचे होते; पण त्याचे शब्द पुन्हा तोंडातच राहिले. सरोजिनीने विचारले, " काय म्हणणार होतात ? "

" काही नाही. "

थोड्या वेळाने त्याने विचारले, " रात्र बरीच झाली, नाही ! "

" बारा वाजून गेले. "

" बारा वाजून गेले ! "

" हूं. "

तो उठला, खोलवर श्वास घेऊन काही म्हणण्याचा प्रयत्न केला, पण शब्द फुटले नाहीत. केवळ एक अव्यक्त ध्वनी निघाला, तेवढाच.

तिने विचारले, " काय ? "

काही नाही, आता जाऊन नीज "

" मी निजायला जाते. आता तुम्ही जा. "

" तू अंथरुणावर पडलीस की मग मी जाईन. रात्री एकटं बसणं ठीक नाही. "

ती दिवा घेऊन उभी राहिली. कोंतीने दीर्घ नि:श्वास सोडला. त्याने खोलीत जाऊन दार लोटून घेतले.

ती दिवा घेऊन दरवाज्याजवळच उभी राहिली ... एक प्रकारची नि:शब्दता! ... एक दु:सह एकान्त ... एक दीर्घ नि:श्वास ! दिवा विझला. तिने दरवाजा उघडला.

कोंती तिथे मूर्तीसारखा स्तब्ध उभा होता. तिने हलक्या आवाजात विचारले' " अजून गेला नाहीत ? "

त्याने विचारले, " अजून झोपली नाहीस ? "

पुन्हा नि:शब्दता !

तिने विचारले, " जायचं नाही का ? "

कोंती म्हणाला, " निजायचं नाही का ? "

पुन्हा नि:शब्दता !

तो दोन पावले पुढे सरून उभा राहिला. त्याने उजवा पाय वर उचलून पुन्हा खाली दाबला.

सरोजिनीने विचारले, " जायचं नाही का ? "

तो म्हणाला, " झोपायचं नाही का ? "

" हूं ! " – ती म्हणाली.

" हूं ! " – तो म्हणाला.

# मात्तनची कहाणी

**—तकषी शिवशंकर पिल्लै**

" आई ! बाबा आजही येणार नाहीत का ? " प्रार्थना करीत असता मधेच त्रेस्याने आईला विचारले.

मरिया प्रार्थना करीत होती, पण तिचे लक्ष घाटावर लागणाऱ्या नावेच्या आवाजाकडे होते. ती म्हणाली, " येतील, बाळे ! आजच येतील. "

मरियाने त्या दिवसासाठी प्रार्थना केली. भोजनाबद्दल कृतज्ञता व्यक्त केली. त्रेस्याने तेच शब्द उच्चारले. पसरलेले हात, एका बाजूला झुकलेले डोके, थोडे खाली घसरलेले वस्त्र, खपाटीला गेलेले पोट, अर्धवट उघडे ओठ व अर्धोन्मीलित डोळे असलेल्या क्रूसावर लटकणाऱ्या आकृतीकडे त्यांनी लक्षपूर्वक पाहिले. त्या वेळी विझत्या दिव्याच्या प्रकाशात त्या आकृतीचे ओठ हलत आहेत, असा भास त्यांना झाला. ईश्वराला काही सांगावयाचे होते. " दयावंता, आमचं रक्षण कर ! " – पुन्हा तीच प्रार्थना ! त्रेस्या काहीच बोलली नाही.

जवळच अंथरुणावर पडलेली रोसा काहीतरी बडबडली, त्रेस्याने पुन्हा विचारले, " बाबा आले नाहीत तर आपण जेवणार कसे ? "

आई म्हणाली, " येतील बाळा. "

दिवा विझायला आला आहे. मरियाने दिवा उचलून एकदा हलवला. रात्र अधिकच दाटली. पाऊस पडू लागला. वारा वेगाने वाहू लागला.

त्यांनी स्तब्ध होऊन प्रार्थना केली. ती प्रार्थना अजून अलिखितच आहे. चारपाच फूट खोल तलाव आणि नदीचा प्रवाह पार करून यायचे आहे – अशा लांबवरच्या टेकडीच्या पायथ्याशी ते गेले आहेत. सरोवराचा काठ दिसत नाही. सहाय्य करायला बरोबर कोणी नाही. नदीत भोवरेही आहेत, हातातला बांबू तुटला तर ? – ती येशूच्या पावलांना बिलगली. तिला दोन मुली आहेत.

त्रेस्याने पुन्हा विचारले, " बाबा या पावसात कुठं असतील ? पावसात ताप नाही चढणार ?"

मरियाने डोळे उघडले. त्यातही तेच न्यून आहे. दिवा आता विझन जाईल घाटाला नाव लागल्याचा आवाज ऐकण्याच्या ओढीने आईने आणि मुलीने बाहेर पाहिले. – घनदाट अंधार, काही दिसेना.

" आई, बाबा ! "

" बाळ त्रेस्या ! "

बाहेर कोणी हाक मारली.

" जरा दिवा दाखव, बाळ " !

" दिवा विझला, बाबा ! "

त्रेस्या दुसऱ्यांदा दिवा घेऊन ओसरीवर आली; पण तो पुन्हा विझला.

मात्तन ओसरीवर आला. हातात एक छडी आणि मोठीशी पिशवी.

" दिवा दाखव, बाळ ! "

" बाबा, विस्तव नाहीय ! "

वडिलांच्या गळ्याशी बिलगावे म्हणून त्रेस्या अंधारात त्यांना चाचपडते; पण बाबा कुठे आहेत, माहीत नाही, रोसादेखील जागी झाली. तिने वडिलांना हाक मारली. त्यांना पकडण्याच्या प्रयत्नात रोसाचे डोके त्रेस्याच्या ओठांवर आदळले.

" शेकोटीतही विस्तव नाही का ? " मात्तच्चनने विचारले.

" नाही. अन आज घरात चूलही पेटली नाही. मात्तच्चनचे माथे भडकले. "

" आज माझ्या पोरांनी काही खाल्लं नाही ? तू त्यांना काहीच दिलं नाहीस ? "

मात्तच्चन चिंब भिजला होता, प्रथम रोसाने त्याला पकडले.

त्याने रोसाला कडेवर उचलून घेतले.

" त्यांना सकाळी अन संध्याकाळी दिलं होतं. रात्रीसाठी काहीच नव्हतं. " मरिया म्हणाली, " शेजाऱ्यांनी मुलांना पुष्कळ दिलं. आज काहीच काम करता आलं नाही, सकाळपासून पाऊस कोसळतोय. "

" मग तूही काही खाल्लं नसशील ? " मात्तच्चनने आपल्या पत्नीला विचारले.

" नाही. "

मुलीला खाली बसवून मात्तच्चन विस्तव आणायला गेला त्या दिवशी मध्यरात्री-पर्यंत खोलीत प्रकाश होता. पण ते त्यानंतरही झोपले नाहीत. पती-पत्नींचे संभाषण चालूच राहिले.

पती म्हणाला, " तीन रुपये दिले. त्यानंतर मोटरीत बसून ते एर्नाकुलमला गेले. "

" मग हे चार आणे ? "

" पाले येथे कॉफी प्यायला दिले होते. कणीक नव्हती. मी कॉफी प्यालो नाही.."

" तांदूळ कुठून... "

" वाटखर्चातून मी वाचवले आहेत. "

" किती आहेत ? "

" दोन पाव. "

मात्तच्चन गेल्यानंतरची सगळी परिस्थिती मरियाने सांगितली, दोन दिवस शाकारण्यासाठी मट्टकाट्टला गेली होती. नऊ आणे मिळाले, एक दिवस तरप्पुरमला तांदूळ नीट केले. एक दिवस चार नारळ विकले. आज पाऊस कोसळत असल्यामुळे घराबाहेर पडताच आले नाही.

" मी मुलींना उपाशी ठेवलं नाही. "

" पण स्वत: उपशी राहिलीस !"

पुन्हा नि:स्तब्धता. ही नि:स्तब्धता झोपेमुळे नव्हे, तर चिंतेमुळे आली होती. कोणत्याही क्षणी तिचा भंग होऊ शकला असता.

" आता किती झाले असतील ? "

" चौदा. "

" हे सगळे पैसे द्यायला जाणार ? "

" नाही तर काय ! एका वर्षात एवढेच जमले. ती आता आठ वर्षांची झाली असेल न? आता फक्त पाच-सात वर्षे उरली. "

थोडा वेळ गप्प राहिल्यावर मात्तच्चन म्हणाला, " दहा पैसे जास्त दिले, तर तेवढंच चांगलं, कारण मग अधिक चांगला नवरा मिळेल, आपल्याला त्रास होईल, हे खरं..."

मरियाला पटले, भविष्याचा विचार करता करता दोघांनीही निद्रेच्या कुशीत प्रवेश केला. पति-पत्नी स्वप्न पहात होते ... मुलीचे लग्न ... तिचे घर ...

सकाळ होताच मात्तच्चन अरच्चराला पोचला. तोपर्यंत चाक्कोला भेटायला चार-पाच लोक येऊन पोचलेले होते.

चाक्को त्या गावची मालदार असामी आहे. त्यांची खूप मोठी शेतीवाडी आहे. त्यांच्या श्रीमंतीच्या अनेक आख्यायिका प्रसिद्ध आहेत; पण वर्तनात घमेंड नाही, त्यांची मधुर वाणी नेहमी सहानुभूतीच व्यक्त करते. दुसऱ्यांना तुच्छ लेखणारा शब्द त्यांच्या मुखातून निघालेला कोणी ऐकलेला नाही. शिवाय वृत्तीने, इतके धार्मिक की दर रविवारी न चुकता चर्चला जातात. ईश्वराचे स्मरण ठेवून प्रत्येक कार्य करतात. नकतेच एका चर्चला त्यांनी एक हजार रुपये दान केले होते.

झोप झाल्यावर आळोखे देत चाक्को बाहेर आले, तेव्हा त्यांनी मात्तच्चनला पाहिले.

" केव्हा आलास, मात्तच्चन ?"

" काल, रात्री."

त्याला चाक्कोशी एकट्याशी काही बोलावयाचे आहे, पण तेथे चार-पाच लोक बसलेले आहेत. लोक भेटायला तर सारखे येतच असतात. मात्तच्चन कष्टी झाला.

चाक्कोच्चनला त्याच्या मुलीने कॉफी प्यायला बोलवले. सगळ्यांना तिथेच सोडून चाक्कोच्चन फॉफीसाठी आत गेला तेव्हा त्याच्याबरोबर मात्तच्चनही होता. थोड्या वेळाने मात्तच्चन परतला. त्याचा चेहरा आनंदाने फुलून आला होता. त्याने तीन रुपये चाक्कोजवळ ठेवायला दिले होते. आता त्रेस्याच्या लग्नासाठी एकूण चौदा रुपये जमा झाले होते !

चाक्कोच्या पत्नीने मात्तच्चनला लाकूड फोडायला बोलावले. ते फोडून झाल्यावर चाक्कोने त्याला आपल्या कामाला बोलावले. चाक्कोला नांगरणीसाठी जावयाचे होते. नाव वल्हवण्याचे काम मात्तच्चनचे होते.

नावेतून जाताना मात्तच्चनने चाक्कोचाचा लौकिक त्यांच्या कानावर घातला. आख्ख्या पालै गावात त्यांचे नाव दुमदुमत आहे.

चाक्कोने मात्तच्चनच्या मुलीसाठी एक मुलगा पाहून ठेवला आहे. "ते चांगले श्रीमंत आहेत, मालकीचा बगीचा आहे."

" विचार करीन."

" विचार करीन !" चाक्को म्हणाला.

शेतावर पोचल्यावर त्याला गाईना चारा द्यायला सांगितले. ते काम झाल्यानंतर त्याने नारळाची पाने लावली. नंतर दहा मण तांदूळ घ्यायचा आहे. अशीच पुष्कळशी कामे करता करता संध्याकाळ झाली.

मात्तच्चन इतका थकला की त्याला उभेही रहावेना. स्वयंपाकघराजवळ जाऊन त्याने गरम पाणी मागितले. अजून पाणी गरम व्हायचे आहे. तांदूळ उकळत आहे त्याच वेळी चाक्कोही तेथे आला.

" अरे, ही काय पाणी प्यायची वेळ आहे ? "

थोड्या ग्लानीतच तो उत्तरला, " काही नाही, जरा थकवा... "

" दुपारी तर पोटभर जेवला असशील ? "

" काही खाल्लं नाही. "

" का ? "

" घरात काही नव्हतं. "

" बरं, जरा या कामगारांना मजुरी वाटून टाक. "

मजुरी वाटता वाटता अंधारून आले.

चाक्कोच्या प्रार्थनेची वेळ झाली होती. मात्तच्चनचे सगळे सांधे दुखत होते. त्याचे मनही ठिकाणावर नव्हते. डोके खाजवीत मात्तच्चन चाक्कोच्या मागे मागे जाऊ लागला.

" का रे, तुला जायचं नाही ? "

" थोडं धान्य ... "

" तांदूळ ! कशासाठी ? "

" मुलांसाठी घरात काही नाही. "

" मी जरा प्रार्थना करून येतो. "

मात्तच्चनने विचार केला सहा शेर धान्य मागितले पाहिजे. चार शेर मजुरी म्हणून आणि दोन शेर आजच्या जेवणासाठी...

२

लोकांना पाले येथे पोचवावयाला मात्तच्चनला जायचे आहे, पण आता तो फार थकला आहे. सगळे म्हणतात की त्याच्याने काम होत नाही.

मात्तच्चन लोकांना विनवायचा, " मलाही कामावर बोलवा. "

दुसरा कोणी मिळत नाही, तेव्हा मात्तच्चनची आठवण होते. त्याला काहीही मजुरी देणे त्यांना जड वाटते. तरीही तो हिशोब करीत रहातो. चाक्कोच्या घरी त्याच्या लायक हलकी कामे आहेत. इतर ठिकाणी जमले नाही, की तो तेथेच जातो. सगळी कामे आटोपून चार शेर धान्य मागतो. अशी दिवसगत होत आहे. पण त्यांतून काय लाभ ? घालायला कपडे लागतात, तेल लावावे लागते, चर्चची वर्गणी द्यायची आहे, मुलींना शिकवायचे आहे आणि हे सगळे चाक्कोच्चनच्या मदतीमुळे शक्य होत आहे, कोणी आजारी पडला की त्याची शुश्रूषा करायला मात्तच्चनलाच सांगण्यात येते.

" चाक्को नसता, तर आपण काय केलं असतं ?"

" मी देखील हाच विचार करते. "

" हो नं, काय केलं असतं ? "

चाक्कोच्चन त्यांचे रक्षण करणारा देव होता. किती दयाळू आहे ! किती ईश्वरभक्त आहे !

आपल्या मुलींच्या जीवनाला सुंदर आकार द्यावा, हे त्या बिचाऱ्याचे स्वप्न होते. त्यांचे जीवनमान उंचावले की त्याने आयुष्यभर सोसलेली झीज सार्थकी लागणार होती. घडले असे की मुले जन्माला आली, रांगली, धावली, पडली आणि मोठी होत गेली. धाकटया मुलीही आता वाढल्या होत्या. आता त्या दप्तर-पाटी घेऊन शाळेत जाऊ लागल्या होत्या.

मुली वाढत होत्या, तसतसा एक हिशोबही वाढत होता. मुलींना या हिशोबाचे स्मरण आयुष्यभर रहाणार होते. मात्तन चाक्कोला रोजच काही ना काही ठेव देत होता. ती रक्कम वाढता वाढता नव्वद रुपयांपर्यंत जाऊन पोचली होती.

मुलींचे भले व्हावे हा विचार त्यांना अविरत कामाला जुंपीत होता. ती पतिपत्नी अपत्यांसाठी जगतात, केवळ अपत्यांसाठी. रोज संध्याकाळी पतिपत्नी एकत्र बसत आणि बेरीज करीत.

पत्नी विचारायची, " साधारण स्थळ मिळायला किती रुपये लागतील ? "

" दहा हजार आणे जमल्यावर तर स्वतःच्या मालकीचं घर असलेलं स्थळ मिळेल ! "

ती विचारायची, " इतकी रक्कम जमवायला किती दिवस लागतील ? "

आपल्या मुलींना चांगली स्थळे मिळतील हा एकच विचार त्यांच्या जीवनात आनंद उत्पन्न करायला पुरेसा होता, उपास घडला तरी त्यांच्या तोंडून कधी तक्रारीचा शब्द निघाला नाही. पैसा अधिकाधिक जमू लागला तसतसा त्यांचा उत्साह आणि आत्मविश्वास वाढू लागला.

मात्तच्चनची उत्साही वृत्ती आख्ख्या गावात प्रसिद्ध होती.

त्रेस्या रोज आई-वडिलांच्या गोष्टी ऐकायची. साचवलेले पैसे वाढत होते. कधी-कधी हिशोबात चूक व्हायची. चार आणि तीन यांची बेरीज आठ करून बसायचे, ती चूक त्रेस्याच्या लक्षात यायची, पण चूक दुरुस्त करण्याची तिची कधी हिम्मत झाली नाही. धाकटी असली, तरी ती एक स्त्री नव्हती का ?

आपली स्थिती दिसते तितकी खराब नाही या जाणिवेने त्रेस्याचा स्वाभिमान जागृत झाला होता. तोमा कोळ्याची मुलगी एक दिवस म्हणाली, " आम्ही गरीब आहोत. "

त्रेस्या म्हणाली, " आम्ही गरीब असलो तरी गरीब नाही. "

तिच्या बोलण्याचा अर्थ न समजताच चाक्कोची मुलगी खिदळली. त्रेस्याने आवेशाने तेच वाक्य पुन्हा उच्चारले.

खरेच आहे, त्रेस्यालाच त्या वाक्याचा अर्थ कळतो. दुसऱ्यांच्या लक्षात त्याचे मर्म कधी यायचे नाही.

एकदा दुपारी त्रेस्या आपल्या मैत्रिणींबरोबर शाळेच्या पटांगणावर खेळत होती, तेवढ्यात त्यांना बँडचा आवाज ऐकू आला. त्याबरोबर सगळ्या घराबाहेर धावल्या... ती लग्नाची वरात होती.

वऱ्हाडी लग्नाहून परतत होते. मरिया त्यांना ओळखत होती. ती म्हणाली, " ते आमच्या घराजवळचे अण्णा आहेत. वर अविच्चेरीचा मुलगा आहे. वधू तिच्याकडे पाहून हसली.

त्रेस्याने विचारले, " हुंडा किती दिला ? "

" मला माहीत नाही, " मरियाचे उत्तर.

ती वरात पहाताना त्रेस्या जमिनीवर खिळून राहिली. शेकडो विचार तिच्या मनात घोळू लागले. स्वतःचा आणि भोवतालच्या परिस्थितीचा तिला विसर पडला. मन भरकटत कोठेतरी जाऊन पोचले.

सगळ्या मैत्रिणी केव्हाच निघून गेल्या होत्या. थोडी पुढे गेल्यावर मरिया थबकली. तिने त्रेस्याला हाक मारली. त्रेस्या एकदम भानावर आली. धावत जाऊन तिने मैत्रिणींना गाठले. त्यांतली एक म्हणाली, " ही उभ्या उभ्या तिथं लग्नाचं स्वप्न पहात होती, "

दुसरीने विचारले, " मुलगा कुठला आहे ग ? "

तिसरीने विचारले, " हुंडा किती ठरला ? "

त्रेस्याला संताप आला, ती सगळ्यांवर तुटून पडली. सगळ्या मैत्रिणी हसू लागल्या.

त्रेस्या खवळून म्हणाली, " हसायला काय झालं ? आमच्याही जवळ हुंडा आहे. माझे आईवडील जमा करतात. "

– एवढे बोलून ती तिथून निघून गेली.

काही वर्षे उलटली. मात्तच्चनची जमा पुष्कळच वाढली, तीबरोबरच त्रेस्याचे शरीर आणि मनही. ती आता युवती झालेली होती. जमा केलेली रक्कम परत घेण्याची वेळ येऊ लागली. त्रेस्याच्या बरोबरीच्या मुलींचे आईवडील हुंड्यासाठी संत्रस्त होताना पाहून मात्तच्चनला मौज वाटायची. त्याच्या मुलीला चांगले स्थळ मिळणार, यात काय संशय ?

आईवडील बेरीज करीत तेव्हा त्रेस्याचे मन विशाल जगात शोध घेत फिरे. कोठे

तरी एक पुरुष तिच्याहीसाठी थांबला असेल, तो कसा असेल ? आता काय करीत असेल ? आपल्या गळ्यात मंगळसूत्र बांधणाराची कुडताटोपी घातलेली मूर्ती हृदयावर अंकित झालेली पहात होती. सासर ! ... ते घर कसे असेल ? घर आणि जमीन त्यांचीच असेल ! ... ती प्रेम करील, शुश्रूषा करील ... ते उलट प्रेमाची परतफेड करतील ? ती आई होईल ...

त्रेस्याच्या मनात असेच विचार घोळत रहायचे. त्या अज्ञात पुरुषाने तिला जागवले तर ती लाजून उठेल.

कितव्या वर्षी लग्न होईल ? सोळाव्या वर्षी लग्न झालेल्या कितीतरी मैत्रिणींची आठवण तिला झाली.

ती सतरा वर्षांची आहे. माझे नक्की वय वडिलांना माहीत नसेल, पण आईला बरोबर आठवते.

एके दिवशी मरिया मात्तच्चनला म्हणाली, " आता नुसतं बसून भागणार नाही त्रेस्याला सतरावं लागलंय. "

" हूं ! " त्रेस्याने खोल श्वास घेतला.

मात्तच्चन उत्तरादाखल म्हणाला, " माझ्या लक्षात आहे, मी शोधातच आहे. नवरा मुलगाच आणायचा आहे की नाही ? चार पैसे आणखी जमले तर ते अधिकच चांगले ... "

काही दिवस उलटले. मात्तच्चन पाले येथे गेला. परतल्यावर त्याने सांगितले, " मुलगा मिळाला, चांगला आहे. वीस वर्षांचा आहे. बिडीसुद्धा ओढत नाही. स्वत:ची एक एकर जमीन आहे. येत्या रविवारी ते लोक मुलगी पहायला येतील."

आईने विचारले, " काय द्यावं लागेल ? "

" पाच हजार आणे. "

सासरचे घर आणि जमीन यांचे मनोमन दर्शन त्रेस्याने घेतले. त्यांचे आई-वडीलही असतील. त्यांच्याबरोबर जीवन सुखात जाईल.

रविवारी मुलगी पहायला आले, तिने आपल्या भावी पतीला पाहिले. मुलानेही तिला पाहिले. त्रेस्या कृतकृत्य झाली.

लग्न ठरले, पाच हजार आणे हुंडा निश्चित झाला, लग्नाची तारीखही पक्की झाली. चर्चमधील पाद्र्याने तशी घोषणा केली. त्रेस्याच्या वडिलांनी येत्या रविवारी हुंड्याची रक्कम पोचविण्याचा वायदा केला.

त्रेस्याचा आनंद गगनात मावत नव्हता, तिच्या मैत्रिणी तिची चेष्टा करू

लागल्या, विवाहित मैत्रिणी तिला उपदेश करू लागल्या, ती दिवस मोजू लागली.

पति-पत्नी पुन्हा हिशोब करीत होते. " हुंडा आणि लग्नाच्या खर्चानंतर थोडेसेच पैसे उरतील. पुढे रोसासाठी पैसे जमवू. "

पालै येथे जायला दोनच दिवस राहिले होते. शेजारच्या घरून परतल्याबरोबर मरिया म्हणाली, " चाक्कोच्चन आला आहे. उद्या सकाळी तो बाजाराला जाईल, नंतर कोट्टयमला, आजच पैसे आणून ठेवले पाहिजेत. "

" हे कसं काय ? मेळा तर रविवारी आहे ! "

तथापि, मात्तच्चन शेजारच्या घरी गेला. मात्तच्चनला पाहून चाक्कोने स्मित केले.

" सगळी व्यवस्था झालेली दिसतेय ! "

" हो ! तिथून परतल्यावर उरलेली करीन म्हणतो. "

" हुंडा किती ठरला ? "

" पाच हजार आणे. "

" म्हणजे एकूण सातेक हजार लागणार – "

मात्तच्चन हसत राहिला.

चाक्कोच्चनने मुलाची चौकशी केली.

मात्तच्चनने विस्ताराने सगळे सांगितले.

" पैसा कुठून आणशील ? गाडून ठेवलाय का ? "

मात्तच्चन सुन्न झाला, असा आघात त्याला उभ्या आयुष्यात सोसावा लागला नव्हता, काय बोलावे हे सुचेना. तोंडातून आवाज फुटत नव्हता.

" आपल्याला थोडा-थोडा दिलेला पैसा... " एवढेच तो पुटपुटू शकला.

" थोडा थोडा दिलेला पैसा ! " चाक्कोने विचारले. वीज कोसळावी तशा मात्तच्चनच्या कानठळ्या बसल्या.

चाक्को पुन्हा म्हणाला, " माझ्याजवळ सगळा हिशोब आहे, तू घेतलेले अन बाकीचे दोन रुपये असे एकूण सतरा रुपये तू मला द्यायचे आहेस... "

" मी घेतलेले ? "

" हो. "

" मी ... मी . . मेहनत करून ... "

" तू माझ्याकडं काम केलंस ! पण परमेश्वरावर विश्वास असणारा कोणता धर्मात्मा तुला कामावर ठेवील ? पाप्याचं पितर कुठला ! "

" मी पानं तोडली ... गायीची कामं केली ... "

चाक्को मोठ्याने हसला.

" त्याची मजुरी ... " मात्तच्चन मटकन खाली बसला.

चाक्को म्हणाला, " मुलीच्या नशिबात असेल, तर सगळं चांगलं होईल, मी पंधरा रुपये देईन. परमेश्वर सर्वज्ञ आहे. "

दोनतीन प्रतिष्ठित लोक आणि पाद्री घाटावर आले. चाक्को त्यांचे स्वागत करायला सामोरा गेला.

रात्र चिंब भिजली होती. मात्तच्चनच्या घरातला दिवा आपोआप विझला. अजून तो परतला नव्हता.

दिवा विझला तरी मरिया आणि त्रेस्या वाट पहात राहिल्या.

दुसऱ्या दिवशी सकाळी मरिया तरप्पुराला पोचली. दक्षिणेकडील ओसरीवर बसलेल्या काही लोकांनी तिला पाहिले.

मात्तच्चन दुसऱ्या दिवशीही आला नाही. भरप्पुरमला जन्मदिवसाची धूमधाम होती.

दुसऱ्या दिवशी रविवार. चाक्कोचा मेळा भरला होता. घाटाला मात्तच्चनचे फुगलेले प्रेत लागले. त्याचे हातपाय दोरीने बांधलेले होते. तो मात्तच्चनच असेल. सगळीकडे मेळ्याची गडबड चालू होती! चाक्कोच्या थोरवीची आणि ईश्वर-भक्तीची प्रशंसा होत होती. मात्तच्चनच्या मृत देहाला कवटाळून मायलेकी आक्रोश करीत होत्या.

# सेकंड हँड

**—वैकम मुहम्मद बशीर**

केस मोकळे सोडलेल्या शारदेने जणू चण्डिकेचा अवतार धारण केला होता. संपादक गोपीनाथ तिला समजावण्याच्या आवाजात म्हणाले, " शारदा, उद्या अंक प्रसिद्ध व्हायला पाहिजे, तुला माहीत आहे ना ? आज रात्री मला फार काम पडेल. जेवण तयार असेल, तर लवकर वाढ. "

" जेवण ! " शारदा कर्कश आवाजात म्हणाली, " मी काहीच शिजवलं नाही. काही करावंसं वाटलंच नाही. पाहिजे तर स्वतःच शिजवून खा. मला वैताग आलाय. "

शारदेला गोपीनाथविषयी कधीच प्रेम वाटले नव्हते. तिने लग्नाआधीच सांगून टाकले होते, " माझं तुमच्यावर प्रेम नाही. मी कुणावरही प्रेम करू शकणार नाही. " यावर गोपीनाथने आजपर्यंत प्रत्युत्तर केले नव्हते, 'ओमना' म्हणून तिचे चुंबनही घेतले नव्हते.

गोपीनाथ म्हणाला, " या निरर्थक गोष्टी मी खूप दिवस ऐकत आलोय. मी तुझ्या इच्छेविरुद्ध केलंय तरी काय ? "

" तुम्ही माझ्याशी लग्न कशाला केलंत ? " तिने गर्विष्ठ निःश्वास टाकीत विचारले.

गोपीनाथ एकदम चमकला. तो म्हणाला, " तुम्ही माझ्याशी लग्न कशाला केलंत ? हे सगळं आता विचारून काय फायदा ? " त्याची नजर खिडकीतून समोरच्या गल्लीपर्यंत धावत गेली. वाऱ्याच्या झोताबरोबर पावसाचे टपोरे थेंब खोलीत येऊ लागले.

" दिसत नाही, पाऊस आत येतोय ! तुम्ही भिजला तर त्याचं काय, पण खोली मात्र घाणेरडी होतेय ! " शारदा म्हणाली.

गोपीनाथ खिडकी बंद करून शारदेजवळ गेला, तिच्या डबडबलेल्या डोळ्यांत लकाकत्या विजेचे प्रतिबिंब उमटलेले होते.

" मेले असते तर सुटले असते. " ती छाती पिटीत म्हणाली.

गोपीनाथने शारदेला हात पकडून थांबविले.

" मला स्पर्श करू नका ! मी भ्रष्ट वस्तू आहे ना !" ती ओरडून म्हणाली.

गोपीनाथने तिचे बोलणे बंद करण्याचा प्रयत्न केला.

" मी जीव देईन. " असे म्हणत शारदेने त्याचा हात झिडकारला आणि ती आपले डोके भिंतीवर आपटू लागली, मग साडीही फाडून टाकली.

" असं लाजिरवाणं आयुष्य माझ्या वाट्याला का आलं ? " वेडाचा झटका आल्याप्रमाणे आपल्या हातांतील बांगड्या फोडून शारदा शेजारच्या खोलीत धावली आणि स्वतःला पलंगावर झोकून देत मुसमुसू लागली.

गोपीनाथ चिंताग्रस्त होऊन खुर्चीत बसला. तो सतत हाच विचार करीत होता की शारदेला कधी काही बोल लावलेला नसताही ती नाराज असते – का ! कुणास ठाऊक ! स्त्रियांची जातच विचित्र म्हटली पाहिजे.

गोपीनाथला जीवनाचा तिरस्कार वाटू लागला होता तेव्हाच त्याची आणि शारदाची भेट झाली होती. त्याची अवस्था रखरखित वाळवंटात भटकणाऱ्या प्रवाश्यासारखी होती. शरीराचा फक्त सांगाडा राहिला होता. त्याची आपली एक कल्पना होती की स्त्री शीतल सरोवरासारखी असेल. कारण स्त्रीच्या केवळ दर्शनाने त्याची गात्रे निवत असत. सारखे वाटे, एखादे उन्नत वक्ष कवटाळून मधुर कूजन करावे. पण अशी स्त्री होती कुठे ?

तो दिवस ओढून काढीत असतानाच शारदेचा त्याच्या जीवनात प्रवेश झाला, तो अद्भुत तऱ्हेने. ती पावसाळ्यातली वादळी रात्र होती. गोपीनाथ वर्तमानपत्राच्या कार्यालयातून परत आला तेव्हा त्याला दिसले की दाराशी कोणीतरी उभे आहे. तो आणखी जवळ गेला तेव्हा त्याच्या ध्यानात आले की ती एक युवती आहे. ती अनोळखी होती, तिचे नावही त्याला माहीत नव्हते. तिने गोपीनाथच्या एकाही प्रश्नाचे उत्तर दिले नाही. पावसाळ्यातल्या गारठ्यात कुडकुडणाऱ्या या युवतीला गोपीनाथने आत यायला सांगितले.

पण तिने गोपीनाथकडे दुर्लक्ष केले. ती चुपचाप नुसती उभी राहिली.

" तुम्ही बाहेर उभं ऱ्हाणं चांगलं नाही, आत येऊन बसा. " – गोपीनाथ म्हणाला.

ती दरवाजाकडे वळली. तिच्या हातात एक पेटी होती. तिचे डोळे लाल झालेले होते. आसवांनी भिजलेले गाल अजूनही ओलेच होते. जाड काठाची पांढरी साडी

आणि काळे पोलके घातलेली ती युवती गोपीनाथकड अशी पाहात होती की जसे गायीने वाघाकडे पहावे.

गोपीनाथ विश्वास उत्पन्न करणाऱ्या आवाजात म्हणाला, " भिऊ नकोस. आत येऊन बस. " ती आत आल्यावर गोपीनाथने दार लावून घेतले.

" तुला कुठं जायचंय ? "

" ............ "

" तू बाजूच्या खोलीत जाऊन भिजलेले कपडे बदल, इथं मी एकटाच रहातो. मला बिलकुल घाबरू नकोस. मला वडील समज, भाऊ समज ... " बोलता बोलता गोपीनाथ एकदम थांबला.

ती म्हणाली की तिच्याजवळ बदलायला कपडे नाहीत.

वीणेच्या झंकारासारखा मधुर स्वर ऐकताच गोपीनाथाचे चित्त द्रवले, त्याने आपल्या पेटीतून धुतलेले कपडे काढून तिला दिले.

ती शेजारच्या खोलीत गेली आणि कपडे बदलून आली.

गोपीनाथने विचारले. " काही खाल्लं की नाही ? "

" मला काही नको. " ती हळूच म्हणाली.

गोपीनाथ म्हणाला, " माझी पाहुणी आहेस, एक कप चहा तर घ्यावाच लागेल. " त्याच्या चेहऱ्यावर स्मित पसरले.

ती चुपचाप बसून राहिली.

गोपीनाथने आपला परिचय करून दिला, " माझं नाव गोपीनाथ. मी एका सामान्य वर्तमानपत्राचा संपादक आहे. आता तुझं नाव ? "

" शारदा. " ती खालच्या मानेने मधुर आवाजात म्हणाली.

गोपीनाथ चहा करण्यासाठी बाजूच्या खोलीत गेला. तिथल्या खिडक्यांवर साडी, पोलके, ब्रेसियर आणि परकर वाळत होते. ... त्या घरातला स्त्रीगंधाचा तो पहिला प्रवेश होता. त्याच्या हृदयात आनंदाच्या लहरी उचंबळू लागल्या. तो स्वतःला आवरू शकला नाही. त्याने चुपचाप साडीचे चुंबन घेतले; मग ब्रेसियरचेही. नंतर स्टोव्ह पेटवून चहा केला. दोन कपांत चहा घेऊन तो शारदेजवळ आला, तेव्हा ती टेबलावर डोके टेकून बसली होती.

" शारदाबाई, चहा पिऊन घ्या. "

शारदेच्या चेहऱ्यावर थकवा उघड दिसत होता. ती हळुहळ चहा पिऊ लागली.

गोपीनाथने विचारले, " झोप येतेय का ? "

शारदा म्हणाली, " मी खुर्चीत झोपते."

" नको नको, दार बंद करून बाजूच्या खोलीत निजा, या खुर्चीवर मी झोपेन."

शारदेने मुळीच विरोध केला नाही, आतून दार बंद करून ती आडवी झाली.

पण गोपीनाथला झोप आली नाही. त्याच्या मनात विचारांचे काहूर माजले होते. ती कोण आहे ? असहाय्य होऊन आली तरी कुठून ? तिच्या डोळयांत अश्रू का ? तो एकीमागून एक सिगरेट ओढीत होता. त्याला झोप बऱ्याच उशिरा आली.

सकाळी बाहेरच्या खोलीतून वावरण्याचा आवाज आल्यावर शारदेने दरवाजा उघडला.

गोपीनाथ ' सुप्रभात ' म्हणाला.

उत्तरादाखल तीही ' सुप्रभात ' म्हणाली.

" झोप नीट लागली ? "

" हो. "

मग त्याने साबण, तेल, मंजन, पंचा वगैरे देऊन न्हाणीघर दाखविले. नंतर न्याहारी आणि थरमॉसमधे कॉफी विकत आणली.

शारदेचे स्नान झाल्यावर गोपीनाथने आपले स्नान उरकले. मग दोघे कॉफी प्याले. आता कुठे गोपीनाथने शारदेचा चेहरा काळजीपूर्वक न्याहाळला. अशक्तपणाची पिवळसर छाया पसरलेली होती. तो ऑफिसात जायला तयार झाला. पांढऱ्या शुभ्र रंगाची पँट, कोट आणि शर्ट घालून तांबडया रंगाचे जोडे घातले. नंतर शारदेला विचारले, " तू कुठं जाणार आहेस ? "

शारदा काहीच बोलली नाही. तिच्या नेत्रांतून अश्रू वाहू लागले.

" का रडतेस ? "

" अशीच. "

" काल रात्री कुठून आलीस ? "

" दवाखान्यातून. "

" नर्स आहेस ? "

" नाही. "

" डॉक्टर ? "

" नाही. "

" शिकतेस ? "

" नाही. "

" काही काम करतेस ? "

" नाही. "

" घर कुठाय ? "

शारदेने गावाचे नाव सांगितले — " ... सत्तर मैलांवर आहे. "

" तिथं काय करीत होतीस ? "

" शिकत होते. "

" कोणत्या वर्गात ? "

" बी. ए. त "

" आई, वडील आहेत ? "

" हो. "

" वडील काय करतात ? "

" हायस्कूलचे हेडमास्तर आहेत, "

" घरात भांडून आलीयस का ? "

शारदा गप्प राहिली.

" घरी परत जायचंय ?"

" नाही. "

" मग कुठं जाणार ?"

" मला ठाऊक नाही, जायला जागासुद्धा नाही. "

गोपीनाथ स्तब्ध राहिला. 'ही पागल असेल ? ' पण तसे तर वाटत नव्हते. तो बराच वेळ विचार करीत राहिला. मग त्याने निर्णय घेतला. विशाल जनसंमर्दापुढे पहिले भाषण करताना वक्ता जसा गोंधळतो आणि घाबरतो, तशी गोपीनाथची अवस्था झाली होती.

" मला काही सांगायचंय, " गोपीनाथ म्हणाला, " आपण एकमेकांना बिलकुल ओळखत नाही. काल रात्री पहिल्यांदा आपली भेट झाली. तुला आईवडील आहेत. घर आहे. पण तू म्हणतेस की तुला जायला ठिकाण नाही. असं का ? ते मला माहीत नाही. तुझ्या बाबतीत जास्त काही केलं पाहिजे, असंही मला वाटत नाही; पण मला एवढंच वाटतं की आपलं उरलेलं आयुष्य एकत्र जावं, आपण एकत्र जगावं, एवढीच माझी इच्छा आहे. "

थोडा वेळ दोघेही गप्प होते. मग शारदा म्हणाली, " मी कशी राहीन ? "

गोपीनाथ खूष झाला.

" माझी पत्नी होऊन. माझं तुझ्यावर प्रेम आहे. मी तुझ्याशी आजच लग्न करायला तयार आहे. "

" लग्न ? " ती चमकली, " लग्न ! "

" हो. माझं तुझ्यावर प्रेम आहे. "

शारदा टक लावून गोपीनाथच्या डोळ्यांत डोकावत होती.

" तुम्ही किती चांगले आहात ! " ती दुःखी आवाजात म्हणाली, " तुमच्या जीवनाशी नातं जोडायचं ? मी किती हीन आहे ! "

" ओह ! मीही कोण असा महात्मा लागून गेलोय ? "

" मी तुम्हांला फसवायला तयार नाही. "

" यात फसवाफसवी कसली ? "

" तुम्हांला माझी माहिती नाही. "

" स्त्री आणि पुरुष एकमेकांना न ओळखणारे प्राणी आहेत. प्रत्येकाच्याच अंतरंगात सगळ्यांना कसं डोकावता येणार ? आत्म्याची मला काही माहिती नाही, पण त्याचं रूप डोळ्यांत उमटतं, हे मला पटतं. तुझ्या सुंदर आत्म्याचं दर्शन मला तुझ्या डोळ्यांत होतं. मी त्यावर स्वतःपेक्षा जास्त प्रेम करतो." गोपीनाथ भावनेच्या भरात वहावत होता.

तरी शारदा म्हणाली, " मी एक फार वाईट स्त्री आहे. "

गोपीनाथ खळाळून हसला. " शारदा ! तू वाईट कशी झालीस ? तुझ्या शरीराला काय घाण चिकटलीय ? "

" मला या जगात कुणाचा आश्रय नाही. मला सर्वस्व देण्याचा वायदा तुम्ही करता आहात का ? थोड्याशा परिचयानंतर तुम्ही म्हणता की, माझं तुझ्यावर प्रेम आहे. अन माझ्याशी लग्नही करायला तयार आहात ! "

" छिः, कशा गोष्टी करतेस ? मी सर्व अर्थांनी तयार आहे. "

" तरी पण... "

" हे तरी पण...काय लावलंयस ? "

" माझं गतायुष्य ... "

" ओः काही हरकत नाही. मलाही भूतकाळ आहे. त्यातही काही घटना घडल्या आहेत. आपण दोघांनीही जुनं विसरावं अन पुढचा दिवस प्रेमात काढावा. एकमेकांवर विश्वास टाकावा, एकमेकांना सुखी करावं. "

" तुम्हांला काही माहीत नाही, " ती दातांनी ओठ चावीत हमसाहमशी रड

लागली. अवरुद्ध आवाजात म्हणाली, " मी इस्पितळात एका मुलाला जन्म दिलाय."

काही वेळ दोघेही स्तब्ध राहिले.

बऱ्याच वेळाने गोपीनाथने विचारले, " मग मूल कुठाय ? "

" मेलं "

" नवरा ? "

" मी अविवाहित आहे. "

" मुलाचा बाप ? "

" माझा एक वर्गमित्र. "

" तो कुठाय ? "

" ऑनर्सचा अभ्यास करताहेत. "

" मग ? "

" मला माझं भवितव्य सांभाळलं पाहिजे असं त्यांनी मला सांगून टाकलंय. "

" कसलं भवितव्य ? "

" ते कवी आहेत. त्यांनी खूप पुस्तकं लिहिलीत. त्यांची परीक्षा गेल्या आठवड्यात सुरू झालीय. पास झाल्यावर कॉलेजातच नोकरी मिळेल. "

" त्या कवीचं नाव ? "

शारदेने कवीचे नाव सांगितले.

" आदर्शवादी ? "

" हो. " शारदा म्हणाली, " मी त्याच्या कविता वाचीत असे. तो आमच्या वसतिगृहासमोर भाड्याच्या घरात रहायचा. मी पहिल्यांदा त्याला एक पुस्तकासाठी चिठ्ठी पाठविली होती. त्यामुळं आमचा परिचय झाला. आमचा पत्रव्यवहारही सुरू झाला. माझ्या मैत्रिणींनी मला सावध केलं. सांगितलं, तो चांगला माणूस नाही; पण त्याच्या कविता आदर्श प्रेमाची थोरवी गात होत्या. मी त्याच्यावर विश्वास ठेवला अन आम्ही दोघांनी शपथ घेतली. रात्री वसतिगृहाची भिंत ओलांडून तो माझ्या खोलीत यायचा. बाजूच्या आंब्याच्या सावलीखालून...

मी सगळं लपवून ठेवलं होतं; पण मैत्रिणी बडबडायला लागल्या. मी घरी आले. घरच्या सगळ्यांना कळलं तेव्हा मी घरही सोडलं. मला एकच आसऱ्याची जागा होती, इस्पितळ. मी त्यांना तीन पत्रं पाठवली, अखेर एक बोटभर निनावी चिठ्ठी मला मिळाली, लिहिलं होतं, " मला माझं भवितव्य सांभाळलं पाहिजे. " माझ्याजवळ पैसे नव्हते. परवा रात्री इस्तिपळातच आमहत्या करावीसं वाटलं.

खिडकीतून बाहेर उडी मारणार तो पोलिसाची शिट्टी कानी आली. मी भ्याले. मग मी विष प्यायचं ठरवलं. इस्पितळातून निघाले. पावसाला न जुमानता दुपारभर चालत होते. दम तुटल्यावर इथं आपल्याजवळ... "

" बस, एवढंच ! " गोपीनाथ म्हणाला, " काही हरकत नाही. आयुष्य रडत बसण्यासाठी नाही. तुझा पाय घसरला असेल. अनेक कुमारिकांची अशी वंचना होते. स्त्री अन पुरुष दोघांचाही दर्जा समान आहे. जुन्या गोष्टी उगाळण्यात काय हशील ? मी जाऊन तुझ्यासाठी कपडे घेऊन येऊ ना ? "

" कशाला ? "

" माझी पत्नी झालीस म्हणून कपडे लागणार नाहीत की काय ? माझे कपडे तुझ्या कामी थोडेच पडणार आहेत ? "

" नको. हे लग्न योग्य होणार नाही. तुमचे आईवडील काय म्हणतील ? तुमच्या मित्रांनाही हे पसंत पडणार नाही. "

" पण लग्न मला करायचंय. आई-वडिलांपैकी मला फक्त आई आहे. माझ्या इच्छेविरुद्ध तिनं दुसरं लग्न केलंय. भाऊ नाहीच, एक बहीण आहे, तिचं लग्न केव्हाच झालंय. मी आहे सडाफटिंग, पैसा-अडका काही नाही. शिक्षण इंटरपर्यंत झालंय. माझं सारं धन म्हणजे वर्तमानपत्र, ऑफिसचा चपराशी, मॅनेजर, संपादक – सर्व काही मीच. म्हणून कुणाचा अडथळाही नाही. "

" पण माझ्या मनात प्रेमाला आता स्थान नाही. मी कुणावर प्रेम करूच शकत नाही "– शारदा म्हणाली.

" शारदा ! तू माझ्यावर विश्वास तर ठेवू शकतेस ?"

शारदेने रडत रडत होकारार्थी मान हलवली.

रजिस्ट्रारकडे जाऊन ते पतिपत्नी बनले. दोघांनी एकत्र फोटो काढला आणि तो वर्तमानपत्रात छापून टाकला. शारदेच्या वडिलांना आणि त्या कवीला त्या अंकाची एकेक प्रत पाठवून दिली.

शारदेचे आईवडील गोपीनाथ आणि शारदा यांना आशीर्वाद द्यायला आले. साहित्यसंमेलनाचा अध्यक्ष म्हणून आलेल्या त्या कवीला गोपीनाथने त्याच दिवशी पाहिले. गोपीनाथ वक्त्यांपैकी एक होता. भाषणे संपल्यावर हारांचा ढीग उचलताना उदास स्मित करून कविराज गोपीनाथला म्हणाले, " संपादक महाराज, आपला विवाह अलीकडंच झालाय नं ? "

" हो. "

" त्या बाईला आपण आधीपासून ओळखत होतात ! "

" नाही. "

" तिनं लिहिलेली पुष्कळ प्रेमपत्रं एकाजवळ आहेत. "

" शारदेनं मला हे सांगितलंय. "

" लग्नापूर्वी मूल झाल्याची गोष्टही ! – "

" सारं काही. "

" तिनं हेसुद्धा सांगितलं असेल की ती ' सेकंड हॅंड ' माल आहे ! नाही का ? " कविराज हसले.

गोपीनाथने स्मित केले. " शारदेनं मला हेही सांगितलं होतं अन तिला अनाथ करणाऱ्या कवीचं नावही सांगितलंय. "

कवीचा चेहरा काळाठिक्कर पडला. हसत हसत गोपीनाथने त्याचा निरोप घेतला.

कवी भेटल्याची बातमी गोपीनाथने शारदेला सांगितली नाही. दुःख उत्पन्न करणारी बातमी कशाला सांगायची ? एरवी ती खुशीत आहे. घरातली फुटकळ कामे असोत, स्वयंपाक-पाणी असो किंवा टपालात टाकण्यापूर्वी वर्तमानपत्राच्या घड्या करावयाच्या असोत – सर्व कामात ती वाकबगार आहे; पण तिच्या मनाला एक भावना कुरतडत असते – " माझ्या हृदयात प्रेम नाही. मी कोणावर प्रेम करू शकत नाही. "

वारा घोंघावत होता आणि पाऊस कोसळत होता. त्या आवाजात गोपीनाथ शारदाचे बोलणे ऐकत होता, ती विचारीत होती, " माझ्याशी लग्न का केलंत ? "

गोपीनाथ छत्री घेऊन जायला निघाला. शारदेशी बोलायला आतल्या खोलीत गेला तो त्याला दिसले, – ती हमसाहमशी रडत आहे. गोपीनाथच्या मनात आले की तिला उचलून तिचे चुंबन घ्यावे; पण तिचे आपल्यावर प्रेम नाही हे आठवून तो थबकला. म्हणाला, " मी छापखान्याकडं जाऊन येऊ ? "

शारदा रडत म्हणाली, " आल्यावर तुम्हांला मी इथं दिसणार नाही. "

" कुठं जाशील ? "

" कुठंही "

" इथं कोणतं दुःख आहे ? "

" दुःख ! " तिचे काळीज थरारले. " कोणतंच नाही. "

ती ऊर फुटल्यासारखी रडू लागली. गोपीनाथने तिच्या जवळ जाऊन तिचा हात

हातात घेतला.

" मला शिवू नका – मी भ्रष्ट आहे –"

" भ्रष्ट ! तू हे काय म्हणतेयस ?"

" काही नाही. मला मरू द्या."

" मरावंसं वाटतं ? शारदा, तुला कसलं दुःख आहे ? "

" ओह ! कसलंच नाही " तिचा गळा दाटून आला. " हे घृणास्पद जीवन मला सहन करवत नाही."

" तुझं जीवन कुणी घृणास्पद केलं ? "

" तुम्ही. "

" मी ! " गोपीनाथला शब्द सुचेनात.

" हो, तुम्ही. " ती रडत रडत म्हणाली, " तुम्हांला मी आवडते का ? "

" मला ? तुलाच तर माझी घृणा येते. "

" मी-- " वेदना असह्य झाल्यागत तिने गोपीनाथचा आधार घेतला. त्याच्या छातीवर चेहरा लपवीत ती स्फुंदू लागली. " मी ... तुम्हांला ... माझ्या ... प्राणांपेक्षा ... जास्त... "

# दुकानाची किल्ली

**—पोन्कुन्नम वर्की**

वर्गीस आणि कोशी यांनी भागीदारीत दुकान टाकले. बरेच दिवस त्याची पूर्व-तयारी चालली होती. रोजच्या वाढत्या खर्चाची तोंडमिळवणी, घरभाडे आणि शेती यांतून होणाऱ्या उत्पन्नाने भागेना. 'रुपया फेकला की रुपया मिळतो.' वर्गीसने सल्ला दिला. घर आणि शेत गहाण ठेवून कोशीने साडेसातशे रुपये कर्जाऊ आणले. वर्गीसनेही तितकीच रक्कम उभी केली. किराणामालाचे दुकान उघडले. सुदैवाने रेशनचे कामही त्यांना मिळाले. त्यामुळे व्यापार उत्तम चालू लागला.

दुकानावर येऊन कोणी आपल्या अडचणींचा पाढा वाचला की त्यावर कोशीचा चटकन विश्वास बसायचा, त्यामुळे तो दुकानावर बसायला लायक नव्हता. त्याचा कोणावरही चटकन विश्वास बसायचा. उलट वर्गीस लोकांवर सहसा विश्वास टाकीत नसे. खऱ्याखोटया अडचणी सांगून त्याची सहानुभूती मिळविणे केवळ अशक्य होते. दुकानातले सामान गरजूंना वाटायला तो मुळीच तयार नव्हता. तो एका पैशाचाही माल उधार देत नसे. लोकांनी उधारीवर माल मागू नये म्हणून 'आज रोख उद्या उधार' यांसारख्या अनेक पाट्या त्याने दुकानात टांगल्या होत्या. "उधार दिलं नाही तर सुरुवातीला लोक नाराज होतील; पण नंतर सगळ्यांना त्याची सवय लागेल. उलट उधार दिलं तर आपल्यावर आयुष्यभर खट्ट व्हायची वेळ येईल." हे वर्गीसचे व्यापारशास्त्र होते.

दुकानावर वर्गीसच बसायचा. रेशनचे सामान आणण्याची व्यवस्था कोशीकडे होती. नेण्या-आणण्याच्या खर्चाचा हिशोब तो वर्गीसला द्यायचा. "ओह ! हे सगळं कशासाठी ? इतकं सविस्तर कशाला लिहितोस ? एकूण खर्च सांगितलास म्हणजे झालं." पण कोशीने आपला क्रम सोडला नाही. कारण, मित्राला आपल्याविषयी थोडासुद्धा पैशाचा संशय येऊ नये, अशी त्याची इच्छा होती.

दोघेही बरोबरीचे भागीदार असले तरी लोक 'वर्गीसचे दुकान, वर्गीसचे दुकान' असेच म्हणत. कोशीने ही गोष्ट मनावर घेतली नाही; पण कोशीच्य

पत्नीला हे रुचले नाही. कधीकधी ती कोशीला छेडायची. "तू लक्ष देऊ नकोस. लोक आपल्या सोयीसाठी तसं म्हणत असतील." त्याने बायकोला समजावले.

"पण 'कोशीचं' असं म्हणणं किती सोपं आहे!" ती कोशीला म्हणाली.

तिच्या म्हणण्यात तथ्य असले तरी कोशी जात्याच इतका शांत होता की तो त्याकडे दुर्लक्ष करायचा, बायकोचा संशय किती शुद्र आणि मैत्री हे जीवनातले किती मोठे क्षेत्र. वर्गीसवर कोशीचा फार विश्वास होता. तो दुकानात माझ्यापेक्षा जास्त खपतो. हिशोब चोख ठेवतो. कोशीच्या मनात आले. "मी कमीत कमी बिडी तरी पितो. वर्गीसला तीही लागत नाही."

त्याची कोणाशी विशेष दोस्ती नाही. व्यापार आणि हिशोब यांचेच दुसरे नाव वर्गीस. देण्या-घेण्यात आणि गिऱ्हाइकाशी वागण्याच्या चतुराईत तो कोशीच्या दुप्पट हुशार होता.

एके दिवशी वर्गीसबरोबर कोशीही दुकानात बसलेला होता. त्या वेळच्या रेशनच्या सामानात फार कचरा होता. "हे लोकांना कसं विकता येईल? आपण हे गाईला चारावं. झालं", कोशी म्हणाला.

"माणसाचं पोट भरल्यावर जनावरांचा विचार होतो," वर्गीस म्हणाला, "माणसानं खाण्यालायक नसेल तर हे सरकारनं का दिलं. अन रेशनिंग ऑफिसर आल्यावर आम्ही हिशेब कसा देणार?" ऐकणाऱ्या सर्वांना वर्गीसचे म्हणणे पटले, कोशीला गप बसावे लागले.

एका गिऱ्हाइकाने सव्वाशे ग्रॅम कांदे मागितले. वर्गीसचे हात मोकळे नव्हते. तो चांगले आणि खराब तांदूळ मिसळण्यात गुंतला होता. असे केले नाही तर खराब वस्तू कोण विकत घेणार? सगळ्यांची नजर चांगल्या मालावर असते. कांदे तोलायला कोशी तराजूजवळ आला. वर्गीसने तराजूकडे पाहिले. तराजू ज्या साखळीला टांगलेला होता, तिला कांदा खोचला की तराजूचे सन्तुलन नीट यायचे. कोशी तसे न करताच कांदे तोलू लागला. त्यामुळे चारपाच कांदे जास्त दिले जाणार होते. वर्गीस ते पहात होता. "नाही, नाही. त्या साखळीत एक कांदा खोचा." वर्गीसने कोशीला आदेश दिला. घाम आल्याने तो उठून उभा राहिला. शर्ट काढताना खिशातली किल्ली 'छन्न' आवाज करीत खाली पडली.

## २

त्या वेळचे रेशन आणायला वर्गीस गेला होता. रेशन आणताना इतरही अनेक

गोष्टी पहाव्या लागतात. सरळ स्वभावाचा कोशी त्या सांभाळू शकत नसे. वर्गीस रेशन आणायला गेला असता कोशी दुकानावर आला. दुकान बंद होते. कारण किल्ली वर्गीसजवळ होती !

कोशीला वाटले, आपला त्रास वाचावा म्हणून वर्गीस रेशन आणायला गेला आहे आणि दुकान बंद असण्याचेही तेच कारण असावे. लहानशी तर बाब आहे. त्या वेळच्या रेशनमध्ये नऊ पोती तांदूळ होता. त्यांतली सहा पोती त्याने तेथेच बदलून घेतली होती. त्यामुळे दोनशे चाळीस रुपये हातात पडले. वर्गीसच्या हाताला धूळ लागलेली नव्हती. अंगातून घाम आला नव्हता की थकवाही आलेला नव्हता. लोकांना रेशन देताना वर्गीसने समजावले. "या कांग्रेसवाल्यांचं राज्य असल्यामुळं आपला देश उजाड झाला आहे."

रेशनचे दुकान उत्तम चालले होते. कोशीची इच्छा होती की झालेल्या उत्पन्नातून थोडी रक्कम वाचवून ठेवावी. आपला हजार रुपयांचा विमा उतरवावा अशी इच्छा त्याने वर्गीसला बोलून दाखविली. त्यावर वर्गीस ताकीद दिल्याप्रमाणे म्हणाला, "एकदोन वर्ष रेशनचं दुकान चालू दे. आपणच पैसे वाटून घेतले तर दुकान बुडेल, रुपया फेकूनच रुपया मिळतो."

वर्गीसचे म्हणणे कोशीला पटले. दुकान असेच चालवावे लागते. हे वर्गीसचे म्हणणे बरोबरच आहे. गरज पडली तर मी दहा रुपयेसुद्धा उचलू शकतो. दोन वर्षांनी नफा वाटून घेण्याचे वर्गीसशी बोलून त्याने पक्के केले.

कोशीच्या पत्नीने तांदूळ आणि मातीचे तेल आणावयाला नोकर दुकानावर पाठवला. त्याला परतायला फार वेळ लागला. मरियकुट्टीने संतापून उशिरा परतण्याचे कारण विचारले.

"आत्ताच तर दिलं !" नोकर उत्तरला.

"तो एवढा मालदार झालाय तर तू परतला का नाहीस ?" मरियकुट्टी संतापून म्हणाली.

दुसऱ्या दिवशीही नोकराला दुकानातून परतायला वेळ लागला. वर्गीस पैसे देऊन विकत घेणारांना वस्तू देत राहिला. नोकर उभा राहून कंटाळला. "इतका उशीर झालाय– काकी काय म्हणतील !" काकीच्या संतापाचा त्याला चांगलाच अनुभव आहे. तो तसाच परतला. त्या दिवशी मरियकुट्टीने अकांड-तांडव केले.

बायकोला समजावीत कोशी म्हणाला, "दुसरं काही कारण असेल. तू नोकरावर विश्वास ठेवू नकोस. दुकान आमचं आहे. सामानही आमचंच आहे. गिऱ्हाकांची

गर्दी झाली असेल तर आपण थांबलंच पाहिजे."

" हे चालणार नाही. हा काही दोनतीनदाच घडलेला प्रसंग नाही. त्याला काय वाटतं की तो या वस्तू फुकट देतोय ?" मरियकुट्टीने विचारले.

कोशीने विचारल्यावर वर्गीस सारवासारव करीत म्हणाला, " मला तो सुरुवातीला दिसला नव्हता. रेशनचं दुकान आहे ना.! केवढी गर्दी असते. माझं नोकराकडं लक्ष जातं तो तो घराकडं वळला. त्याला उशीर होत होता तर हव्या असलेल्या वस्तू त्यानं स्वत: घेऊन जायच्या. मी काय त्याचा हात पकडणार होतो ? तांदूळ अन इतर वस्तू वर्गीसने दुसऱ्या नोकराच्या हाती कोशीच्या घरी पाठविल्या. एकीकडे वर्गीसला इतकी मेहनत करावी लागत होती तर दुसरीकडे कोशीला बायकोची आणि वर्गीसची बोलणी ऐकावी लागत होती.

" तू स्वत: नाहीतर तुझा माणूस दुकानावर बसला पाहिजे." कोशीला वेळ मिळायचा तेव्हा तो दुकानावर बसायचा. बायकोचा हट्ट ! रेशन अजूनही वर्गीसच आणी. रेशन आणायला जाताना वर्गीस दुकान बंद करून किल्ली आपल्या बरोबर घेऊन जायचा. कोशीचा काही इलाज चालत नव्हता; पण ही गोष्ट कोशीच्या बायकोला सहन होत नव्हती. पण कोशीला टोकण्याव्यतिरिक्त ती काय करू शकत होती ?

बायकोच्या हट्टामुळे तो लागोपाठ काही दिवस दुकानावर बसला. तिने वर्गीसला सतत काम करताना पाहून तो संकोचायचा. वर्गीसने काही नियम केले होते. कोशीने काहीही करावयाला घेतले की ते नियमाला सोडून व्हायचे. कारण, कोशीला ते नियम नीटसे माहीत नव्हते. एक गिऱ्हाईक कोशीकडे साखर घ्यायला आला. त्याला दोन पौंड साखर मिळायला हवी होती. कोशीने कार्ड पाहून साखर तोलायला कागद उचलला. आपल्या मित्राला धोका देणाऱ्या त्या गिऱ्हाइकाची वर्गीसला घृणा आली.

" अरे ! साखरेशिवाय काय घशाखाली घास उतरत नाही ?" वर्गीस म्हणाला, " जा. मला माहीत आहे तुला आता साखरेची जरुरी नाही. औषध पाहिजे असेल, तर इकडं ये." वर्गीसने त्या गिऱ्हाइकाला सरळ घरी हाकलले. कोशीने त्याला दोन पौंड साखर दिली असती.

वर्गीसला गिऱ्हाइकाची पारख होती आणि त्यांच्याशी वागण्याचे त्याचे कौशल्य अजोड होते. कोशीत इतर अनेक गुण असले तरी वर्गीसच्या कार्यक्षमतेचा स्पर्शसुद्धा त्याला झालेला नाही. ग्रामअधिकाऱ्याचा नोकर साखर मागायला आला. साखर

दिल्यावर कोशीने पैसे मागितले. वर्गीस म्हणाला, " नाही, नाही, साहेबांचा माणूस आहे. त्याच्याकडून पैसे घेतले तर फार त्रास होईल."

खरे सांगावयाचे तर दुकानदारीसाठी लागणारे चातुर्य कोशीपाशी नाही. त्याला हिशोबही नीट लिहिता येत नाही. म्हणूनच त्याला प्रश्न पडतो की 'आपण दुकानात कशाला बसायचं ? मित्रावर नजर ठेवायला बसणार असलो, तर ते फार वाईट.' दुकानदारी हे आपलं क्षेत्र नव्हे. हे कोशीला आता पक्के कळले होते.

वस्तू कापायला दुकानात एक चाकू होता. त्याचे दोन्ही भाग सारख्या लांबीचे होते. त्याची धार दोन-तीन ठिकाणी तुटली होती. त्याची मूठ एका दोरीने बांधून ती दोरी टेबलाच्या पायाला बांधलेली होती. " इथं येणाऱ्या सगळ्या लोकांवर आपण विश्वास ठेवीत नाही !" चाकू हातात घेत कोशी म्हणाला.

" ठीक आहे, येणाऱ्यावर विश्वास ठेवायला हे काय चर्च आहे ? मोठ-मोठ्या रेस्टॉरंटमध्ये आगपेटीची काडी आत ठेवतात आणि गरज पडल्यावर सगळ्यांना देतात, ते का ? बँकेत अन इतर सार्वजनिक ठिकाणी पेन्सिल-टाक बांधून ठेवतात ते कशासाठी ? या दुकानाला कुलूप तरी का लावतो ?" वर्गीसने विचारले. पहिल्यांदा सर्वांवर विश्वास ठेवावा हेच योग्य आहे; पण इतरांवर अविश्वास का दाखवावा याचे पुरावे देणारा वर्गीस किल्ली कधी विसरत नाही. नेहमी जवळच बाळगतो.

३

त्या दिवशी चर्चमध्ये मेळा होता. वर्गीस आणि कोशीच्या घरचे सर्व लोक उपस्थित होते. पाद्र्याने बायबलातील वचनांच्या आधारे एक सुंदर भाषण दिले. कोशीच्या बायकोची नजर वर्गीसच्या बायकोच्या गळ्यातल्या माळेवर आणि अंगठीवर होती. आपला नवरा दुकानात जाऊन बसत नसल्यामुळे वर्गीसला होणारा फायदा वर्गीसच्या बायकोच्या दागिन्यांवरून तिच्या लक्षात येत होता. वर्गीसच्या मुलांच्या अंगावरही उत्तम कपडे होते. मरियकुट्टीला हे सहन झाले नाही. तिच्या हृदयात घृणा आणि संताप यांनी थैमान घातले. चर्चमधील कार्यक्रम संपण्याआधीच ती उठून आली.

काही दिवसांनी एका लग्नसमारंभात दोघा मित्रांच्या बायकांची पुन्हा गाठ पडली. स्त्री आपल्या पतीसाठी सर्व काही सहन करू शकते; पण दुसऱ्या स्त्रीच्या सौंदर्याची वाढती कला तिला सहन होत नाही. वर्गीसची बायको मरियकुट्टीसारखी

सुंदर आणि आकर्षक नव्हती. त्यामुळेच वस्त्राभूषणे आणि सौंदर्यप्रसाधने यांवर तिचा भर होता. ती खूपच नटलीथटली होती. तिच्या पायात सापाच्या कातडीच्या चपला होत्या.

टेंगण्या, लठ्ठ आणि चप्पल घातल्यामुळे अनोळखी वाटणाऱ्या स्त्रीची चाल पहाणे आणि धुतलेल्या कपड्यात लपलेल्या किड्याचे चावणे सारखेच संतापजनक असते. सुंदर स्त्रीवर नजर खिळून राहाणे निराळे आणि सामान्य स्त्री सुंदर समजणे निराळे. दुसरा प्रकार असह्य होतो. वर्गीसच्या बायकोचा नट्टापट्टा पाहून मरियकुट्टीसारख्या स्त्रिया हसल्या तर त्यांत त्यांचा काही दोष नाही. वर्गीसच्या बायकोची साडी, दागिने आणि घड्याळ यांवर मरियकुट्टींची दृष्टी काळ्या भुंग्याप्रमाणे जाऊन पोचली. तिच्या साडीच्या किंवा दागिन्यांच्या किंमतीची चौकशी इतर कोणी केली नाही, तर ती आपणहोऊनच तो विषय काढायची. वर्गीसच्या बायकोचे कपडे आणि दागिने या विषयावर कोणाशीतरी बोलेपर्यंत तिच्या जिवाला संतोष होत नसे. एखादा दिवस तसाच गेला तर रात्री तिला झोप येत नसे.

वर्गीसच्या बायकोचाही गप्पांसाठी एक कंपू होता. तीन-चार स्त्रिया उभ्याउभ्या दागिन्यांविषयी बोलत होत्या. त्यांच्याजवळच उभी असलेली मरियकुट्टी दुसऱ्या बाईबरोबर गप्पा करीत होती. वर्गीसच्या बायकोची थट्टा करून तिला टोचणाऱ्या गोष्टी ती सांगत होती. दोघींचा इतका निकट संबंध असला, तरी त्या एकमेकींना ओळखही देत नसत. वर्गीसची बायको आपल्या मैत्रिणींना दागिने आणि चप्पल यांच्या किंमती सांगत असताना मरियकुट्टी आपल्या मैत्रिणीला म्हणाली, " नायरची शेती आहे तर त्याच्या बायकोजवळ पैसे असतीलच. मला एक काळी माकडीण मिळाली तर मीदेखील तिला छान कपडे घालून सजवलं असतं. "

अशा तऱ्हेचे टोमणे वर्गीसची बायको काही वेळ ऐकत राहिली; पण असह्य झाले, तेव्हा ती म्हणाली, " अरे, माकडीण बाहेर कशाला शोधतेस? तुझ्या घरातच तर आहे. डोळे फुटले असतील तर औषध का घालत नाहीस? माझ्या नवऱ्यानं दिलेल्या वस्तू आहेत. पुरुषच स्त्रियांना उत्तमोत्तम वस्तू देतात. तू जाऊन......"

त्या दोघींचा वादविवाद वाढला. काही समजूतदार स्त्रियांनी दोघींना शांत केले.

४

जुलै महिन्याच्या तीस तारखेला वर्गीसने कोशीला एक हजार रुपये दिले.

" आपापल्या रकमेतून आपण एकेक हजार रुपये परत घेऊ या. सात-आठ महिन्यांत रेशनमधून काही उत्पन्न झाले नाही. तरीही एक-दोन हजार उचलल्याने काही नुकसान होणार नाही. मला तुला एक गोष्ट सांगायची आहे. आपल्या बायका आपसांत फार वाईट बोलतात. हे बोलणं आपणच थांबवू शकतो. मी तुला स्वप्नातही धोका दिला नाही; पण तुझी बायको भलतंसलतं वडबडत असते !" सुजलेली डावी दाढ दाबीत वर्गीस म्हणाला.

शरमेने कोशीने खाली मान घातली. आपल्या बायकोच्या वर्तनाने तो शरमला. " मी तुझ्याविरुद्ध कोणताही विचार कधी मनातही आणला नाही. बायका काही-बाही बोलत असतील. आम्ही त्याकडं लक्ष का द्यावं ?" कोशी म्हणाला.

घरी आल्यावर कोशीने विचार केला–साडेसातशे रुपयांच्या भांडवलावर व्यापार सुरू केला होता. दुकानांतल्या वस्तू हजारो रुपयांच्या असतील. आता एक हजार रुपये मिळाले आहेत. कोशीने बायकोला खूप दाटले.

पत्नी म्हणाली, " मी बोलल्यानंच तुम्हांला त्रास होतो ना ? दुसरं कोण काय म्हणालंय ? तुम्हांला आताही अक्कल येत नसेल, तर मला काहीच म्हणायचं नाही. हजारो मडक्यांची तोंडं झाकता येतात पण कोणा एकाचं तोंड बंद करता येत नाही."

" महामाये ! मडक्याचं नव्हे तर तुझं तोंड उघडू नकोस हा माझ्या म्हणण्याचा अर्थ आहे." कोशीला घृणा वाटली. कोणी कोणी वर्गीसविषयी बोलत– कोशी बिचारा साधा आहे. वर्गीस त्याला नक्की बुडवणार– भागीदारीचा व्यवहार चांगला नसतो, 'आपलं काम आपण करावं हेच शेवटी फायद्याचं,' वगैरे वगैरे.

लोकांचे संशयी मानसशास्त्र वर्गीसला माहीत होते. ज्यांची डाळ माझ्याजवळ शिजणार नाही, ते माझ्याविरुद्ध उभे रहातील, जनमत पाण्यावर तरंगणाऱ्या लाकडासारखे असते, असे त्याने वाचलेही होते.

वर्गीसच्या वडिलांचे श्राद्ध झाले. त्याने विचार केला, घरचे रेशनचे दुकान असताना मी काय चार-पाच माणसांना जेवण देऊ शकत नाही ? त्याने आपल्या गावातील अनेक लोकांना बोलावून उत्तम मेजवानी दिली. आजारी पडल्यावर नवस फेडण्याचे ठरविले. चर्चमध्ये त्याने एक क्रॉसही बांधला. त्याचे उद्‌घाटन झाले तेव्हा तीन मोठे आणि चाळीस साधारण दर्जाचे पाद्री उपस्थित होते.

रेशनच्या दुकानाची वाढ होत होती; पण स्वतःवर उपचार करणे अवश्य झाले होते. सहा-सात महिन्यांपूर्वी दाढदुखी सुरू झाली होती. हिरड्यांवर सूज आलेली

होती. डॉक्टरांनी कॅन्सर झाल्याचे सांगितले. ते ऐकल्याबरोबर वर्गीस चमकला. शस्त्रक्रियेच्या भयाने तो आयुर्वेदिक औषधे घेत होता. पथ्यपाण्याने शरीर दुबळे झाले होते. दुखणे वाढले होते.

डॉक्टर म्हणाले, " त्रिवेन्द्रमला जाऊन या. इंजेक्शन बदलल्यानं फायदा होईल. मी पत्र देतो. "

रोग इतक्या जलद वाढेल असे वर्गीसला वाटले नव्हते. दुसरा उपाय नव्हता. वर्गीस त्रिवेन्द्रमला गेला. त्याच्या बरोबर कोशीही गेला.

" भागीदारी व्यापारात आहे. त्याच्या दुखण्यातही भागीदार व्हायचंय का ? " कोशीच्या बायकोने विचारले.

" काही दिवस इथंच ठेवा, मला फारशी आशा नाही. " डॉक्टर म्हणाले. डॉक्टरांचे मत ऐकताच वर्गीसचे प्राण कंठाशी आले.

दुकान उघडून रेशन वाटले नाही तर लोक गडबड करतील असा विचार करून कोशी घरी परतला. वर्गीसला सहमत व्हावे लागले. त्याच्या शुश्रूषेची सगळी व्यवस्था कोशीने केली.

कोशीनं परतायची परवानगी मागितली तेव्हा त्याचे हात हातात घेऊन वर्गीस अश्रू दुसू लागला. हे करुण दृश्य होते. कोशीच्या डोळ्यांत अश्रू आले नाहीत पण त्याचे हृदय उचंबळून आले. आपल्या मित्राचे प्राण वाचविण्यासाठी कोशी सर्व काही करायला तयार होता.

" मूर्खपणा करू नकोस. इतकं भ्यायचं काही कारण नाही. आल्या संकटांना तोंड दिलं पाहिजे. " कोशी त्याचे सांत्वन करीत म्हणाला.

" मी तुझ्या बाबतीत... " रुद्ध कंठाने वर्गीस म्हणाला, " पुष्कळ अपराध केले आहेत. परमेश्वरासाठी मला क्षमा कर. माझ्या मुलांना छळू नकोस. "

कोणते अपराध ? या भल्या माणसाने कोणते अपराध केले ? कोशीच्या ध्यानात काही येईना.

कोशी घरी परतला. दुकान पहाताच त्याला किल्लीची आठवण आली. किल्ल्यांचा जुडगा वर्गीसजवळ होता. वियोगाच्या हृदयविदारक क्षणी तुच्छ किल्लीची आठवण कोशीला झाली नाही, वर्गीसही द्यायची विसरला असेल – त्याला वाटले. लोहाराला बोलावून कुलूप फोडण्याशिवाय दुसरा उपाय नव्हता; पण कोशीने विचार केला, असे करणे योग्य होणार नाही. काही पैसे जमा करून त्याने रेशन विकत आणले व ते दुकानाच्या ओसरीवर ठेवून वाटले, अनेकांनी कोशीला विचारले,

" दुकान उघडायला काय हरकत आहे ? "

कोशी गप्प राहिला, हरकत काहीच नाही; पण कुलूप फोडल्याशिवाय दुकान उघडणे शक्य नव्हते. हा कोशीसमोरील यक्षप्रश्न होता. त्याला कुलूप फोडायचे नव्हते.

काही दिवसांनी त्रिवेन्द्रमहून डॉक्टरांची तार कोशीला मिळाली. तो लवकरच तिथे पोचला. त्याच्याबरोबर वर्गीसची बायकोही होती.

सगळी चिकित्सा निष्फळ ठरली. हे लोक पोचले तेव्हा वर्गीस मृत्युशय्येवर होता.

वर्गीसच्या पत्नीने हंबरडा फोडला. मित्राची दशा पाहून कोशीने अश्रू पुसले. वर्गीस अखेरचे क्षण मोजीत होता.

" लवकर घेऊन जा ! " डॉक्टर म्हणाले.

कोशीने आपल्या मित्राला टॅक्सीतून घरी आणले, घरी आल्यावर दुसऱ्या दिवशी वर्गीसने आपल्या घराचा, बायकोचा, मुलांचा, कोशीचा आणि दुकानाचा अखेरचा निरोप घेतला.

यथायोग्य अन्त्यसंस्कार झाला. पाद्र्याने जवळजवळ अडीच तास मृताचे गुण-संकीर्तन केले. चर्चला क्रॉसची देणगी देणाराविषयी त्याच्या मनात केवढा आदर होता !

त्याच्या विधवा पत्नीला कोशी अत्यंत आदराने वागवीत होता. पितृछत्र हरव-लेल्या मुलांशीही कोशी वात्सल्याने वागला. जगात मित्रापेक्षा थोर काही नाही, कोशीची भावना होती.

रेशनच्या दुकानाची किल्ली कोशीला वर्गीसच्या मृत देहावर मिळाली.

कोशी आपला सगळा वेळ दुकानाला देऊ लागला. हिशोबाच्या वह्या तिथे नव्हत्या. वर्गीस रोज रात्री घरीच हिशोब लिही. त्यामुळे वह्या वर्गीसच्या घरीच होत्या.

आपल्या पालकाला वागवावे तशा आदराने वर्गीसच्या पत्नीने कोशीला वागविले. तिचे शत्रुत्व कोशीच्या बायकोशी होते, कोशीशी नव्हे.

त्या दिवशी रविवार होता. चर्चला गेल्यावर कोशी स्मशानात गेला. तेथे वर्गी-सच्या थडग्याजवळ थोडा वेळ मौन पाळीत उभा राहिला. त्याच्या डोळ्यांतून अश्रू ठिबकले. तृषार्त जमिनीने ते अश्रू पिऊन टाकले. " कोशी ! मी पुष्कळ अपराध केले; परमेश्वरासाठी मला क्षमा कर, माझ्या मुलांना छळू नकोस. " वर्गीसचे हे शेवटचे शब्द कोशीच्या कानांत घुमत होते. वर्गीसने कोणते अपराध केले ? कोणताही

नाही, तो सहजच म्हणाला असेल.

कोशीला हिशोबाच्या वह्या हव्या होत्या. सुटचा कागदांवर हिशोब किती दिवस लिहिणार ? हिशोब द्यायसाठी नसो, पण घ्यायसाठी तर हिशोब हवाच. काही दिवस असेच गेले. एके दिवशी हिशोबाच्या वह्या आणायला त्याने वर्गीसकडे माणूस पाठविला, त्याने मुश्किलीने वह्यांचा गठ्ठा मिळवला आणि आणला. इतक्या वह्या ! कोशीला आश्चर्य वाटले त्याने त्या पाहायला घरी आणल्या.

रात्री तो त्या तपासू लागला. प्रत्येक पान उलटले की कोशीच्या हृदयातून वेदनेची कळ यायची, नवऱ्याला दिव्याजवळ पाने उलटताना पाहून त्याची बायको हसली. ती पाने पाहिली असती तर कोशी नाराज झाला असता. वह्यांतील रहस्य कोशीच्या ध्यानात येऊ लागले आहे, हे तिच्या लक्षात आले. त्यामुळे ती मनोमन सुखावली.

" कोशी मी फार अपराध केले आहेत. परमेश्वरासाठी मला क्षमा कर. माझ्या मुलांना छळू नकोस... " तेच वाक्य

काही व्यापाऱ्यांचे दोन हिशोब असतात. एक खरा आणि दुसरा सरकारची दिशाभूल करणारा. भागीदाराला फसविण्यासाठी तिसरा हिशोब.

कोशीला जणू सापाच्या जिभांचा स्पर्श झाला. मी अजून जिवंत आहे ? त्याला शंका वाटू लागली. जग अंधाराने भरलेले आहे. त्याला वाटले, या अंधारातच आपण बसकण मारली आहे. दुकानाच्या रकमेतून वर्गीस चार हजारांचा 'चिट फंड' चालवीत होता. आपल्या बायकोच्या नावावर सहा हजार रुपये लिहून ते स्वतः-जवळच ठेवले होते. वर्गीसची पहिली रक्कम पाचशे होती. कोशीच्या घरसामाना-प्रीत्यर्थ तीन हजार लिहिले होते. अंधारलेल्या आकाशात चंद्रोदय होतो, पण कोशीला झोप येत नाही. तो या कुशीवरून त्या कुशीवरच तळमळत पडला आहे.

" तुम्ही झोपत का नाही ? " मरियकुट्टी विचारते.

" ...... "

" का झोपत नाही ? " दुसऱ्यांदा प्रश्न.

" झोप येतच नाही. "

" झोप न यायचं मला तरी काही कारण दिसत नाही. "

" काही आठवतोय. "

" इतकं चिंतामग्न व्हायचं काय कारण आहे ? मुलांना पाठवायला पैसे नाहीत ? की सावकार दारात तगादा लावताहेत ? "

बायकोच्या प्रश्नांनी कोशी लज्जित झाला, थोडा वेळ गप्प राहून म्हणाला
"तू म्हणाली होतीस, ते सगळं खरं आहे."

"काय ?"

"वर्गीसविषयी"

"मला तर आधीपासूनच माहीत होतं. सात वर्षं भी आईचं दूध पीत होते. आता तर विश्वास बसला ?" मरियकुट्टी म्हणाली.

"हो बसला."

"आधीच बसला असता तर ...!"

बराच वेळ गप्प राहिल्यावर कोशी म्हणाला, "ते शक्य नव्हतं. माझ्यानं तसं जमलं नसतं. प्रथम विश्वास ठेवला पाहिजे."

"पण तुमच्या साथीदाराचा तुमच्यावर विश्वास नव्हता. त्याचा कुणावरही विश्वास नव्हता."

"हो, त्याचा स्वभावच तसा होता. मृत्यूनंतर आता तरी तो विश्वास ठेवीत असेल का ?" कोशीच्या बायकोला हसू आले.

कोशीला ते सहन होत नव्हते.

दुसऱ्या दिवशी कोशी उशीरा झोपेतून उठला. पोस्टमन विमा कंपनीचे पाकीट देऊन गेला. वर्गीसने दोनशे रुपयांची छोटी पॉलिसी आपल्या धाकट्या मुलाच्या नावे घेतली होती.

कोशीने वर्गीसच्या बायकोला बोलवायला माणूस पाठवला. तिला त्याच्या घरात पाऊल ठेवायची इच्छा नव्हती; पण त्या विधवेला आपल्या पालकाकडे जाणे भागच होते.

"कोशी, मी अपराध केले आहेत. परमेश्वरासाठी मला क्षमा कर. माझ्या मुलांना छळू नकोस." हे वाक्य कोशीच्या कानांत पुन:पुन्हा घुमत होते. कोशी आणि त्याची बायको यांच्यापुढे ती बिचारी विधवा मान खाली घालून उभी होती. तिच्या दिशेने हात पुढे करीत कोशी म्हणाला, "ही दुकानाची किल्ली. आजपासून दुकान तुझं आहे. मला त्याची इच्छा नाही. कारण विचारू नकोस. वाटलं तर दुकान चालव नाही तर बंद करून टाक. आजपासून मी दुकानाशी असलेला सगळा संबंध तोडतोय."

वर्गीसच्या बायकोला किल्ली घ्यायला संकोच वाटला तेव्हा कोशी किल्ली तिच्यापुढे टाकून निघून गेला. आकाश ढगाने काळवंडले होते. तो ढग आता दूर झाला होता. कोशीच्या हृदयावरील एक ओझे उतरले होते.

# वधू

**– एस. के. पोट्टेकाट**

पाऊस थांबल्यावर आकाश थोडे निवळले. आता निसर्गसौंदर्य झगमगत होते. मेघांमागे लपलेली संध्याकाळ मावळतीला आली होती.

पट्टांबी ते कुट्टिपुरम लोहमार्गाच्या दोन्ही बाजूंना असलेली शेते, हिरवळ पांघरलेल्या टेकड्या, फळांनी लहडलेले वृक्ष आणि भारतप्पुषाचा किनारा पहात मी आणि गोपी चाललो होतो.

गोपी तीन महिन्यांची सुट्टी घेऊन मलायाहून माझ्याकडे आला आहे. त्याच्या येण्याचा मुख्य उद्देश आहे, लग्न. गोपी इथून गेल्याला आठ वर्षे झाली. तेव्हापासून पहिल्यांदाच गावाला परत आला आहे. गोपी या गावातील एका जुन्या, प्रतिष्ठित कुटुंबातला आहे; पण आता त्याच्या घरात कोणी नाही. म्हणूनच घर भाड्याने देऊन टाकले आहे. गोपीचा एक मोठा भाऊ मद्रासला कोठे तरी सेल्सऑफिसर आहे. घरची ही स्थिती असल्यामुळे लग्नाची सगळी जबाबदारी त्याने माझ्यावर टाकली आहे. कारण मीच त्याचा वर्गबंधू, मित्र आणि ग्रामवासीही आहे.

आपली भावी पत्नी निवडण्याविषयी जे पत्र गोपीने मला पाठवले होते, त्यात पत्नी कशी असावी ते कळविले होते –– पिकलेल्या केळ्यासारखा रंग, काळे भोर, टपोरे डोळे, चाफेकळीसारखे नाक आणि लांबसडक कुरळे केस. केसांविषयीच्या वाक्याखाली रेघ ओढून त्याने या लक्षणावर भर दिला होता. थोडी उंच असावी – पण फार नाही – आणि शरीर निरोगी असावे; वय सतरा ते वीस असावे. श्रीमंत कुटुंबातली नसावी.

पिकलेल्या केळ्यासारख्या रंगाची मिळाली नाही आणि ती थोडी सावळी असली, तरी चालेल. केस मात्र दाट आणि कुरळेही असलेच पाहिजेत. बाकी सर्व पूर्वोक्त.

गोपीने केलेले वर्णन वाचताना मला तिरूर स्टेशनच्या प्लेटफॉर्मवरील फळविक्याची एकदम आठवण आली. सुंदर स्त्रीचा रंग केळ्यासारखा असला पाहिजे. गोपीचे पत्र मी दोन-तीनदा वाचले. मला वाटले तो चेष्टा करीत आहे. मद्रासला

बी. ए. च्या वर्गात असल्यापासून मी गोपीला जाणतो. त्याचा रसिक परंतु लाजाळू स्वभाव लक्षात घेता बरीच कळ सोसल्यावर त्याने भावी पत्नीचे वर्णन मला लिहिले असावे. मनोराज्यात अशी मूर्ती रेखाटण्याचे कारण ? गोपीने भावी वधूचे वर्णन एखाद्या सिनेनटीसारखे केले आहे. गोपीचा उद्देश आता माझ्या लक्षात आला. मलायातील मल्याळी आणि चिनी मित्रांपुढे आदर्श मल्याळी सौंदर्य त्याला उभे करावयाचे आहे. म्हणूनच केस, नाक आणि रंग यांवर फार भर दिला आहे. तुझा मनाचा मोह फार चांगला आहे, गोपी.

त्याच्या पत्राला उत्तर देताना मी दोन प्रश्न विचारले, " चष्मा असला तर चालेल काय ? आणि संगीताचे ज्ञान असेल तर तू तिला नापसंत करशील का ?"

पण माझे पत्र मिळण्याआधीच तो, भावी पत्नी निवडण्यासाठी, तेथून निघाला. अशी पत्नी मिळावी म्हणून प्रयत्न करणारा पुरुष सामान्य कसा असेल ? पिकलेल्या केळ्यासारखा रंग, केळफुलासारखे नाक, हरिणीसारखे डोळे, इक्षुदंडासारखे लांब आणि कमनीय शरीर धारण करणारी – केस इतके दाट की पसरल्यावर चिनी रेशमाच्या पडद्याचा भास व्हावा पण शरीराचा रंग असा की ज्याच्यापुढे शुभ्र चिनी रेशीम फिक्के पडेल असा.

गोपीच्या अटी ऐकून मी दीर्घ निःश्वास सोडला हे सांगायला नकोच. कारण त्याची इच्छा स्वाभाविक होती. तसे घडले तर देवाची कृपा. गोपीच्या अपेक्षेला उतरेल अशी एक सौंदर्यवती माझ्या ओळखीची होती. ती दोन-तीन मैलांवर राहात असे. सुडौल, उंच बांधा आणि सोन्यासारखी कान्ती ! – कपोल, मस्तक, हनुवटी सर्वच सोनेरी रंगाचे ! विपुल केशसंभार, काळ्या कुरळ्या केसांचा अंबाडा सोडला की केस जमिनीला स्पर्श करतात. तिच्या चालीत मादकपणा आहे. ती चालते तेव्हा टाचेची लाली स्पष्ट दिसते. त्या गंधर्वकन्येलाच मी गोपीसाठी निवडले होते. ती शेतकऱ्याची मुलगी आहे; कुटुंब चांगले आहे पण एक वैगुण्य आहे – ती कुमारिका नाही. सात-आठ वर्षांपूर्वीच तिचे लग्न झाले होते.

नवऱ्याने तिला टाकले होते की तिने नवऱ्याला हे माहीत नाही. त्यानंतर आजपर्यंत तिने कोणाशी लग्न केले नाही. आजकाल सूत कातणे आणि हिंदी शिकणे हीच तिची कामे आहेत. गुरुवायूरप्पनचे चित्र ठेवून ती पूजाही करते. तिच्या मामाला हा शेवटचा उद्योगच फक्त पसंत आहे. तिचे आई-वडील गेलेले आहेत. तिचे नाव आहे अम्मुकुट्टी. मामाला तिचे बाकीचे उद्योग आवडत नसले, तरी ते काही बोलत नाहीत. काही वर्षे अशीच उलटली.

इतका काळ लोटला तरी तिच्या रूपात फरक पडला नाही. सध्या तिचे वय सतरा-अठरा वर्षांचे असेल. हे एकदा कळल्यावर – गोपीच्या म्हणण्याची पुनरुक्ती करण्याची आवश्यकता नाही. याचा चुकीचा अर्थ लावू नका. काही मुली गोल दगडासारख्या असतात. वाढत्या वयाचा पत्ताच लागत नाही. त्यांचे चैतन्य कमी होतच नाही. अम्मुकुट्टीही अशीच एक मुलगी आहे. एकदा ती पाहिली की गोपी पुढे काही बोलणार नाही, हे मला माहीत आहे. अडचण येणारच असेल, तर ती अम्मुकुट्टीकडूनच येईल. ती लग्नाला राजी नसेल तर ? त्यांच्या लग्नाआड येणारे दुसरे कोणतेच कारण दिसत नाही.

गोपी उंच, सावळा पण नाजूक आहे. मलायात राहिल्यामुळे थोडा भरला आहे. त्याचे केस काळेभोर आहेत. फक्त उजव्या कानाजवळचे केस थोडे पिकले आहेत. काय करतो म्हणाल तर मलायात मोठा अधिकारी आहे. 'इस्टेट'च्या कामात दरमहा चांदीचे नऊशे रुपये कमावतो. स्वतःची मोटर आहे आणि काटकसरी असल्यामुळे बँकेत शिल्लकही खूप साचली आहे. आणखी काय हवे ? लग्नानंतर आर्थिक अडचण कधीच जाणवणार नाही. हिंदी शिकणे आणि सूत कातणे फारच आवश्यक असेल, तर ती कामे अम्मुकुट्टी मलायातही करू शकते. गुरुवायूरप्पनचे चित्रही सोबत नेऊ शकते. माझ्या समजुतीप्रमाणे गोपीचाही ईश्वरावर थोडा विश्वास आहे. आम्ही मद्रासला शिकत असताना रोज रात्री निजण्यापूर्वी तो 'श्रीमद्भगवद्गीता' वाचीत असे.

आमचा मुलीच्या घरी जाण्याचा कार्यक्रम तिच्या कुटुंबियांना माहीत नव्हता. मुलगी मुलाला पसंत पडली नाही तर मुलीला आणि तिच्या कुटुंबियांना दुःख होता कामा नये. मुलीच्या कुटुंबाविषयी गोपीलाही काही माहीत नव्हते. मुलगी पसंत पडली तर गोपीला सर्व माहिती सांगावी असा विचार करीत मी गोपीबरोबर चाललो आहे.

आम्ही पायी चाललो होतो.

शेजारच्या शेतात मुसलमान स्त्रिया खाली वाकून भाताची रोपे लावीत आहेत. त्यांनी काळे कापड गुंडाळलेले असून वर पांढरा कुर्ता आहे. दुरून असा भास होतो की जणू शेतात खूप लांब काळे कापड बांधले आहे. चमकत्या अंजनासारखी कान्ती असलेली एक अस्पृश्य प्रौढा दुसऱ्या धानाच्या शेतात एकटीच काम करीत आहे. तिच्या श्यामल वक्षावरील लाल मोत्यांची माळ तिचे सौंदर्य खुलवीत आहे. तिच्या समोरच्या शेताच्या मातीत तिच्या अंगठ्यांचे आकार उमटले आहेत.

गोपी ते शेत पहात चालला आहे. मी म्हणालो, "हे शेत आणि इथलं दृश्य इतक्या वर्षांनीही होतं तसंच आहे. त्यात काही फरक पडला नाही."

" काही फरक पडला नाही – हे म्हणणं चकीचं आहे. कारण सगळीकडं आवर्तनच आवर्तन असतं." गोपीने थांबून माझ्याकडे पाहिले. गोपीचे डोळे काळे आणि टपोरे आहेत. " ठीक आहे, आवर्तनाची गती थांबवायला मनुष्य आणि शास्त्र असमर्थ आहेत. भ्रमण करणाऱ्या विशाल चक्राप्रमाणे आगमन आणि निर्गमन होतं. पुन्हा आगमन होतं. प्रपंच, परमाणू, प्रकृती आणि मनुष्य हे त्या आवर्तनाचेच अंश आहेत." माझ्या ध्यानात आले की तत्त्वज्ञानपर भाषण ठोकण्याचा त्याचा विचार आहे. लाजाळू स्वभावाची व्यक्ती तत्त्वज्ञानी बनली तर वाद घालणे कठीण होते. मी खिशातून एक सिगरेट काढून पेटवली. गोपी सिगरेट पीत नाही.

गोपीचे भाष्य सुरू झाले, " मानवी जीवनातही हे आवर्तन अस्पष्ट रूपानं असतं. आमच्या लहानशा जीवनावरही त्याचा परिणाम होतो; पण तो आमच्या ध्यानात येत नाही."

खालच्या शेतातून मुसलमान स्त्रियांचा एक घोळका येत आहे. कदाचित लग्नाला निघाल्या असतील. नव्या स्त्रीला बोलवायला जात असतील, सायंप्रकाशात त्यांचे हिरवे, पिवळे, निळे आणि लाल रंगांचे रेशमी कपडे इंद्रधनुष्याची शोभा उत्पन्न करीत आहेत.

पुढे चालत असतानाच हातवारे करीत गोपीने आपले भाषण सुरू ठेवले.

आम्ही रेल्वेच्या पुलाजवळ पोचलो, तेव्हा त्या सगळ्या स्त्रिया आपल्या छत्र्या उघडून रुळावर उभ्या राहिल्या.

त्या गेल्यावर मी गोपीला म्हणालो, " हा शुभ शकुन आहे. लग्नानंतर नवी नवरी घरी नेताहेत."

गोपी गप्प रहिला.

नऊ स्त्रिया होत्या – नऊ भाग्यवान आकडा आहे. मी मोजून गोपीला सांगितले.

गोपी या वेळीही गप्पच राहिला. मी त्या लाजऱ्या तरुणाकडे पाहिले तर तो थरथरला. त्याचा चेहरा हळदीसारखा पिवळा पडला आणि डोळे मेलेल्या मासळी-प्रमाणे बाहेर निघाले.

" गोपी ! गोपी..." मी सिगरेट फेकून गोपीला सावरले. सोललेल्या केळ्या-सारखा त्याचा हात थंड पडला होता. आम्ही मद्रासला शिकत असताना त्याला दोन-तीनदा हिस्टेरियाचे झटके आले होते. मला वाटले, आताही गोपीला तसाच झटका आला आहे. मी त्याला सावरीत जमिनीवर बसविले.

पाच मिनिटांनी गोपी सावध झाला. त्याने डोळे उघडले. मलाही समाधान वाटले,

तो हिस्टेरिया नव्हता.

"हीच जागा – हाच पूल." जप केल्याप्रमाणे गोपी म्हणाला. मग हातांनी घाम पुशीत एका बाजूला पाहू लागला. त्याने माझ्याकडे असे पाहिले जणू मी त्याला अचानक भेटलो आहे.

"गोपी, थकवा गेला ?" मी सिगारेट पेटवीत विचारले.

गोपी क्षीण हसला. तो पुन्हा दूरवर पाहू लागला.

ढग बाजूला झाल्यामुळे हळुहळू प्रकाश पसरू लागला आहे.

"गोपी, मद्रासला होत असे, तोच रोग होता का ?"

गोपीने डोके हलवून समजावले, "नाही, तो रोग मलायाला गेल्यापासून झाला नाही."

'मग आत्ता जे झाले, त्याचे नाव काय ?" मी विचारले, "मलायन हिस्टेरिया आहे का ?"

चेहऱ्यावर आलेला सिगरेटचा धूर बाजूला सारीत गोपी गप्प राहिला.

"हीच जागा–हाच पूल. याचा अर्थ काय ? ही जागा तुझ्या ओळखीची आहे ?"

काही उत्तर नाही.

थोड्या वेळाने मातीच्या ढिगाऱ्यावर दृष्टी टाकीत गोपी क्षीण स्वरात म्हणाला, "ती एक जुनी कहाणी आहे. आपण आता बसलो होतो, तिथं माझ्या मृत्यूसारखी एक घटना आठ वर्षांपूर्वी घडली होती." पुन्हा तो विचारमग्न झाल्यासारखा गप्प राहिला.

"सांग, कोणती घटना घडली होती ? केव्हा घडली होती ?" मी घड्याळाकडे पाहिले. साडेचार वाजले होते. रात्रीपूर्वी तेथे पोचायचे असेल, तर दोन तास बाकी आहेत.

ती घटना मला सांगायला गोपीला थोडा संकोच वाटत होता. पुष्कळ आग्रह केल्यावर सांगू लागला, "बी. ए. झाल्यावर एल. टी. करण्यासाठी मी एका खाजगी शाळेत अध्यापकाची नोकरी करीत असे. ती शाळा इथून दोन मैलांवर आहे."

"तू अध्यापक होतास, हे मला माहीत होते; पण तू इथं काम करीत होतास याची मला कल्पना नव्हती. आताच मला हे कळतंय." मी त्याला म्हणालो.

"हो, मी इथंच होतो. तेव्हा तू आपल्या गावात नव्हतास."

"मी नव्हतो खरा. मग काय झालं ?"

"मी एका दुकानावरील खोलीत राहात असे. माझे कोणीच मित्र नव्हते.

संध्याकाळी शाळेतून परतल्यावर शेतात फिरायला जायचा. कधीकधी नदीकाठी जाऊन बसायचा आणि अंधारत असताना परत यायचा. हॉटेलात जेवून रात्री बारा वाजेपर्यंत स्वामी विवेकानंदांचं साहित्य वाचायचा."

" निजण्यापूर्वी तू ' भगवद्गीता'सुद्धा वाचायचास. "

" तेव्हा काय आणि आता काय – गीता हा माझा प्राणप्रिय ग्रंथ आहे. "

मी मनातल्या मनात विचार केला, ठीक आहे. हायस्कूल, खोली, फिरणे, हॉटेल आणि कर्मयोग यानंतर पंख पसरीत प्रेमही येईलच.

" एके दिवशी एक मुलगी नजरेला पडल्याबरोबर मी तिच्याकडं पहातच राहिलो. ती असाधारण सौंदर्याची मूर्ती होती ! "

" आकाशातून पडलेली की जमिनीतून वर आलेली ? "

" उत्तरी गीत गाणाऱ्यांप्रमाणे तूच चौकशी केली असशील ? "

" हो, तिच्या सौंदर्याचं वर्णन करण्यासाठी... "

" नको, नको, वर्णन करून ते नासवू नकोस, " मी गोपीला अडविले. " सर्वांत सुंदर मुलगी मी मनोमन पाहू शकतो. "

" आम्ही रोज संध्याकाळी भेटत असू. तिच्या हरिणीसारख्या नेत्रकटाक्षांनी माझ्या मनात एक विलक्षण भाव उत्पन्न केला होता. ती अध्यापिका होती.

" अच्छा, तर ते असे होते... " मी म्हणालो, " नाही तर रोज एका निश्चित जागी भेट होणं कठीण होतं. तिचं नाव काय होतं ? "

गोपीने डोळे मिटून घेतले आणि म्हणाला, " तिचं नाव आजपर्यंत मलाही माहीत नाही. "

" ठीक आहे. कहाणी सांगत चल. अज्ञात मोहिनीची कहाणी – "

" असेच आम्ही रोज भेटत राहिलो. ती शाळेतून घरी जाताना अन मी शाळेतून फिरायला गेल्याच्या निमित्तानं. ती रुळांच्या बाजूनं जायची. रोज आम्ही एकमेकांना पहात असू; पण संभाषण होत नव्हतं. "

" आम्ही दोघे एकमेकांशी बोलत नसू – पण डोळे एकमेकांशी बोलत असत ! ! " मी कवितेच्या ओळी त्याला ऐकवल्या.

एके दिवशी तिच्या घराचा पत्ता लावण्यासाठी मी तिच्या मागोमाग गेलो, गोपी कहाणी सांगतच राहिला, " मला दोन-तीन मैल चालावं लागलं. "

मी विचारले, " तिनं तुला पाहिलं नाही ? "

" पाहिलं, घरात प्रवेश करताना एकदा मागं वळून पाहिलं होतं. "

" दुसऱ्या दिवशी भेटल्यावर तुला काही म्हणाली नाही ? " मी विचारले.

" नाही. एकदा माझ्याकडं पाहिलं मात्र होतं. "

" दोन महिने निघून गेले. "

" तोपर्यंत तुम्ही काय एकमेकांकडं नुसतं पहातच राहिलात ? "

" हो, नुसती नजरानजर होत होती. "

" दोन महिन्यांत ती एकदाही पाहून हसली नाही का ? "

गोपी हसला. मी सिगरेट पेटवली.

" मग काही दिवस मी तिला पाहू शकलो नाही, " गोपी दुःखित आवाजात म्हणाला.

" का ? ती आजारी पडली होती का ? " मी सहानुभूतीने विचारले.

" एका रात्री मी खोलीत वाचीत होतो. अचानक माझी नजर खिडकीतून बाहेर गेली. शेतात चांदणं पसरलं होतं. झऱ्याकाठी वाऱ्याच्या झुळुकीबरोबर केतकी नाचत होती. चांदण्यात फिरायची इच्छा झाली. शर्ट घातला आणि थंडी होती म्हणून डोक्याला मफलर गुंडाळला. दरवाजा बंद करून बाहेर आलो. शेत ओलांडून रुळा-पर्यंत पोचलो. तेव्हा तिची आठवण आली. वाटलं, तिच्या घरी जावं. "

मी विचार केला, प्रेमात पडल्यावर माणूस आगगाडीच्या रुळांवरही बिनदिक्कत डोके ठेवील.

" माझे पाय पुढं चालले होते. माझ्या मनात तिच्याशिवाय दुसरं कुणी नव्हतं. तिचं घर चांदण्यात न्हात होतं. तिची सुंदर मूर्ती माझ्या मनात होती. ती झोपलेली असेल. निजताना तिनं आपले केस बांधले असतील की अंथरुणावर तसेच पसरू दिले असतील ? तिचा श्वास मंद मंद चालला असेल, किंचित घोरण्याचा आवाज असेल, तर तो कसा असेल ? "

मी एकदम म्हणालो, " काश्याच्या भांड्यात दूध दोहताना आवाज यावा तसा. "

तो हे बोलत असतानाच मला एक प्रसंग आठवला, सिगरेटच्या थोटकाचा शेव-टचा दम मारीत मी म्हणालो, " पाच-सहा वर्षांपूर्वी मी मद्रासला चाललो होतो. सेकंड क्लासमध्ये जागा मिळाल्यानं ताणून दिली होती, मला तेव्हा एक स्वप्न पडलं – मी खेड्यातल्या एका घरासमोर उभा आहे. पहाटेची वेळ आहे. शेजारच्या गोठ्यात एक मुलगी दूध काढीत आहे. काश्याच्या भांड्यात धार पडण्याचा मधुर आवाज येत आहे. तेवढ्यात माझ्या पाठीला एक धक्का लागला ... मी दचकलो,

डोळे उघडून पाहिले. गाडी आरकोणमला पोचली होती. काश्याच्या भांड्यात दुग्धधारा पडण्याचा आवाज अजूनही ऐकू येत होता. सगळीकडे वळून पाहिले तो माझ्या ध्यानात आले की समोरच्या बाकावर निजलेल्या स्त्रीच्या घोरण्याचा आवाजच मी आतापर्यंत ऐकत होतो. "

माझा अनुभव ऐकून गोपी हसला. दुरून गाडीचा आवाज ऐकू आला. " मद्रास मेल असेल. " मी गोपीला सावध केले, " आपण या पुलापासून दूर होऊ या. "

तीच जागा ! गाडी गेली तेव्हा पुलाचे कंपन जाणवले. आम्ही उत्तरेकडे निघून गेलो.

" निघालो दूर देशी
विरहाने मन व्याकुळ
हरवणाऱ्या रूपाची दिंडी...
ही प्रेमाची पताका
आली तुला सामोरी... "

कापणीचे हे लोकगीत मला आठवले. गोपीला मी ते गाऊन दाखविले.

" रुळांवरून असाच चालत चालत तिच्या घरी पोचला असशील, नाही का गोपी ? "

" पोहचू शकलो नाही, " गोपी पुलाकडे पहात म्हणाला, " पुलाजवळ पोचलो असेन नसेन तोच ... तेव्हा ... एक ... " गोपीचे शब्द हरवले.

" तेव्हा काय झालं ? "

" काळया भुतांचा एक घोळका चढून शेतातून वर आला. "

" काळया भुतांचा ? "

" हो. आपादमस्तक काळ कपडे घातलेले. एकूण नऊ होते. ते सगळे निःशब्द माझ्यासमोर येऊन उभे राहिले. मी त्या वेळी फार थकलो होतो. मी त्यांच्याकडे लक्षपूर्वक पाहिलं. ते डाकू होते. काळा मुखवटा घालून अन हातात भाले घेऊन एखाद्या जमीनदाराचं किंवा सावकराचं घर फोडायला निघाले होते. मुखवटयांत डोळयांसाठी जी जागा सोडली होती, त्यातून अनेक नजरा माझ्यावर येऊन खिळल्या.

" कोण आहे ? " एका भुतानं विचारलं.

" कुठं चाललायस ?" दुसरा बोलला.

माझ्या परिस्थितीची यथार्थ जाणीव मला त्या क्षणी झाली. काय उत्तर देऊ ?

तिथल्या एखाद्या जागेचं नावही मला माहीत नव्हतं. खोटं बोललो तर ते मला मारतील. मी त्यांना पाहिलं हा माझा अपराध होता. हातातल्या लोखंडी कांबीच्या एका फटक्यानं ते माझा निकाल लावू शकले असते. प्रेत रुळांवर ठेवून देतील. सकाळी गाडी आल्यावर – दोन तुकडे. डोकं रुळांवर असल्यामुळं ओळखही पटली नसती. सकाळी लोक पहातील. शाळेत जाताना तीही पाहील. एक कटाक्ष टाकील आणि घृणा व्यक्त करीत निघून जाईल; पण ते मला का मारतील? माझ्या हातात घड्याळ, पेन काहीच नव्हतं. खिशात एक पैसा नाही. कदाचित काही नाही म्हणूनच मला ठार करतील. 'खिशात दमडी न ठेवणारा सैतान' म्हणत एक वार केला तर निकाल लागेल. असे शेकडो विचार क्षणार्धात माझ्या मनात चमकून गेले. एका भुतानं माझ्या डोक्यावरील मफलर काढला. 'काफिर आहे!' मफलर काढणारा म्हणाला,

"कुठं चाललायस?" पहिल्या भुतानं विचारलं.

"मला इथून दोन मैलांवर असलेल्या एका जागेचं नाव आठवलं. मी ते त्यांना सांगितलं." का जायचंय? कुणाला भेटायला? असे प्रश्न त्यांनी विचारले असते तर मी अडचणीत पडलो असतो. धीर यावा म्हणून मी गीतेचे श्लोक पुटपुटू लागलो. त्यातल्या एकानं माझा चेहरा नीट पाहिला.

"जाऊ द्या याला. मलांचा मास्तर आहे."

त्या संजीवनी मंत्राचा प्रयोग करणाराकडं मी पाहिलं. माझ्या वर्गातला प्रत्येक मुसलमान विद्यार्थी आठवून पाहिला.

"ए, सरळ चालत जा," पहिलं भूत म्हणालं. पायांनी मफलर वर फेकीत ते पुढं म्हणाले, "हेही घेऊन जा."

मी मफलर उचलून रुळावरून चालत गेलो.

"नायरकुट्टी लपून भेटायला जातो." एकानं मागून टोमणा मारला. सगळे खदखदून हसले.

"मी मागं वळूनही पाहिलं नाही."

"आता आपण निघू या." मी घड्याळाकडे पाहात गोपीला म्हणालो.

पण गोपी पुलाकडे पहात तिथेच उभा राहिला. "थोड्या वेळापूर्वी आलेला स्त्रियांचा घोळका पाहून मला आठ वर्षांपूर्वीची ती घटना आठवली. आता तरी पटलं मला कोणती भूतबाधा झाली होती ते?"

"ते विसरून जा. आपल्याला उशीर झालाय. निघू या."

गोपी माझ्याबरोबर चार-पाच पावले आला. नंतर पुन्हा मागे वळून पाहू लागला. मी फेकलेल्या सिगरेटच्या तुकड्यातून धूर निघत होता.

काही अंतर चालून गेल्यावर मी गोपीला विचारले, " त्या रात्री मग तू काय केलंस ? कुठपर्यंत गेला होतास ? "

" सांगतो, " गोपीने आपल्या पांढऱ्या केसांवरून हात फिरवला आणि मान खाली घालून चालत असताना तो म्हणाला, " ती एक मोठीच कहाणी आहे. "

ती ऐकायला तयार होत मी चौथी सिगरेट शिलगावली.

गोपी म्हणाला, " मी सरळ चालत राहिलो. परतणं धोक्याचं होतं. ते पुन्हा भेटले असते तर ? आयुष्य परत मिळाल्यानं मी खूष होतो. तिची आठवण झाली व तिला पहाण्याची इच्छा आणखीच बळावली. माझं नवं जीवन तिला अर्पण करीन असा निश्चय मी केला, तोपर्यंत मला इतका आत्मविश्वास वाटला नव्हता. पण त्या आत्मविश्वासाच्या भरवशावरच मी पुढं चाललो होतो. मी तिच्या घरी पोहचेन. दार ठोठावीन, नाहीतर जोरजोरानं हाका मारीन. घरातली माणसं दार उघडून पहातील. डाकूंच्या तावडीतून सुटून आलोय -- मी खरं खरं सांगेन. रात्रभर निजायला आसरा मागेन. दरवाज्यात ती उभी असेल. केस मोकळे सोडलेले असतील. तिचा विचार करताना मी चालण्याचे कष्ट विसरलो."

रुळावरून उतरून पायवाटेने चालत मी तिच्या घरासमोरच्या शेतात पोचलो.

मी जणू स्वप्न पहात होतो. ते घर निळ्या प्रकाशात न्हात होतं. पेट्रोमॅक्स लागलेले होते. लोक गप्पा करीत इकडं तिकडं जात होते. लग्नाची तयारी चाललीय का ? थोडा वेळ पाहिलं व मग हिम्मत करून घरात गेलो. माझ्याकडं कुणी लक्ष दिलं नाही. मांडवाभोवती जमलेल्या गर्दीत उभं राहून मी सगळीकडं नजर फिरवली. दिव्यासमोर उभं राहून तिनं एका प्रौढाच्या गळ्यात माळ टाकली ... त्या जल्लोषात मीही भाग घेतला.

माझ्याकडं कुणीच लक्ष दिलं नाही. तिथं मला ओळखणारं कुणी नव्हतं. मेजवानी सुरू झाली. एका युवकानं माझ्या खांद्यावर हात ठेवीत म्हटलं, " या, पाटावर बसा. " मी पहिल्या पंक्तीतच जेवायला बसलो. मांडव गिळावा इतकी भूक मला लागली होती.

दुसऱ्या दिवशी सकाळ व्हायच्या आधी मी खोलीवर पोचलो आणि पुढल्याच महिन्यात मलायाला निघून गेलो."

गोपीची कहाणी संपल्यावर मी ' हूं ' असा उद्गार काय तो काढू शकलो. माझ्या

मनात अनेक विचार होते. थोडी शंका वाटू लागली. कदाचित गोपीला मी त्याच्या जुन्या प्रेयसीकडंच नेत असेन. लग्नापूर्वी ती अध्यापिका होती, ही माहिती मला नसेल; पण गोपीच्या पत्रांतील भावी पत्नीचं वर्णन या मुलीवरून केल्यासारखंच दिसत होतं. पण मी गोपीला जास्त विचारलं नाही.

आम्ही रुळावरून रस्त्यावर आलो, तेव्हा दिवस मावळतीला आला होता. दुसऱ्या रस्त्यावर पोचताच गोपीच्या मनातील संशय जागा झाला आणि तो थबकला, " तू मला कुठं घेऊन जातोयस ? "

मी हसत उत्तर दिले, " गोपी, माझ्या बरोबर चल. बाकीच्या गोष्टी मी नंतर सांगेन. "

सडकेवरून आम्ही शेतात पोचलो आणि त्या घराकडे पाहिले.

तिथे विचित्र दृश्य. लोक इतस्ततः चुपचाप बसलेले आहेत. घराच्या दक्षिणेला एक प्रेत ठेवले आहे. डाव्या खांद्यावर लांब दोरी आणि उजव्या हातात कुऱ्हाड घेतलेला एक काळा लट्ठ मळकट कपडे घातलेला माणूस आमच्या समोरून शेतात जात होता.

मी त्याला विचारले, " कोण आहे तिथं ? "

" तिथल्या कँमलच्या बहिणीची मुलगी आहे. आजारपण काही नाही. काल रात्री एकदम ... "

मी गोपीच्या चेहऱ्याकडं पाहिलं. तो स्मशानाकडे पहात चुपचाप उभा होता.

# हसरे अश्रू

—ललितांबिका अंतर्जनम

अश्रूंची भाषा माहीत आहे तुम्हांला ?— आणि वेदनेची लिपी ? – मग लिहून घ्या. मी कहाणी सांगू ? कित्येक दिवसांपासून मनात दडवून ठेवलीय. आज ती प्रगट व्हायला तडफडत आहे. पुष्कळ लोक तयार झाले, पण तिला उपयुक्त स्थायी भाव कोणाजवळ नाही. त्या तऱ्हेचा कागदही नाही. अखेर तुमच्याजवळ आले आहे. बोला, सावलीची कान्ती, सौंदर्याचे स्मित या दोन्हींना ओळखून चित्रित करायला तुम्ही समर्थ आहात ?

आता... अश्रू काय आहेत ? त्यांचा जमाना निघून गेला. आता तर घाम आणि रक्त यांनाच किमत आहे. आपण असेच म्हणाल. ठीक आहे. माझे सारे रक्त आपल्याला देते. पण एक थेंब अश्रू. त्या दिवशी मिनीदेखील असेच म्हणाली होती,

"मला अश्रूचा एक थेंब द्या. त्याबद्दल मी आपल्याला एक स्मित देईन. फक्त अश्रूचा एक थेंब ..."

नव्हता, गडगंज श्रीमंती असली तरी त्या दिवशी ती वाट पहात राहिली. ते स्मित न कोमेजू देता वाट पहात राहिली. कष्ट ! ती गेल्यावर तिचे फुलासारखे स्मित कोमेजल्यावर मला तो निधी मिळाला होता. तिने गेल्यावर स्वर्गातून वहावला होता. त्यातच वहात वहात मी त्याच्याकडे चाललोय. त्याला भेटेन तेव्हा स्मिताश्रूंनी त्याचे स्वागत करीन. मिनीलाही अचंबा वाटेल.

आता मिनीविषयी काही सांगावयाचे आहे. तिच्याविषयीची चौकशी अडचणीत टाकते. पत्नी आहे ? प्रेयसी आहे ? मुलगी आहे ? की बहीण आहे ? स्त्री पुरुषासाठी यांतले काही ना काहीतरी असलीच पाहिजे. पण मिनी माझी कोणी नव्हती. किंवा समजा, मिनी माझे सर्वस्व होती, पण एक गोष्ट आहे. मला प्रेम करायला तिनेच शिकविले. प्रेमविकारस्वरूपी नव्हे, तर अनुभूतिस्वरूप.

अप्रासंगिक असला तरी मधेच एक प्रश्न ! या स्त्रीजातीविषयी तुमचे काय मत आहे ? आई, बहीण, प्रेमिका या मंडळीबद्दल ? लहानपणी माझा कवी मित्र

विचार करीत असे.

" नीलोत्पलासारखे नेत्र, गुलाबासारखे कपोल, भाल चन्द्रासारखे आणि मेघांसारखी श्यामल केशराशी ! सर्वांच्या मीलनाने केवळ एक तप्त स्पंदन !" हे ठीक आहे ? माझ्या अनुभवांत मातेचे हृदयस्पंदन संपूर्णतया जिवंत होते. एकदा, फक्त एकदा. बहिणीचा श्वास तप्त वाटला होता. ती सासरी निघाली होती. बाकी सगळे बर्फासारखे थंड – जशी काही रंगित खेळणी !

क्षणिक सुखासाठी उत्तम आहे. नंतर टाकून देईन. मिनी पाहिल्यावरही बरेच दिवस हाच विचार होता.

असे असले तरी मनात लहरी उत्पन्न करणाऱ्या रंगित पतंगांसारख्या मुली पाहून तोंड फिरवणारा कोणी भेटेल का ? किशोरी, हो, किशोरीच्या बाबतीतच बोलत आहे. अकरा ते पंधराच्या दरम्यानचे वय–अवखळ बालपण आणि वाढत्या यौवनाचे सुंदर सामंजस्य. मोत्यासारख्या शुद्ध जीवनाकडे अंगुलिनिर्देश करीत... एक मंद प्रकाश ! स्फटिकशिलांचा भंग करायला एक अजाण अंगुली पुरेशी आहे. तिचा भंग– हा ! त्यांतील भयानकता आम्ही चौफेर पहात नाही काय ? कोणी कोणावर विश्वास ठेवीत नाही. आम्ही स्वत:वरच विश्वास ठेवू शकत नाही. मिनी एके दिवशी मला म्हणाली होती, " आपला कुणावर तरी विश्वास आहे, असं एकदा म्हणा. विश्वासानं प्रेम करता ..."

त्या दिवशी तर मी काही बोललो नाही. त्या दिवसापर्यंत माझा तिच्यावर विश्वास बसला नव्हता. कदाचित् आज–या अखेरच्या क्षणी सगळ्या नाड्या आक्रोश करीत आहेत– " मिनी, माझा एका व्यक्तीवर विश्वास आहे. माझे तिच्यावर प्रेम आहे. या जगात प्रेम करावे अशी ती एकटीच होती. ती अश्रूंचे हास्य होती. सावलीची कान्ती होती. तिच्यावर — फक्त तिच्यावरच -- मी प्रेम केले होते. तिच्या नकळत ... तरीही मी तिला छळले – द्रोह घडला हे कळल्याशिवायच माफ कर."

स्त्रियांविषयी मला कधीपासून घृणा वाटू लागली, याचे नीट स्मरण नाही. आईच्या मृत्यूनंतर व बहीण सासरी गेल्यावर मी एकटा राहिलो; आपले शिक्षण तुटल्यामुळे निराश झालेल्या नातेवाइकांच्या अभावामुळे मला शिकण्याची प्रेरणा मिळाली. माझे जीवन येथे सुरू झाले. वाचनालयातून वाचनालयात गेलो आणि एका ग्रंथाकडून दुसऱ्या ग्रंथाकडे वळलो. धर्म, शास्त्र, कला, वेदान्त वगैरे माझ्या डोक्यात मावेनासे होईपर्यंत वाचले. बहुतेक म्हणाले की तो वाचता वाचता पागल होईल; पण माझी बुद्धी चळली नाही. उलट, स्थिर आणि दृढ होऊ लागली. मी काय पाहिले ?

दिवसाच्या प्रखर प्रकाशात, शीतल चांदण्यात काचेसारख्या पारदर्शक सरोवरात-- सर्वत्र छाया आहे. मला छायेची घृणा वाटे. कारण मला तिची भीती होती. म्हणूनच छाया निर्माण करणाऱ्याचीही मला घृणा वाटू लागली. छायेशिवाय रूप आहे का ? मी कधी मागे वळून पाहिले नाही, सगळे दिवे विझवून नागव्या अंधारात निजलेल्या चिता पाय आपटू लागल्या. छाया उत्पन्न न करणारा फक्त एकच आहे — अंधार, दाट अंधार !

पुष्कळ दिवस उलटले. छायेकडे इतके लक्ष असणारी एकच व्यक्ती मी पहिली. ती आहे मिनी. मी जितक्या तिरस्काराने छायेचा निषेध करायचा, तितक्याच लडि-वाळपणाने ती तिच्याशी खेळायची. हा विरोधाभास किती अद्‌भुत होता. अशा दोन व्यक्तींनी परस्परांवर प्रेम करणे. तुम्ही गैरसमज करून घेऊ नका – छायेचे आणि प्रकाशाचे संमीलन स्वाभाविकच होते.

माझा मित्र ... तसे मला फारसे मित्र नव्हते; पण त्याला मी मित्र समजत होतो. घरातल्या कपाटातला पुस्तकसंग्रहच माझा मित्र होता. असा संग्रह ज्या घरात असेल, त्या सर्व घरांचा मी मित्र आहे; पण ही मैत्री हास्यविनोद किंवा कॉफीपाना-साठी नाही. मी त्या घरातील सर्वांशी परिचित नव्हतो. एका अर्थाने मिनीने मला आपला दोस्त बनवून घेतले.

एका आकस्मिक गैरसमजुतीने तसे घडले होते.

त्या घरात मी पहिल्यांदा गेलो होतो. एका सभेतल्या गंभीर वादविवादानंतर घरी परतताना माझा मित्र म्हणाला, " हे पाहा हिरव्या रंगाचं फाटक असलेलं आमचं घर, चला, कॉफी घेऊ या. " मला त्याचा सत्कार स्वीकारावा लागला. मला अभ्यासिकेत बसवून मित्र आत गेला. मी टेबलावर ठेवलेले लठ्ठ पुस्तक उचलून घेतले. मानसशास्त्रावरील ग्रंथ होता. जगप्रसिद्ध विद्वानाने अनेक वर्षे घेत-लेल्या परिश्रमाचे फळ. मी जरा विचारात पडलो. मान थोडी हलवली तर अचा-नक मागून एक आवाज आला, " नाही, भाऊ नाही, अरे रे ! ते हलवू नकोस. घ्या, माझं सारं चित्र बिघडवून टाकलं ! "

मी चमकलो, थोडा भ्यालोही. खोलीत गेताना कोणी दिसले नाही, कसला आवाजही ऐकला नाही. मग ... तेवढ्यात माझी नजर टेबलाच्या सावलीत उभ्या असलेल्या छोट्या मुलीवर पडली. तिच्या हातात निळ्या रंगाची पेन्सिल होती. पेन्सिलीचे टोक भिंतीवर काढलेल्या अपुऱ्या चित्राकडे होते. थोडे तिरपे डोके, डावा हात जबड्याला आधार देत आहे अशा तऱ्हेचे अपुरे रेषाचित्र ... एक डोके

वगळले तर बाकी सगळे भाग — माझ्या शरीराची सावली धरून — तेथे रेखाटलेले आहेत.

मी मोठ्यांदा हसलो. हसता हसता श्वास कोंडला गेला.

माझे हसणे ऐकून ती शरमून पळाली; पण तिला पकडून मी समजूत काढली.

" ये, ये. मी पूर्वीसारखा डोकं झुकवून बसतो. पहा ... अशी रेषा ओढ ... ओ: ! किती चांगलं चित्र होतं, मी बिघडवून टाकलं. "

तिने काही उत्तर दिले नाही. लाजून दोन्ही हातांत तोंड लपवीत ती मान झुकवून उभी राहिली.

" काय बाळ, खोलीत बसणारांची अशीच चित्रं काढीत असतेस का ? " मी विचारले.

" मी ... मी ... पण फक्त भाऊच तर इथं बसतात. भाऊंचं चित्र काढण्यात कशी गंमत येते. कधीकधी घोड्यासारखी ... कधी ... कधी ... "

मला हसू फुटले, " भाऊची छाया घोड्यासारखी आहे, तर माझी गाढवासारखी आहे नं ? तुला छाया पहाताना भीती वाटत नाही ? "

" भीती कशाची ? " तिने डोके वर केले, " छायेला काय भ्यायचं ? छाया सगळ्यांनाच असते. छायेशी खेळताना किती गंमत येते ! "

मी डोके हलवले. लज्जेचा भाव निघून गेला होता. तिच्या आवडीचा विषय निघाल्यामुळे ती मनापासून गप्पा करू लागली.

" छायेशी कसं खेळता येईल ? मी दाखवीन. त्या भिंतीकडं पहा, माझ्या तोंडाकडं पाहू नका. भिंतीकडं पहा ना – एक घोडा उडी मारतोय. तो निघाला ... मग घोड्यावर शिपाई येऊन बसला ! "

ती बोटे विशिष्ट प्रकारे हलवीत होती. छाया पहाताना वाटायचे खरोखरीच घोडा उडी मारीत आहे.

गुडघे टेकवून डोके झुकविल्याबरोबर केस पुढे आले व मग तिने हत्ती दाखवला. मग ... माकड नाचवले. चार-पाच मिनिटे खेळ दाखविल्यावर अतृप्त स्मित करीत ती म्हणाली, " हे फार सोपं आहे. पळचे खेळ दाखवायला भाऊ लागतो. मी माझ्या भावाबरोबर सावलीत भांडेन, सर्कस दाखवीन ... तुमच्या बहिणीला हे सगळं येत नाही ? "

" मला बहीण नाही. " मी दु:खित आवाजात म्हणालो, " असती तरी मी तिला शिकवू शकलो नसतो. तू माझी धाकटी बहीण होशील ? "

तिने सांगितले, " घरातले सगळे लोक तिला 'छोटी बहीण' म्हणतात, पण नाव आहे 'मिनी'. तिला नावाने हाक मारलेले अधिक आवडते. मी तिला मिनी म्हणून हाक मारीन का ? "

" मिस्टर ! इतक्या लवकर छोटी बहीण तुमची दोस्त झाली ! " मित्राचा आवाज आला, " हिला कुणाची भीती वाटत नाही, ही तुम्हांलाही छाया-विशारद बनवीत असेल ? "

मी म्हणालो, " नाही, मिनी सांगत आहे की छायेला भिऊ नये. तिनं मला समजावलंय की मलाही सावली आहे. ही छाया दुसऱ्यांच्या छायेशी टकरावू शकते. मिनी ! तुझ्या भावासारखा मी घोडा किंवा गाढव बनू शकत नाही. तुझी माकडीण करणंही कठीण आहे. "

मिनीने पापण्यांची जलद उघडझाप केली. मग लटक्या रुसव्याने हसत म्हणाली, " मी माकडिणीचं पिल्लू नाहीय. " आणि एकदम पळून गेली.

ती गेल्यावरही अश्रूंचे मोती पसरविणारा तिच्या हास्याचा जंगली झऱ्याचा आवाज खोलीत घुमत होता. दोस्त हसला, " भारीच खोडकर आहे. उगीच रडते' हसते अन रागावते ...... एकुलती एक बहीण आहे. आम्ही सगळेच हिच्यावर प्रेमाचा वर्षाव करतो. ती नसली तर घर ओकंबोकं वाटतं. मूल नसलं तर घराला घरपण राहात नाही नं ! "

मी काही बोललो नाही. नंतर आम्ही पुस्तकांविषयी बोलत राहिलो. राजकारणाची चर्चा केली. खूष होऊन मी घरी परत आलो. प्रेमाच्या किरणांचा पहिला स्पर्श मला झालेला होता.

मिनीचे घर माझे झाले. तिचे आई-वडील मला कुटुंबीयच मानीत एवढे कौटुंबिक प्रेम मला मिळालेले नव्हते. मानसशास्त्राच्या आधाराने मी जे विचार निश्चित केले होते, त्यांचे मूल्य आता कमी झाले होते. मिनी माझ्या निरीक्षणाचा विषय झाली होती. तिचा प्रत्येक रूपोल्लास मी पाहिला, प्रत्येक परिवर्तन. ती मुलगी ... फ्रॉक जाऊन स्कर्ट आणि ब्लाऊज घालू लागली. तिची सावली लांबवर पडू लागली. तिचे विभ्रम बदलले. मिनी मला 'मोठा भाऊ' म्हणून हाक मारायची. सगळे प्रश्न मला विचारायची. वर्गात न शिकवलेले गणित चुकले तर तिला मारावे का ? मरिकुट्टी आणि जान यांच्या भांडणात कोणाचा पक्ष घेणे योग्य आहे ? अशाच पुष्कळशा गोष्टी. पुस्तकाबाहेरच्या प्रश्नांची उत्तरे मला येत नव्हती; पण मिनीला वाटत होते की जाडजूड ग्रंथ वाचल्यामुळे मला सर्व काही येते.

मिनी आणि मी यांच्यात नेहमीच वाद व्हायचा. मी म्हणायचा की, "मुली अगदी मूर्ख आणि परप्रकाशित असतात. पुरुषांच्या साठ टक्केही बुद्धी त्यांच्यात नसते. तिच्या रिकाम्या डोक्यात चन्द्रप्रकाशाशिवाय आहेच काय ?"

मिनी आवेशात येऊन म्हणाली, " चांदण्यात काय कमी आहे ? भाऊ ! प्रकाशाची सावली कधी पाहिली आहेस ? चांदण्याची ... " ती विचारायची.

" पुरुषाच्या डोक्यात प्रकाशाऐवजी घनदाट अंधार असेल का ? की चटचटणारं ऊन ? "

असा वादविवाद व्हायचा. एके दिवशी तिने मला विचारले, " आता तुमच्या मतानं स्त्री काय आहे ? "

" चांदण्याची सावली. " मी शांत स्वरात म्हणालो.

तिने नम्रतेने सुधारणा सुचवली, " नाही भाऊ, अश्रूंचं हास्य हेच योग्य वर्णन होईल. "

मुली किती लवकर वाढतात ! पुरुषाने सहा वर्षांत पार करावे तितके अंतर स्त्री सहा महिन्यांत ओलांडते. एका वर्तमानपत्रातील नोकरीच्या निमित्ताने मी दोन वर्षे परदेशी काढली. परत आलो तो स्कर्टऐवजी साडी पेहेरलेली होती ती. घरात मौन पसरले होते. मिनीसाठी घेतलेला खाऊचा डबा पाहून मित्र हसला, " अहो संपादक महाराज, आपण इतके मूर्ख तर नाही ! मिनी आता छोकरी नाही. डोकं ठिकाणावर असतं तर तुम्ही या मिठाईऐवजी झकास वर शोधून आणला असता; पण तिथं तुम्ही मागंच राहिलांत. येत्या पंधरा तारखेला तिचं लग्न आहे. यार, तू तिथून एक पत्रही पाठविलं नाहीस ? "

मी बोट चावले, मिठाईचा डबा माझ्या हातून खाली पडला. आजपासून मिनी मुलगी नाही राहिली ? तिला कोणाची तरी पत्नी व्हायचंय ? पण मला धाकटी बहीण कुठं मिळेल ? मिनीला न भेटता मी घरी परतलो. मला तिला भेटायचं नव्हतं का ? ... त्या घरात माझं स्थान भावाचं होतं, मिनी आणि तिच्या आईला मी भेटू शकलो असतो ... कदाचित. आम्हा दोघांमध्ये रेशमाची जाड साडी असती ... काळे काठ असलेली रेशमी साडी. माझी मिनी कधीच मोठी झाली नसती तर ... कधीच ...

निमंत्रण आले होते, पण मी मिनीच्या लग्नाला गेलो नाही, तिचा पती पोलिस इन्स्पेक्टर होता. बलदंड आणि धनवान. मिनी सासरी गेली. मला तिच्याशी लग्न करायचं होतं ? — नाही. वाढलेल्या वयात तिला पाहिलंच नाही ... तरीही !

शुष्क आणि नीरस शास्त्रे अभ्यासण्यात दिवसगत होत होती. सहा महिने, एक वर्ष आणि किती तरी ... ! असाच पुष्कळ काळ गेला. ... मिनीला पहाण्याचा योग आला नाही.

एका राजकीय सभेत गोळीबार झाला. त्यात माझा मित्र मारला गेला. आपल्या मेहुण्याच्या गोळीनेच त्याचा मृत्यू झाला होता. त्याचे प्रेत पोचविण्याचे काम माझ्यावर येऊन पडले: नुकतीच बाळंतपणासाठी आलेली मिनी घरी होती. वृद्ध आई-वडील ... त्या करुण दृश्याचे वर्णन मला करवत नाही.

विजेचा धक्का बसलेल्या आईवडलांसमोर, प्राणांहून प्रिय भावाच्या प्रेतासमोर... मृत्यूने ग्रासलेल्या त्या वातावरणात मी मिनीला पाहिले. ती रडली नाही. बेशुद्धही पडली नाही. एखाद्या मूर्तीसारखी स्तंभित झाली. भावाच्या छातीतून वहाणारे रक्त ती एकटक पहात होती. हे नृशंस कर्म तिच्या पतीच्या हातून घडले होते. आपल्या उदरात वाढणाऱ्या मुलाच्या वडिलांच्या हातून ...

" मिनी ... ! "

" भाई ! " ती चमकली, " भाई, ... माझे मोठे भाई ... हे लोक जे म्हणाले ते सगळं खोटं आहे. माझा भाऊ मेला नाही. माझ्या पतींनी भावाला नाही मारलं. मला भाऊ आहे — नेहमीसाठी मला भाऊ आहे. आहे नं भैया ? आहे नं ? "

" हो. " मी जोराने म्हणालो ते केवळ तिला शांत करण्यासाठी नव्हते. हो ... मलाही एक बहीण हवी, कोमेजलेले जीवन सावरण्यासाठी. चिंतेत वाटेकरी म्हणून. यासाठी मिनी वगळून कोण योग्य होते ?

मित्राचा देखणा निरोगी देह पलंगावर पडला होता. मी त्याच्याकडे पाहिले आणि मग मिनीच्या कातर नेत्रांकडे. मिनीची दृष्टी तिच्या भावाला कशी सहन होणार ? ... मी धाकट्या बहिणीजवळ जाऊन उभा राहिलो. तिचे विखुरलेले केस नीट केले. " रडू नकोस, मिनी. तू माझी बहीण आहेस नं ? मग रडू नकोस. मी तुझा भाऊच आहे. तुझा भाऊ सांगतोय, तू रडू नकोस. "

मिनीचा कंठ दाटून आला. ती माझ्या छातीशी बिलगून अशी उभी होती जणू मुसळधार पावसात छोटीशी चिमणी आपल्या आईच्या पंखात लपेटली जावी.

भिजून विसविशीत झालेल्या कागदासारख्या तिच्या साश्रू कपोलाचे मी चुंबन घेतले. दु:खाने घेतलेले दु:खाचे चुंबन, जीवन आणि मृत्यू दोघांचे सांत्वन. त्या चुंबनाविषयी तुम्ही काहीही म्हणू शकता. कुमार्गी ... मर्यादाहीन ... मनास येईल ते म्हणा, पण मला त्याचा गर्व वाटतो ... भावाला गोळी घालणाऱ्या त्या

इन्स्पेक्टरनेही हे दृश्य पाहिले होते.

मिनी ! माझी लाडकी बहीण ! तुझ्या जीवनात केवढे परिवर्तन झाले. हे मला त्या दिवशी कळले असते तर ... तर ... तर.

कहाणी संपली. आता मिनीविषयी काही सांगायची इच्छा नाही. तुमच्याजवळची शाई संपेपर्यंत आणि भावना आटेपर्यंत तुम्ही लिहीत रहा. मी तिचा प्रियकर आहे का ! लोकमतानुसार ती एक वेश्या आहे ! वाटेल ते लिहा. माझी काही हरकत नाही. तीही हरकत घेणार नाही. त्या सशस्त्र इन्स्पेक्टरने संशय घेतला, मारले, कैद केले. पण तिने तक्रार केली नाही. तिने आरोप स्वीकारलेही नाहीत. एखाद्या पति-व्रतेसारखी ती गप राहिली व जग सोडून गेली.

जुनी छायाचित्रे टांगलेल्या खोलीत भाऊ ज्या खाटेवर पडला होता, तीवरच मी मिनीला पाहिले. जुन्या स्मिताचा आभास तिच्या अधरांवर होता. हजारो अश्रुबिंदू ओवलेले स्मित ... मला पहाताच तिने विचारले, " भाई, स्त्री ही काय वस्तू आहे ? "

माझा गळा भरून आला. मी तिच्याशी सहमत झालो.

" स्त्री अश्रूचे हास्य आहे, मिनी ! ... "

" फक्त स्त्रीच नाही, कदाचित पुरुषही. "

# बेपत्ता

**—काकूर नीलकंठ पिल्ले**

आगगाडीच्या प्रवासात खिडकीजवळ बसणे आनंददायक असते. विशेषत: कोल्लम-पासून चेंकोट्टापर्यंत. शेतात काम करणारे मजूर आणि टेकडया पाहताना मन रमते. लोहमार्गाजवळची घरे, हिरवळीवर चरणाऱ्या गायी, आगगाडीचा आवाज आल्या-बरोबर हसणारी मुले — अशी अनेक दृश्ये आगगाडीएवढया वेगाने डोळयांपुढे येतात आणि तितक्याच वेगाने मागे पडतात. अशी दृश्ये पाहून कुणाला आनंद होत नाही ? हिरव्यागार शेतांतून जाणारी पाऊलवाट, कधीकधी हातोडीने रूळ ठोक-णारा कामगार — फार काय मजुरांची रांग क्वचित आगगाडीलाच सलाम करते तेव्हा मन प्रसन्न होऊन जाते. स्मशान मागे टाकीत अंधाऱ्या बोगद्यातून गाडी जाते तेव्हा प्रवाशांच्या मनांत चिंतेचे आणि भयाचे भाव येतात. बोगदा संपून प्रकाशात आल्यावर हायसे वाटते. जणू पुनर्जन्म झालासे वाटते. तो सुटकेचा आनंद अपरंपार असतो.

बसायला खिडकीजवळची जागा मिळाली तर निसर्गसौंदर्य डोळे भरून पाहता येते; मला डब्याच्या मधली जागा मिळाली होती. गाडीत फार गर्दी होती. डावीकडे—उजवीकडे, वर-खाली, मागे-पुढे — सगळीकडे माणसेच माणसे. सगळे प्रवासी मोठयाने गप्पा करीत आहेत. माझ्या अगदी जवळ अपरिचित लोक बसलेले आहेत, पण कोण कोणाची पर्वा करतो ? घरगुती खाजगी गोष्टीही होऊ लागल्या. मी एकटाच आहे. मी कोणाशी बोलायला गेलो नाही की माझ्या चिंतनात कोणी बाधा उत्पन्न केली नाही.

खिडकीजवळची जागा मिळाली नाही तर एखादे पुस्तक तरी वाचायला असावे. पण माझ्यापाशी तेही नव्हते. पुढल्या स्टेशनवर गाडी थांबली तेव्हा मी एक वर्त-मानपत्र विकत घेतले. वर्तमानपत्र लोक सामान्यत: दहा-पाच मिनिटांतच वाचून संपवतात, पण मी मन लावून वर्तमानपत्र वाचू लागलो. नेहमीप्रमाणे आजही मी ' हरवल्या 'चा स्तंभ वाचला. त्यानंतर ' राजधानीपासून कालिकावपर्यंतची वार्ता. '

'गुंडांचा उपद्रव', 'पूल कोसळण्याच्या बेतात' इत्यादी सर्व बातम्या वाचून टाकल्या. संपादकीयही वाचले. 'हरवल्या 'ची बातमी तीनदा वाचली. तीच मला सर्वांत आवडली. ती बायको हरवल्याची बातमी होती. तिचा पत्ता लावणाऱ्यास बक्षीस होते. स्पष्टच छापलेले होते – "तिचा पत्ता लावणाराने तिला अंदमानचे तिकीट काढून देऊन रवाना करावे. तिकिटाचे पैसे आणि शंभर रुपये बक्षिसादाखल दिले जातील." अशा मूर्ख नवऱ्याच्या तावडीतून आपली सुटका करून घेणाऱ्या स्त्रीचे मला कौतुक वाटले. हरवलेली बायको आणि वाट पहाणारा नवरा – दोघांनी माझ्यात जोश उत्पन्न केला.

पुढच्या स्टेशनावर गाडी थांबली आणि प्रवाश्यांच्या गप्पांना रंग चढला तेव्हा मी त्या पतिपत्नींचे विफल वैवाहिक जीवन मनश्चक्षूंसमोर पहात होतो. याच वेळी दारात चाललेल्या भांडणाने सगळ्यांच्या गप्पांना खीळ बसली. गाडीत चढणाऱ्या दोन माणसांना एक बाई अडवीत होती. बसायला जागा न मिळाल्यामुळे ती दारातच उभी होती. त्यांच्यात बराच वेळ तणातणी झाली. शेवटी ती बाई म्हणाली, "गेल्या वेळी तुमच्यासारखाच एक माणूस माझे तीनशे रुपये हिसकून पळाला होता."

त्या पुरुषांना चुपचाप पळालेल्या लक्ष्मीकुट्टीच्या पतीपेक्षा अधिक स्वाभिमान असल्यामुळे ते दुसऱ्या डब्याकडे निघून गेले. गाडीही सुटली. माझ्या मागे बसलेला माणूस म्हणाला, "कोण आहे ती! त्या माणसाचं बोलणं ऐकलं नं ?"

"अशा लोकांपुढं पड खावीच लागते" दुसरा म्हणाला.

"तुम्ही असता तर काय केलं असतं ?",

"वाटल्यास मी पैसे देईन. खुशाल माझ्या घरात येऊन रहा." चश्मेवाला म्हणाला.

त्याचे बोलणे त्या बाईला ऐकू गेले नाही, कारण ती दूर उभी होती. त्यानंतर चष्मेवाल्याच्या त्याच्या मित्राशी इकडच्या-तिकडच्या गप्पगोष्टी होत राहिल्या. ते माझ्या जवळच बसलेले होते. लक्ष द्यायचे नाही म्हटले तरी त्यांच्या गप्पा माझ्या कानांवर पडत होत्या. मला तर असे वाटले की चष्मेवालाच हरवलेल्या बायकोचा नवरा आहे. बायको पळून गेली, तोपर्यंत तो बुद्दू होता. अशा तऱ्हेची आत्मप्रशंसा मी आजपर्यंत ऐकली नव्हती. वर्तमानपत्रात जाहिरात देऊन तो बायको शोधायला निघाला आहे. अशा नादान माणसाबरोबर रहाण्याचा प्रसंग आलेल्या स्त्रीविषयी मला सहानुभूती वाटली. गाडीच्या दोन्ही बाजूंना पसरलेले ते निसर्गसौंदर्य माझ्या

दृष्टीला न पडताच मागे सरकत होते, त्याबद्दल मला विषाद वाटला नाही, जवळ पुस्तक नसल्याबद्दलही वैताग वाटत नव्हता. हरवलेली बायको आणि तिचा मूर्ख नवरा यापेक्षा अधिक मनोवेधक कहाणी कोणती असू शकेल !

तो चष्मेवाला दणकट हाडापेरांचा तरुण आहे. त्याच्या बायकोला कोणी पाहिले तर नाही याची चौकशी तो कोणाजवळ करताना दिसत नाही. त्याच्या चेहऱ्यावर दु:खाचा भावही नाही. लोकांची दिशाभूल करण्यासाठी त्याने वर्तमानपत्रात तशी जाहिरात दिलेली आहे. ती हत्तीने हत्तिणीला मारावे या जातीची आहे, यात काय संशय ? मार सहन करता करता त्या बिचारीने अष्टकोनी सरोवरात जीवही दिला असेल. यालाही त्याची कल्पना असेल. पोलिसांच्या जाचातून सुटण्यासाठीच याने ती जाहिरात दिली असेल. विचारले तर त्याचे नाव कळेल.

घाट पार करून गाडी मैदानात आली होती. एवढ्या प्रवासात कित्येक उतरले आणि नवे चेहरे गाडीत आले. आतापर्यंत उभे होते त्यांना जागा मिळाली व जे बसले होते ते ऐसपैस झाले. चष्मेवाला गप्पा करून थकला तेव्हा वरच्या बर्थवर जाऊन निजला. दरवाजात उभी असलेली ती बाई नेमकी माझ्यासमोर येऊन बसली. माझ्या लक्षात आले की ती एकटी आहे. तिची ताकद आम्ही थोड्या वेळापूर्वी पाहिलीच होती. ती कोणाला हार जाणारी नव्हे. थोडासा स्पर्श झाल्या-बरोबर तिने दोन पुरुषांना दुसऱ्या डब्यात जायला फर्मावले होते व आता तीच पुरुषांमध्ये येऊन बसली होती. तिच्या दोन्ही बाजूंना बसलेले बिलकुल अपरिचित आहेत. ते चेंकोट्टा स्टेशनानंतर चढलेले होते. त्या बाईने कोट्टारकरा स्टेशनात गाडी पकडली होती.

चष्मेवाला गप्प झाल्यावर माझे लक्ष त्या बाईकडे गेले. ' हरवल्या 'ची जाहिरात मी पुन्हा वाचली. वय जुळते आणि बायको सुंदर असल्याचे वर्णनही लागू पडते. रंगही लिहिलेलाच आहे. मला तर वाटते की बक्षिसाची रक्कम मलाच मिळणार. मला हसू आले. चोरून पळणारी स्त्री हीच आहे. तिचा शोध घेत निघालेला चष्मे-वाला वर निजला आहे. तो नवरा आहे, ही बायको आहे. जर खरोखरीच तसे असेल तर...

मोय ! हे शक्य नाही, त्याने तिच्याकडे पाहिले नसले तरी आवाज नक्कीच ऐकला होता. बायकोचा आवाज कोणत्या नवऱ्याला ओळखू येत नाही ? यांतलाच कोणीतरी जाहिरात देणारा असेल. पण कोण ! त्याचा पत्ता या स्त्रीला असेलच. ती त्याच्यालायक आहेच. पुरुषाची सेवाही करायची आणि वरून बोलणीही ऐकून

घ्यायची हे तिच्यासारख्या तिखट बाईला कसे सहन होणार ? असा वागणारा पुरुष मूर्ख आहे म्हणून तो बेपत्ता बायकोला शोधायला पुन्हा बाहेर पडला आहे.

तो पूर्वी म्हणाला असेल, " चालती हो, वाटेल ते कर."

तिच्या लक्षात आले असेल की आरडाओरडा करून नवऱ्याचे वर्तन सुधारणार नाही की तो घराबाहेरही जाणार नाही. म्हणून ती स्वत:च निघून गेली. त्या बाईचा विचार तरळून गेला.

माझ्यासमोर बसलेली स्त्री गप्पात कोणाला हार जाणारी नव्हे. अंगात पुरुषा-एवढीच शक्ती आहे. अशा तऱ्हेची बायको घर सोडून गेल्यावर तिच्यासाठी दु:खी होणारा नवरा दयनीयच म्हटला पाहिजे.

काहीही ठरवणे कठीण आहे. कदाचित तो पराक्रमीही असू शकेल. दोन-तीन दिवस घराबाहेर काढल्यावर आता ती भ्याली असेल. सुंदर बायको घर सोडून गेली व शोधून देणारास बक्षीस हे वाचून शोधायला बरेच लोक तयार होतील. ती त्यांच्यातल्या एखाद्याच्या जाळ्यात जरूर सापडेल. शोधताना सापडलेली वस्तू शोधणाराच्या हातातच बक्षीस म्हणून राहून जाऊ शकते. ज्या शोधणाराच्या बाबतीत असे घडेल, तो भाग्यशाली म्हटला पाहिजे. मग ती परतणार नाही. नवरा वास्तविक बुद्धिमान असावा. कारण या रीतीने लोकांच्या डोळ्यांत धूळ फेकण्याचे काम यशस्वी रीतीने पार पडते.

हरवलेली बाईच माझ्या समोर बसलेली आहे. या डब्यातल्या दुसऱ्या कोणा-लाही याची कल्पना नाही. मी कोणाला सांगणार नाही. ' हरवलेल्या ' बाईला पकडल्याचे श्रेय मलाच मिळेल. मदुरेला गाडी थांबली की मी तिला पोलिसांच्या हवाली करीन. त्यानंतर तिच्या नवऱ्याला तार करीन. बक्षीस लावल्यामुळे बायको परत न येवो असा विचार करणाऱ्या नवऱ्याच्या डोक्यावर मारायला तिचा उपयोग. त्याची चलाखी अशा रीतीने मोडून काढणेच योग्य होईल.

मी तिला न्याहाळून पहात होतो. थोड्या वेळाने ती माझ्या बाकावर येऊन बसली. ती हसून बोलत होती. तिचे बोलणे मी लक्षपूर्वक ऐकले होते. वर निजलेल्या चष्मेवाल्याकडे पाहून ती म्हणाली,

" त्यानं लग्न केलं नाही. कारण, मंगळसूत्राच्या सोन्यानं त्यानं आपले दात मढवून घेतलेय. "

मी चमकलो. भानगड माझ्या लक्षात आली. थोड्याच वेळापूर्वी ' मी माझा इंगा दाखवीन ' अशी घमेंड करणारा आता वर निजला आहे. तो तिला तोडीस

तोंड उत्तर दिल्याशिवाय राहणार नाही. ते उत्तर ऐकून आम्हांलाच लाज वाटेल. त्याचे तोंड आमच्याकडे आहे. त्याचे डोळे सर्वांना पहात असतील. ही बाईसुद्धा तो निरखीत असेल. त्याच्या बोलण्यातून काय अर्थ निघतो ? रस्त्यावरून जाणाऱ्या मुलीला न पाहताच तिच्याशी लग्न करा, असाच नं ? तो उत्तर देणारच.

त्याने काही उत्तर दिले नाही. ती माझ्या शेजारी येऊन बसली. हे चांगलेच झाले. समोरची जागा तर मोकळी झाली. थोड्या वेळापूर्वी मी तिला निरखून पहात होतो. आता विचार आला, तिचा जिभेचा पट्टा माझ्याकडे वळला तर मी घामाने भिजून जाईन, तसे घडले नाही, का कुणास ठाऊक, ती गप्पच दिसते !

ओह ! आता समजले. हे सगळे ढोंग आहे. तो माणूस हिला घेऊन जात आहे. हे दोघे अनोळखी असल्याची बतावणी करीत आहेत. लोकांच्या नजरा टाळण्यासाठी एकमेकांवर दोषारोप करीत आहेत. माझा तर्क बरोबर आहे. दोघेही कोट्टारकराला गाडीत बसले होते. कोल्लमहून रात्रीच्या अंधारात लपून आले असतील. आपले बिंग लपविण्यासाठी तो गप्पात रंगल्याचे ढोंग करीत होता. तीही आवेशाने बोलते. फार चांगले झाले, चोर मुद्देमालासकट सापडला.

जरा गाडी मदुरेला पोहचू द्या. दोघांना पकडून पोलिसांच्या हवाली करतो. ' हरवल्या'ची जाहिरात मी पुन्हा वाचली. वर्णन याच बाईचे आहे. एकटी तरुण स्त्री ! एका प्रतिष्ठित पुरुषाला टोमणा मारते, " मंगळसूत्रासाठी सोने न मिळाल्या-मुळे तो लग्न करू शकला नाही. " हा अपमान तो मुकाट्याने गिळतो. तो मूर्ख जराही हालचाल करीत नाही, कशाला जगतो कुणास ठाऊक ? थोड्या वेळापूर्वीच बढाई मारीत होता.

दुसऱ्या प्रवाश्यांचे यांच्याकडे फारसे लक्ष नव्हते, त्यांना रहस्य कसे कळणार ? विरुदनगर आले तेव्हा ती माझ्या अगदी जवळ येऊन बसली, तिचे नाव विचारू — ती लक्ष्मी आहे का ? एकदम पत्ता लागेल, पण कसे विचारू ? उलट तिने विचारले,— तुम्ही कोण आहात ? जनगणनावाले ? तर चौकशी थंडावेल. सग-ळ्यांशी खुलेपणाने बोलणाऱ्या या स्त्रीशी बोलायला मीच का संकोचतोय ?

" कोट्टारकराला गाडीत बसलीस का ? " मी एक निष्पाप प्रश्न विचारला.

" कसं ओळखलंत ? "

" मी पाहिलं असावं, असं वाटतं. "

" मग कशाला विचारलंत ? उलट तपासणीसाठीच नं ? "

" नाही, तू खरं बोलतेस की नाही, हे पडताळायला. "

" मी काय कुणाची चोरी करून निघालेय ? " तिने दृढ स्वरात विचारले.

बोलणे वाढवण्याची माझी हिम्मत नव्हती. गप्प बसणेच योग्य होते, बोलणे वाढले तर ती उलटून काही म्हणण्याची शक्यता होती. लोकांनी ते ऐकले असते. तिला उत्तर देणे कदाचित मला जमणारही नाही. ती ताकतवान असली तरी ' अबला ' समजून लोक तिचीच बाजू घेणार. म्हणूनच मी गप्प राहिलो.

थोड्या वेळाने तिने विचारले, " कुठून आला आहात ? "

" कोल्लमहून. "

" कुठं जाता आहात ? "

" माहिती कशाला हवीय ? "

" संकोचता कशाला ? गुपचूप पळून जात आहात का ? "

" आजकाल तर बायका गुपचूप पळून जातात. " मी म्हणालो.

" पुरुषांच्या अपराधामुळं. "

" अपराध कुणाचाही असो. लपून पळणारे कधी ना कधी पकडले जातातच. "

" तुमचा एखादा भाऊ पळालाय का ? "

" नाही, पळाला नाही, पण मी दुसऱ्या कुणाला तरी गुपचूप पळून जाताना पकडलंय. "

" इतके समर्थ असाल, तर... " थोडा वेळ गप्प राहून ती म्हणाली, " तुम्ही मदुरेला जात आहात, हे बरोबर आहे का ? "

मी विचार केला, आपण पकडले गेल्याचे या लोकांच्या लक्षात आले, तर हे मदुरा यायच्या आधीच आगगाडीतून उतरतील. ते उतरतील, तिथे उतरणे मला शक्य नव्हते. म्हणून मी ठरवले होते की पशुमला स्टेशननंतरच तिच्याशी बोलावे. आमच्यामध्ये कोणी येऊन बसले असते, तर सोयीचे झाले असते. पण कोणी आले नाही. पशुमला स्टेशन तसेच निघून गेले.

तिने विचारले, " मदुरेहून तुम्ही कुठं जाल ? "

" तिथं पोचल्यावर ठरवीन. "

" कुठं जायचं ते तुम्हांलाच माहीत नाही ? "

तसं असेल, तर ती माझ्याबरोबर यायला तयार आहे का ? -- मला विचारावेसे वाटले, सोन्याने दात मढवलेला वर निजला आहे. त्याची जी संभावना झाली ती माझ्या लक्षात आली.

थोडे अंतर शिल्लक आहे. मदुरेला पोचल्याबरोबर या लोकांचे बंड फोडायचेय.

दोघांना पोलिसांच्या हवाली करण्यासाठी इतरांचेही सहाय्य लागेल. सोबतचे प्रवासी मला मदत जरूर करतील. मी विचारले, " तुझं नाव लक्ष्मी आहे नं ? "

" तुम्हांला कसं कळलं ? "

" ते सोड, खरं खरं सांग ? "

" खोटं कशाला बोलेन ? माझं नाव लक्ष्मीच आहे. "

" घर कोल्लमला आहे का ? "

ती हसत म्हणाली, " यापूर्वी आपली भेट कुठं झालीय ?"

" तेही सांगेन. कालच घरातून निघाली आहेस नं ? "

" तुम्ही पोलीस आहात का ? पोलिसासारखे प्रश्न विचारता आहात ! "

" कोल्लमची एक बाई बेपत्ता झायली. तशी एक जाहिरात मी वर्तमानपत्रात वाचलीय, वय, रंग आणि नाव –– सगळं तुझ्याशी जुळतंय, तुला चोरून पळवणाराही याच गाडीत आहे. मला सगळं माहीत आहे. " मी म्हणालो, जवळ बसलेल्या लोकांनीही आमचे बोलणे ऐकले, चांगलेच झाले.

" तुमच्याजवळ वर्तमानपत्र आहे ? जरा दाखवू शकाल ? "

हिचा साथीदार कोण आहे ? जवळच्या सगळया प्रवाश्यांना उत्सुकता वाटत होती. सगळया डब्यांत चुळबूळ सुरू झाली, पण तिला जणू त्याची पर्वा नव्हती.

" आता तुमची काय मर्जी आहे ? " तिने विचारले.

" पकडून पोलिसांच्या हवाली करू. " एकाने उत्तर दिले.

ती अजाण बालकाच्या निष्पाप वृत्तीने म्हणाली, " मदुरेला नाणप्पन नावाचा पोलीस आहे. त्याच्याच ताब्यात मला द्या. "

" ठीक आहे. मी ते सर्व करीन. " मी उत्तर दिले.

दातात सोने मढवलेल्याने विचारले, " नाणप्पन तुझा कोण आहे ? "

" माझे ? ते माझे पती आहेत. "

# भाड्याचे घर

— पी. सी. कुट्टिकृष्णन ' उरूब '

अत्यंत क्रुद्ध मनःस्थितीत मी नव्या घरात प्रवेश केला होता. कारण, इतक्या लवकर घर बदलावे लागेल, असे वाटलेच नव्हते. तीन महिन्यांचे भाडे माझ्याकडून वसूल करून करायचे काय, तर बँकेत टाकायचे. त्यासाठी मला बाहेर काढायची जरुरी नव्हती. घरभाड्यावर मालकाचे पोट नव्हते. पैसे बँकेत जमा करायचे एवढीच त्याची कांक्षा होती. चार महिन्यांपासून मी त्या घरात होतो हे त्याने मुळीच लक्षात घेतले नाही. " सर, पेटी अन् अंथरूण बाहेर ठेवतो, जागा खाली करा. " त्याला मनातून म्हणायचे होते, " कुत्र्या, चल, नीघ इथून ! " तो रागावला असेल असे मला वाटले, पण तो शांत स्वरात बोलत होता. त्या गाढवाला वाटले, इथून हाकलल्यावर जागा मिळणार नाही, जातो कुठे ? माझ्यासाठी दुसऱ्या कोणी घर बांधून थोडेच ठेवले आहे ? दुसरी व्यवस्था असती तर या अरुंद कोठडीत माणूस कशाला राहिला असता ?

माझ्यासारख्या भाडेकरूची त्याला लालूच वाटली पाहिजे कारण, आजपर्यंत मी कधी गडबड केली नाही, माझ्याविषयी शेजाऱ्यांचे मत चांगले होते. ' एक बिचारा तरुण ! ... ! ' हेच माझ्याविषयी इतर भाडेकरूंचे मत आहे. माझ्याआधी इथे एक शिपी राहात होता. मोठेच प्रकरण झाल्यावर तो इथून निघाला. सगळ्या शेजाऱ्यांनी ओरड केली की शहरांतल्या सगळ्या भिकारणी या खोलीत निजायला येतात. त्या गाढव दादाला यात आक्षेपार्ह काही वाटत नाही, त्याला तर फक्त वेळेवर भाडे हवे. अनैतिक आचरणाची त्याला पर्वा नाही.

मी आल्यापासून स्त्रीचा श्वासही या खोलीत आला नाही, काही दिवसांपूर्वी पूर्वेकडील घरात रहाणाऱ्या म्हाताऱ्या आजीबाईंच्या शेजारणीला म्हणाला होता, " तो काय बोलणार ? किती शांत जीवन जगतोय ?" मी सामान्यतः गप्पच असतो. कधीकधी लेखन करतो. जास्त वेळ झोपण्यात जातो. एकदा कविता मोठ्याने वाचली — माणूसच आहे नं ? बस त्याच दिवशी शेजारची प्रौढा स्मितपूर्वक

खिडकीजवळ आली आणि म्हणाली, " गात आहात का ? "

त्या दिवसापासून कवितावाचनही बंद केले. माझा आवाज नंतर खोलीबाहेर आला नाही. पण या जगात भल्याचे काम नाही. तो कोळी शहाणा होता. दिलेल्या भाड्याची किंमत त्याने वसूल केली. " तू घर देत नसशील तर दुसरी शेकडो घरं आहेत " असे म्हणून त्याने घर सोडले. या गाढव दादाला ते दीड महिना बंद ठेवावे लागले. त्या गाढवाची घाण मी काढली. पण त्या गाढवाला त्याचे काय ? मी दादाचे टक्कल पडलेले डोके फोडले. त्याचा लठ्ठ मुलगा आणि तीन मुली भोकाड पसरून रडू लागल्या.

बापापेक्षा गाढव आहे — मुलगा. देवीच्या डागांनी भरलेला त्याचा चेहरा दुर्दैवाचेच लक्षण आहे. त्याची बायको त्याला सोडून गेली ती यामुळेच. बाप बोलत असताना तो आपला कुरूप चेहरा घेऊन मागे उभा होता. आतापर्यंत त्याला फक्त एकच बायको सोडून गेली हे आश्चर्य मानले पाहिजे. त्याचे तोंड असे आहे की शंभर बायकांनी त्याला एकदम सोडून जावे.

" शंकर ! " वडिलांची हाक होती.

" पिताजी ! " त्याचा आवाज ऐकू येतो. गाढवासारखा आवाज ! काही दिवस तरी एका बाईने याचा सहवास कसा सहन केला ? याचे मला अजूनही आश्चर्य वाटते. कंजूष नवरा आणि मूर्ख मुलगा यांच्याबरोबर रहाणारी ती सती सावित्रीच असली पाहिजे. मी तिला पाहिलेले नाही. मी इथे यायच्या दीड महिना आधीच ती घर सोडून गेली. ती इतक्या लवकर जाईल असे बापलेकांना वाटले नव्हते. तिच्या वडिलांजवळही भाड्याने द्यायला घर आणि बँकेत ठेवायला पैसे आहेत. मग तिला या लोभी माणसांविषयी आदर कसा वाटावा ? आता तिला परत आणण्याचे प्रयत्न करीत आहेत, पण व्यर्थ !

ती नक्कीच सुशील असेल. " तुमच्या बरोबर फक्त सापच राहू शकतील. " असे म्हणून ती घर सोडून गेली. सापाची‌ही याच्याजवळ रहाण्याची हिम्मत होणार नाही,. हे अगदी खरे आहे. बाप बोलायच्या आधीच पोराने माझे अंथरूण उचलून बाहेर ठेवले. मला म्हणायचे होते की मी आता घर रिकामे करीत नाही. पण शेजाऱ्यांना वाटायचे की मी भाडे तर देतच नाही, वर भांडण करतो. त्या बुढ्ढयाने आणि पोरट्याने सोडला असला तरी मी अभिमान कसा सोडू ? हकीगत लवकर संपवायची आहे. तमाशा होऊ नये म्हणून त्यांचे म्हणणे मान्य केले; तीन महिन्यांच्या थकलेल्या भाड्याबद्दल लिहिलेल्या कागदावर सही केली. झाले. त्यांना वाटले असेल की माझी

सही घेण्यात त्यांनी मोठी हुशारी दाखवली आहे. समजूत अशी की मी प्रोनोट न वाचताच सही केली, असू द्या. शेजारीपाजारी नसते तर त्यांना मी इंगा दाखवला असता.

तरीही माझा पारा खाली उतरला नाही. ही खोली मिळावी म्हणून मित्रांनी मदत केली नसती, तर माझी काय अवस्था झाली असती! या पावसाळ्याच्या दिवसांत काय दुकानाच्या ओसरीवर निजलो असतो? याचा त्या गाढवाने काही विचार केला? रेड्यासारख्या माजलेल्या त्याच्या मुलाने याचा विचार केला आहे? सामाजिक कर्तव्याची जाणीव त्या जनावरांना थोडीच आहे म्हणा!

नव्या खोलीत आल्यावरही त्यांना लाखोली वहात होतो. अचानक समोर एक स्त्री आली.

"सात नंबरच्या खोलीत आपणच आला आहात का?" तिने विनम्र आवाजात विचारले.

"हो. बोला!"

"किल्ली नको." अत्यंत विनीत स्वर.

"मालक कुठं आहेत?"

"किल्ली घ्या. नीट जपून ठेवा, दुसरी किल्ली नाही." हेच तिचे उत्तर होते.

"हो."

"माफ करा, मी आपल्याला ओळखलं नाही."

"मला माहीत आहे."

"मग मी वर जातो." मला एकदम निरोप घ्यावा असे वाटत होते. ती बाई अचानक म्हणाली, "मी खोली तर दाखवते. साफ आहे की नाही, कुणास ठाऊक? तुमच्या जवळ केरसुणी आहे की नाही?"

सांगावेसे वाटले होते की केरसुणी जवळ कधी नव्हतीच. मी चुपचाप उभा राहिलो. तोपर्यंत पेटी आणि अंथरूण घेऊन गेलेला नोकर परत आला. म्हणाला, "सर, खोली बंद आहे."

"मी उघडून देते." ती स्त्री म्हणाली, मग ती आमच्या आधीच पायऱ्या चढू लागली. मी आणि कुली मागे होतो. ती चढत असताना तिचे लांब, काळे कुरळे केस अंधाराच्या लाटांसारखे भासले. थोडा वेळ आधीच न्हायल्यासारखी ती दिसत होती. अजून केस पुरते वाळलेले नाहीत. तेल आणि साबणाचा मधुर कोरडा गंध मन प्रमुदित करीत असताना मी पायऱ्या चढत होतो.

सातव्या खोलीशी उभी राहून ती म्हणाली, " मला किल्ली द्या. "

मी किल्ली दिली. ती खोलीत पहात होती आणि मी तिच्या देहाचे अवलोकन करीत होतो. तेवीस-चोवीसची असेल. चाफ्याचा रंग -- आणि ती डोके हलवीत बोलू लागली की मोत्यांची कर्णभूषणे विजेसारखी चमकत.

" पेटी बाहेरच असू द्या. कुलीला जाऊ द्या. मी जरा खोली स्वच्छ करते. "

ती खाली गेल्यावर मी खोलीत चौफेर नजर फिरवली.' दोन मोठ्या खिडक्या आहेत. पुष्कळ उजेड येईल. शुद्ध हवा मिळेल, माणसाने रहावे अशी ही खोली आहे. त्या बुढ्ढयाच्या कोठडीसारखी नाही. मालकीणही भली दिसते, नाहीतर खोली तिने स्वतः कशाला साफ केली असती ? ही ओसरीही चांगली आहे. इथे बसून हिरवळ पहाता येते. "

" उभेच आहात ?" ती केरसुणी घेऊन आली. " आता नीट करून देते."

तिने खोली साफ करून ओल्या फडक्याने पुसली. पेटी व अंथरूण आत ठेवायला मला मदत केली. आता मला तिचा चेहरा नीट दिसला. तिचे डोळे मनोहर नव्हे, तर तीक्ष्ण होते. त्यांतून बोचक प्रश्न डोकावत होते. पण मी दुर्लक्ष केले.

तिने विचारले, " याआधी शंकरनच्या घरात होतात का ?"

" हो. "

" तुम्ही तिथं राहिलात तरी कसे ?"

" काय सांगू ? राहिलो झालं. खोली काय उंदराचं बीळ होतं. "

" त्या उंदीरमामाशी जुळणं फार कठीण आहे."

" तुम्ही त्यांना ओळखता ?"

" चांगलंच. " ती मनःपूर्वक हसली.

" मोठा सैतान कोण आहे ?– बाप की लेक ?"

" सैतान आणि पिशाच्च !" ती पुन्हा एकदा हसली.

" त्याचा मुलगा पिशाच्चच म्हणावा लागेल !" मलाही हसू आले. मला तिचे बोलणे फार आवडले. एकूण माझ्यासारखाच विचार करणारे इतरही आहेत.

" ते तुम्हांला एकदम हाकलायला तयार झाले असतील, नाही का ?"

तिला हेही माहीत असेल, याची कल्पना मला नव्हती. मला हे आवडले नाही.

" आपलं घर नसतं तर लोकांना सडकेवर रहावं लागेल, असंच त्या पिशाच्चाला वाटत असेल !"

ती म्हणाली, " त्याचा स्वभाव तसाच आहे."

मीही सहमत झालो.

"त्याला काय माणूस म्हणायचं ?"

"छे: !"

"मला तर त्याचं तोंड पहायलासुद्धा आवडत नाही."

"किळस येते." मी विचार जुळल्याच्या खुशीत तिच्याकडे पाहिले. तिच्या डोळ्यातही खुशी नाचत होती.

"आपलं नाव ?" मी विचारले.

"पंकजम्."

"वडील !..."

"आहेत. बाहेर गेले आहेत. आम्ही शेजारच्या घरात रहातो. एखाद्या वस्तूची गरज लागली तर मला सांगा."

"ओह !"

पंकजम खाली निघून गेली. ओसरीतल्या खांबाला टेकून मी तिचाच विचार करीत राहिलो. हसतमुख, उत्साही स्त्री, कामात हुशार ! अजिबात लाजत नाही. स्त्री, असावी तर अशी.

"टोमॅटो घ्या टोमॅटो !" खालून आरोळी आली. ती ऐकल्यावर माझी तंद्री भंगली. आता आंघोळ केली पाहिजे. उत्तर न देता मी खोलीत गेलो.

मी आंघोळ करून व कपडे घालून बाहेर आलो, तेव्हाही पंकजम खालच्या व्हरांड्यात वावरत होती.

"जेवायला जात असाल ?" तिने विचारले.

"हो."

मी बाहेर निघून गेलो. दुसऱ्या दिवशी सकाळीही पंकजम माझ्या दाराशी आली. शेजारच्या सगळ्याच खोल्यांत जाऊन तिने क्षेम विचारले होते. बाजूच्या खोलीत एक मुनीम रहातो. नेहमी शांत, आपल्याच विचारात मग्न. समोरच्या खोलीत जंगी मिशांचा लठ्ठ माणूस आहे. तो एका मुख्याध्यापिकेचा पती आहे. बायकोशी भांडून इथे आलेला आहे. त्याचा चेहरा पाहून वाटते की कोणी याच्याशी बोलले तर एकदम ढसढसा रडेल. दुसरीकडच्या खोलीत एक विलक्षण माणूस रहातो. खादीचे कपडे घालतो. केस कोरडे, अस्ताव्यस्त आणि चेहऱ्यावर डाग. त्याच्या खोलीतून येणाऱ्या गप्पांच्या आवाजांवरून मला कळले की तो राष्ट्रीय नेते आणि मंत्री यांना लाखोली वहात होता. पंकजम स्मित करीत तेथून आली व माझ्या दरवाज्याशी

उभी राहिली.

" काही अडचण–गैरसोय तर नाही नं ?"

" नाही."

" एक लेखकही इथं आला. याचा मला आनंद वाटतो."

ती मला लेखक समजते ? आतापर्यंत मला वाटत होते की तिला माझ्याविषयी आदर वाटतो. हसू आवरीत मी म्हणालो, " त्या खोलीत रहाणारा...?"खादी-धारीची चौकशी केली.

पंकजमने हलक्या आवाजात त्याची हकीगत सांगितली.

" पागल आहे का ?"

" सांगता येत नाही."

" राष्ट्रीय चळवळीत भाग घेऊन चारदा कारावास भोगलेला अन कित्येकदा देहदंड सोसलेला माणूस आहे. मुंबईला मुलगा आहे. तोच पैसे पाठवतो. त्यावर गुजराण होते. सकाळपासून संध्याकाळपर्यंत जगाला शिव्याशाप देत असतो."

" निराश माणूस काय करणार नाही ?"

" पुष्कळच."

" बसा, " मी पंकजमला म्हणालो. ती बसली नाही, पण गेलीही नाही. उभ्या-उभ्या गप्पा करीत होती. गप्पा लवकरच शंकरनकडे वळल्या. त्या वेड्याला त्याने किती क्रूरतेने वागविले होते, त्याचे विस्तृत वर्णन पंकजमने केले.

मी मधेच विचारले, " तुम्ही त्याला चांगलं ओळखता ?"

" तेच तर माझं दुर्दैव आहे."

" याचा अर्थ ?"

तो प्रश्न विचारायला नको होता, पण माझ्या तोंडून निघूनच गेला.

" नऊ महिने त्या मूर्खाबरोबर काढले, हाच माझा जीवनातला पराभव आहे."

" म्हणजे...?" मी उभा राहिलो.

" तुमचा अंदाज अगदी बरोबर आहे. मी त्याची बायको होते."

मला काहीच बोलता येईना.

माझे ओशाळलेपण लक्षात येऊन पंकजम म्हणाली, " त्याच्याबरोबर कुणी मनुष्य जिवंत राहू शकेल ?"

नाही, तेव्हा मी तसे म्हणालो नाही.

ती सतत बोलत राहिली, मी ऐकत राहिलो. " त्यानं माझ्याशी अपमानास्पद

वर्तन कितीदा तरी केलं असेल ! मी चुपचाप सहन करायची. शेजारीपाजारी काय म्हणतील, असा विचार करून; पण सहनशक्तीलाही मर्यादा असते."

" हो नं..."

" त्याला काही समजतच नाही."

" पंकजम, मला तुमच्याविषयी सहानुभूती वाटते."

" वाटेलच. ज्याला हृदय आहे, त्याला दु:ख होईलच, तुम्ही साहित्यिक आहात नं ? तुमचा मानवी भावनांचा अनुभव अधिकच विस्तृत असेल !"

मूर्खासारखे माझे हसणे लपवीत मी विनयपूर्वक ऐकत होतो.

" माझ्यामुळं तुमची कामं खोळंबली आहेत." असे म्हणून ती निघून गेली.

सकाळी लवकरच ती माझ्या खोलीत येत असे. जगातल्या सगळ्या विषयांवर चर्चा व्हायची. शंकरनची खूप निंदा करायची.

हळुहळू खादीधारीही आमच्यात सामील होऊ लागला.

" सध्याच्या काळात हे अन यापेक्षाही वाईट घडू शकते. माणसात सचोटी आहे ? मी हेच विचारतो. आजकालच्या नेत्यांचा आपल्या अनुयायांवर विश्वास नाही. आपल्या नेतृत्वाला शह तर मिळणार नाही, हीच भीती. बाकी लोकांनी घरातल्यासारखे उभे राहिले पाहिजे. हे शक्य आहे, सर, शक्य आहे का ?"

नाही, हे शक्य नाही, असे मी म्हणालो नाही.

" आपल्या बायकोवर नवऱ्याचा विश्वास नाही," पंकजमने मधेच मत दिले.

" बायकांचा नवऱ्यांवरही नाही."

एकदम हे वाक्य ऐकू आले. मागे वळून पाहिले तो मुख्याध्यापिकेचा नवरा दारात उभा होता. त्याच्या डोळ्यांतून दोन-तीन अश्रुबिंदू भल्या थोरल्या मिशांवर पडले. त्या दृश्यामुळे गंभीर शांतता पसरली. कोणी काही बोललं नाही. हळूहळू सगळ्यांनी काढता पाय घेतला. पंकजमदेखील लवकरच खाली गेली. " मनस्साक्षीरहित जीव !" म्हणून खादीवालाही आपल्या खोलीत गेला. मुख्याध्यापिकेचा नवरा म्हणाला, " जग किती दु:खी आहे ! "

मला एक भावगीत लिहायची स्फूर्ती झाली होती. झोप येत असल्यामुळे मी अंथरुणावर पडलो.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी मी ओसरीवर बसलो होतो. मुख्याध्यापिकेचा नवरा बाहेर उभा असलेला दिसला. शाळा सुटायच्या वेळी झाडाच्या सावलीत फाटकाजवळ उभा राहून परतणाऱ्या बायकोकडे पहात असे. ती दृष्टीआड झाली की मिशां-

वरील अश्रू पुशीत खोलीकडे वळायचा. हे आत्मत्यागाचे सुख तो प्रत्येक दिवशी अनुभवीत असावा. त्या दिवशीही तो सुळावर चढायला गेला होता. खादीवाल्याची झोप ! दुपारी चार वाजल्यापासून रात्रीचे आठ वाजेपर्यंत तो झोप काढतो. उरलेला वेळ शिव्यांचा भडिमार करतो. रात्रभर पत्रे लिहितो. हाच त्याचा दैनंदिन कार्यक्रम आहे. रोज पत्रांची एक थप्पी रवाना करतो. या घरात मन:शान्ती मिळते ती फक्त याच वेळी. मी कठड्यावरून खाली पहात होतो. सूर्य तळपत होता. पसरलेली हिरवळ पहाताना मनात आले, आपल्याला वाटते तितके जग वाईट नाही.

" टोमॅटो घ्या – टोमॅटो ! "

खालून आवाज आला, सामान्यत: फेरीवाल्यांच्या झकेकडे मी लक्ष देत नाही; पण त्या दिवशी उत्तरलो, " नकोत बाबा ! "

" काय नकोत ? "

तोच प्रश्न मागून आला. वळून पाहिले तो पंकजम उभी होती. मी उभा राहिलो.

" बसा."

" नको, आपण बसा. मी इथं बसते. " असे म्हणून तिने खुर्ची ओढली, तिने लाल साडी व पिवळे पोलके घातले होते, ती मला छ न वाटली.

संध्याकाळच्या तिरप्या सूर्यकिरणांत तिचे भे क डोळे सुरीच्या धारेसारखे चमकले.

" तुम्ही कुणाशी बोलता आहात ? " तिने .वचारले.

" टोमॅटोवाल्याशी – "

" ओह् ! बस ! " म्हणून ती दूर बसली.

त्या दिवशीही आमच्या गप्पांचा विषय शंकरच होता.

" आता तो जवळ येण्याचा प्रयत्न करतोय. " ती म्हणाली.

" काय झालं ? "

" त्यानं विचारणा केलीय – काकींमार्फत. "

" मग ? "

" त्याच्याबरोबर रहायला ! त्याच्याबरोबर तर सापही राहू शकत नाही ! "

मी काही बोललो नाही, तिच्याकडे बघत राहिलो,

" पिताजी गप्प बसले, पण मी सोडलं नाही. "

तिने पुन्हा सगळी कहाणी ऐकवली.

" मग इतकं बिनसायचं काय कारण आहे ? " मी मधेच विचारले, " माझं विचारणं अनुचित असेल तर क्षमा करा. "

" तसं नाही. उलट इतके दिवस तुम्ही विचारणा केली नाही, याचंच मला वाईट वाटतं. मला सगळ्या गोष्टी छपरावर उभं राहून जगाला ओरडून सांगाव्यासं वाटतं. "

" का ?"

" तो गुलाम आहे. "

" कुणाचा ?"

" आई, वडील, व्हरांड्यातील कठडा, सगळ्यांचा. सिनेमा पहायला आईची परवानगी हवी. प्रत्येक कामाला त्यांची परवानगी मागायची. मी तिथं बाहुलीसारखी होते. ते सगळं सोसलं. शेवटची गोष्ट ऐका. त्याच्या नावे दहा दुकानं आहेत. दुसऱ्यांना हाकलून अलीकडेच विकत घेतली होती. मी म्हणाले की ती माझ्या नावे करून द्या. पैशासाठी मी हे म्हणाले नव्हते. मी फक्त त्याची परीक्षा घेत होते. "

" मग ?"

" बस, भांडण झालं. एका बाजूला आई अन दुसरीकडं मी. मीही पिच्छा पुरवला. वादावादी झाली. मला मारायला धावला तर मी झिडकारलं. 'दूर हो !' असं म्हणून मी माहेरी निघून आले. "

" मग ठीक आहे. "

" माझ्यावर विश्वास नव्हता म्हणूनच माझ्या नावावर करायला तयार नव्हता नं ?"

" दिसतं तर तसंच. "

" मग मी तिथं कशाला राहू ? पैशाच्या लोभानं नव्हे, तर परीक्षा पहायला तुम्हांला घर दिलं म्हणून तो कालच शेजाऱ्यांजवळ वेडंवाकडं बोलत होता. "

" असं ?"

" माझं घर कुणाला भाड्यानं द्यायचं ते ठरविण्याचा अधिकार माझाच आहे नं ?"

ती माझ्याकडं पहात होती आणि मी खिडकीबाहेर. संभाषणाला गंभीर वळण मिळाले होते.

ती सारखी बोलत राहिली. मी ऐकत होतो. काही बोललो नाही. बोलण्याजोगे काही नव्हतेच, ती पायऱ्या उतरू लागली तेव्हा वळून विचारले –

" आज तुम्ही जेवायला गेला नाहीत ?"

" नाही, " मी संकोचून म्हणालो, " पोट ठीक नाही. "

" तसं असेल तर मी पाचक गोळी पाठवते. "

वस्तुतः माझ्या पोटात कावळे कोकलत होते. पोटात आतड्यांशिवाय दुसरे काही नव्हते, पण आशेवर जगत होतो. कारण, संपादकाने दहा रुपये द्यायचे कबूल केले होते. गोळी खाल्ल्यावर पोटभर जेवता येईल.

बाहेरून आलो तो खादीवाल्याच्या खोलीतून चार-पाच लोकांच्या आरडाओरडीचा आवाज येत होता. खूप मोठ्याने गप्पा आणि सात मजली हसणे. आजपर्यंत त्या खोलीतून असा गोंधळ ऐकू आला नव्हता. मी वाकून पाहिले. पाच-सात माणसे असतील. मी येऊन आपल्या खोलीत निजलो. ते सगळे केव्हा गेले मला कळलेच नाही, मी मनोराज्यात पंकजमचे रूप पहात झोपलो.

दुसऱ्या दिवशी सकाळी खादीवाला स्मितहास्य करीत माझ्या खोलीजवळ येऊन उभा राहिला. शिव्या देत नव्हे, तर हसत खोलीत आला. " जिवलग मित्रांचा हट्ट आहे, मी कसा टाळणार !" म्हणून तो हसू लागला. माझ्या लक्षात काहीच येई ना. मी प्रश्नार्थक मुद्रेने त्याच्याकडे पाहिले.

" मलाच उभं रहायला हवं !"

" काय ?"

" उमेदवार म्हणून उभं राहिलं पाहिजे. काळ बदलत आहे. हा : ... हा : ... हा : ... !"

" निवडणूक ? "

" हो, मला सगळ्या जनतेचा पाठिंबा आहे. त्यांना नेतृत्व हवंय, सेवेच्या बाबतीत माझं पाऊल नेहमीच पुढं होतं. हा : ... हा : ... हा : "

त्या दिवशी त्याला खूप कामे करायची होती. पत्रे लिहायची, सामान आवरायचे, नोकराला बोलवायचे, पायऱ्या उतरून जायचे .., खूपच धांदल आहे.

संध्याकाळी मला म्हणाला, " आज जागा बदलतोय. "

" नमस्कार ! " मी म्हणालो.

" नमस्कार ! हा : ... हा : ... हा: "

हसत हसतच तो पायऱ्या उतरू लागला. मीही फाटकापर्यंत निरोप द्यायला गेलो. परतताना मुख्याध्यापिकेच्या नवऱ्याच्या मिश्यांवर अश्रूंचे दोन-तीन थेंब पडलेले दिसले.

त्याच्या लाखोल्या थांबल्यावर एकान्ताचा अनुभव आला. वातावरणात विषाद पसरला. संध्याकाळी पंकजम येऊन म्हणाली, " त्याचे शिव्याशाप थांबले. सगळे लोक असेच असतात. "

" ह्रो नं. "

" पण मी त्याच्या जागी असते तर मित्रांना बाहेर हाकलून दार लावून घेतलं असतं. अन तुम्ही असता तर ? "

या प्रश्नाची अपेक्षा मी केली नव्हती. थोडा विचारात पडलो. तरीही म्हणालो, " दरवाजा बंद करून कुलूप ठोकलं असतं. आठवडाभर उघडलं नसतं. "

तिने हसून माझ्याकडे पाहिले. म्हणाली, " तुम्ही फार अशक्त होत आहात. पौष्टिक अन्न खाल्लं पाहिजे. "

" ठीक आहे. "

" तुम्ही पैशाच्या अडचणीत आहात का ? "

" नाही. तितका नाही. "

" लेखकाच्या अडचणींची कल्पना मला आहे. मी सगळी व्यवस्था केलीय. आज-पासून तुम्ही इथंच जेवणार आहात. "

" इतका त्रास का घेता ? "

" माणसानं माणुसकी नाही दाखवायची ? सगळे त्या घराच्या मालकासारखे असतात, असं मानू नका. "

" मी असा विचार कधी केला नाही. "

" एक सांगू ? आज त्याचा माणूस आला होता. "

" कशाला ? "

" निरोप आणला की दुकानांतल्या निम्म्या खोल्या माझ्या नावे लिहून द्यायला तयार आहे. "

" प्रगती होत आहे ! "

" त्याचा लोभ तर पहा ! दुकानाच्या पायऱ्या माझ्या नावावर करायला तयार झाला नाही, हे माझं नशीब ! असं उत्तर मी पाठवलं. भाड्याचे एकूण अडीचशे रुपये येतात, त्यातले अर्धे त्या दादाला अन बाकीचे मला. मी सव्वाशे रुपयांची बायको होणार. मी त्याला जाऊ दिलं झालं. त्याला माफ केलं. तुम्हांला काय वाटतं ? "

" क्षमा केली, चांगलं झालं. "

" तुम्हांला आमचं जेवण आवडतं की नाही कुणास ठाऊक ! "

" आवडेलच. "

एक महिना आणखी उलटला. भाडे अजून देता आले नव्हते. दोन महिन्यांचे भाडे

थकले होते.

"मी भाडं दिलं नाही," मी आठवण दिली.

"काही हरकत नाही. मी त्या दादासारखा व्यवहार पहाणारी नाही. गरिबी अन श्रीमंती माणसाच्याच आयुष्यात येतात ..."

ती पायऱ्या उतरत होती आणि मी पहात होतो. महालक्ष्मी आहे.

आणखी तीन दिवसांनंतरचा प्रसंग. मी खिडकीतून वाकून पहात होतो. सकाळची वेळ आहे. बाजारात गर्दी जमत आहे. मोटरी, सायकली, भिकारी आणि विद्यार्थी घाईघाईने इकडून तिकडे जात-येत आहेत. त्याच वेळी मला शंकर दिसला. कितीही गर्दी असली तरी तो मूर्ख मला चटकन ओळखू येतो. तो या धराकडे येत आहे. वाली ऋष्यमूक पर्वतावर चढत आहे?

मी खिडकीतून डोके आत घेतले. काही क्षणांतच तो माझ्या खोलीसमोर येऊन उभा राहिला.

"कशाला?" मी विचारले.

"थकलेल्या पैशांसाठी."

"सध्या माझ्याजवळ नाहीत."

"केव्हा देऊ शकाल?"

"असतील तेव्हा घरी पोचवून देईन."

"हे म्हणणं ठीक नाही."

"मला औचित्य शिकवायला आला आहात?" मला राग येत होता.

"आम्हांला मूर्ख बनवीत आहेस?" यानंतर भांडण जुंपले. मीही मागे हटलो नाही.

"हे पहा, हे तुमचं घर नाही." मागून आवाज येताच शंकरने वळून पाहिले. पंकजमची मुद्रा रागाने लाल झाली होती. आता शंकर असहाय झाला.

"इथं येऊनही भांडाभांडी करता का?" पंकजमने पुन्हा विचारले.

"ये, मला तुला काही सांगायचंय. तुलाही भेटायला आलोय." शंकर पंकजमला म्हणाला.

"तू मला भेटायला कशाला येशील?"

पंकजम निश्चल उभी होती.

"खरंच, तुलाच भेटायला आलोय. ये." तो पायऱ्यांकडे वळला, मी लक्षपूर्वक ऐकले.

" मी तो आणला आहे. हे पहा वारसापत्र. सगळ्या खोल्या तुझ्या नावावर झाल्या आहेत. "

" तर तुमचा माझ्यावर विश्वास बसला ! "

" तुझ्याशिवाय जगणं कठीण आहे ... " पुढे मला ऐकू आले नाही. ते पायऱ्या उतरून निघून गेले.

आता काय होईल याचा विचार मी करीत राहिलो. पंकजम त्याचा स्वीकार करणार नाही. कानउघाडणी करून त्याला हाकलून देईल. त्याच्याबरोबर सापही राहू शकत नाही.

त्या दिवशीही जेवण आले. मी आरामात होतो, पण पंकजमला काय झाले होते कुणास ठाऊक ? तो वर येत नाही. तिची वार्ता कळावी म्हणून मी उत्सुक झालो होतो. संध्याकाळी तर ती येईलच. तिच्या अपूर्व रूपाने माझ्या हृदयात लहरी उत्पन्न केल्या होत्या. एकूण तिचे इंद्रधनूसारखे रूप अनन्य आहे.

संध्याकाळच्या आधीच व्हरांड्यात फिरू लागलो. वेळ जात आहे. थोडीशी सळसळ झाली तरी भोवती पहातो पण ती दिसली नाही. मावळतीचा थोडा प्रकाश अजून शिल्लक आहे.

असे वाटले की ती यणारच नाही. पण तसे कसे होईल ? मी प्रतीक्षा केली. उन्हाचा रक्तिम वर्ण बदलला, अंधार झाला, पण ती आली नाही.

ती येत नसेल, तर मी तिची प्रतीक्षा का करावी ? मी खोलीत जाऊन बसलो. कवितेचे पुस्तक उघडले. प्रेमभंगाच्या कवितेचे एकाग्रतेने चिंतन केले पाहिजे; पण मन एकाग्र करायचा प्रयत्न केला की ते भरकटत जाते. कविताचाचनाने कधीकधी मन शांत होते.

" हे जीवनपतंग
तू दुःख भोगतोस
कालचक्र फिरत असताना
सुंदर देह नटवतोस. "

जीवन-पतंग बद्ध झाला आहे, मग ? छेः ! काही गंमत नाही. पुस्तक बंद केले. निद्रेची आराधना करीत आडवा झालो; पण कानात शब्द घुमत होते, " हे जीवन पतंग तू... हे पतंग तू..."

उजव्या कुशीवर निजलो. डावीवर निजून पाहिले, गुणगुणलो, पुन्हा गप पडून राहिलो. झोप केव्हा लागली त्याचा पत्ता नाही. झोप उघडली तेव्हा समोर

पाहिले, तो ठेवलेले जेवण थंड झाले होते. फेकून द्यावेसे वाटले. कोणी ठेवले असेल ? बहुधा नोकराने.

मी अंथरुणावर बसलो. एक विडी शिलगवली. कोणाची तरी चाहूल लागली. शंकर समोर येऊन उभा राहिला. तोच मला म्हणाला, " भाडे ?"

" काल मी जे म्हणालो, तेच उत्तर कायम आहे."

" नाही, या खोलीचं भाडं. " मागून एक मधुर आवाज आला. ती पंकजम होती. मी शंकरकडे पाहिले. त्याला खेटून उभ्या असलेल्या पंकजमलाही पाहिले. चारही बाजूंना पाहिले. काही न बोलता अंथरूण लपेटले. पेटीला कुलूप लावले. दोन्ही वस्तू एकत्र ठेवल्या.

" मी आज जातोय."

" भाडे..." शंकरने पुन्हा विचारले.

मी उत्तर दिले नाही.

" भाडे दिल्यावर आपल्या वस्तू घेऊन जा, समजलं." अतिशय गोड आवाजात पंकजम म्हणाली.

मी कपडे बदलून बाहेर जाताना पंकजमने विचारले, " किल्ली कुठं आहे ? तिची डुप्लिकेट नाही."

" ती पहा." मी बोटाने दाखविले आणि चालू लागलो. पायऱ्या उतरत असताना मुख्याध्यापिकेचा पतीही मागोमाग आला. फाटकापर्यंत आल्यावर तो म्हणाला, तूही चाललास ?"

" हो."

त्याने एकदा खोल श्वास घेतला. त्याच्या डोळ्यांच्या कडा भिजल्या. आम्ही एकमेकांकडे पहात नुसते उभे होतो. मला वाटले, मी माझेच रूप पहात आहे. त्याला काय वाटले याची कल्पना नाही.

" टोमॅटो घ्या टोमॅटो !" जवळून आवाज आला.

" आण रे बाबा !"

मी खिसा चाचपला. साडे नऊ आणे होते. दोन पिकलेले टोमॅटो घेतले. मुख्याध्यापिकेच्या पतीला एक देऊन म्हटले, " हा टोमॅटो खा. त्यात व्हिटॅमिन असतात."

दुसरा टोमॅटो खात मी सडकेवर पोचलो आणि निरोपादाखल हात हलवला. पेटी आणि अंथरूण यांचेही ओझे नाही. कवितेचा अंश कानांत घुमतच होता...... हे जीवनपतंग... हा टोमॅटो चांगला आहे-- ती कविताही चांगली आहे.

# भूक आणि तहान

—वेट्टूर रामन नायर

पोन्नन बाजारातून परतत होता. संध्याकाळ व्हायला आली होती म्हणून त्याने चालण्याचा वेग वाढवला. भुकेमुळे आतडी तुटत होती, एक कप चहा पोटात गेला, तर तरतरी येईल....पूल ओलांडल्यावर एकही दुकान लागत नाही, त्याने खिसा चाचपून आठ आण्यांचे नाणे काढले. ' उद्या रविवार आहे. एक पैसाही मिळण्याची शक्यता नाही. सोमवारी सकाळीदेखील चहा प्यावा लागेल. हे आठ आणे खरचणे योग्य होणार नाही. ' असा विचार करून त्याने ते जिथल्या तिथे ठेवले.

डावीकडच्या दुकानासमोरील पेटलेली वात पाहून त्याने खिशातून बिडी काढून पेटवली, फुग्यामारखी दिसणारी लाल केळी दुकानापुढे टांगली होती, ती पहाताना तोंडाला पाणी सुटले. पैसे चाचपडले आणि पिकल्या केळ्यांचा स्वाद डोळ्यांनी घेत तो पुढे चालू लागला. विचार केला, ' पाच्चुनायरला आठ आणे मिळाल्याचा फार आनंद होईल अन तो सोमवारीही चहा देईल. काही का असेना, थोड्या वेळाने पाहू.' विडीचा धूर वर सोडीत तो चालू लागला.

रस्ता निर्मनुष्य होता, त्याच्या दोन्ही बाजूंना लहानसहान झाडे वाढली होती. रानफुलांच्या मादक सुगंधाने संध्याकाळची हवा मादक वाटत होती. लांबवरचे क्षितिज तापलेल्या खुरप्याच्या धारेप्रमाणे दिसत होते.

निसर्गाच्या सौंदर्यात हरवलेला पोन्नन पुढे चालला होता. जवळच्या झऱ्याच्या झुळझूळ आवाजाने तो भानावर आला. छोटासा कालवा आहे. एकदम स्वच्छ पाणी ! स्नानाची सोय आहे. पोन्ननला स्नानाची तयारी करावी लागत नसेच. कपडे उतरवून घाटावर ठेवले आणि पाण्यात शिरला. थंड पाण्याची नशा त्याला चढली. गळाभर पाण्यात बराच वेळ डुंबत राहिला. नंतर अंग पुसून कपडे घातले. पोटभर पाणी प्याल्यावर तो भूक आणि अशक्तपणा विसरला. एक गाणे गुणगणत पुढे चालू लागला.

पृथ्वी जणू अंधार ओकत होती. त्या झऱ्याचा मंजुळ रव अजूनही कानावर पडत

होता. पुष्पसुगंधाने वातावरण भरले होते. पोन्नन निसर्गाशी जणू एकरूप झाला होता, रोमांचित होत होता. रात्री रंगलेला क्रीडाविहार त्याला आठवत होता. लज्जित होऊन आपलेच विचार टाळण्याचा त्याने प्रयत्न केला, पण त्याला न जुमानता कित्येक सुंदरी त्याच्या मनश्चक्षूंसमोर येऊन उभ्या राहिल्या. त्यांच्या स्पर्शसुखासाठी मन आसुसले. आवळेवाली आणि गवत कापणारी त्याच्या मनात डोकावल्या. मुली सगळ्याच सुंदर असतात, कमी वयाच्या तर अधिकच. मळक्या कपड्यांतही त्या किती लोभस वाटतात. यांतल्या एखादीशी लग्न केले तर ? पण हे कसे शक्य आहे ? एका बाजारातून दुसऱ्या बाजारात आणि एका दुकानातून दुसऱ्या दुकानात ठोकर खात जाणारा पत्नीबरोबर संसार काय करणार ? स्त्री-सहवासाची तहान किती वर्षे झाली पण भागत नाही.

अचानक पोन्ननने आपल्या वयाचा विचार केला. पण त्या बाबतीत तो अनभिज्ञ होता. त्याला फक्त एवढेच आठवते की कमीत कमी गेली दहा वर्षे तो स्त्रियांची स्वप्ने पहात आहे. दहा वर्षे !

अजूनही झऱ्याचा आवाज कानांवर येत होता, फुलांचा सुगंध दरवळत होता. आपल्या प्रेयसीचे मानस चित्र पोन्ननने रेखाटले. त्या गवत कापणारणीच्या किंवा आवळेवालीच्या रूपाचा अप्रत्यक्ष अनुभव त्याला आला. ती कोणीही असेल. झोपडीतल्या एकान्तात माझ्याबरोबर संसार करणारी एक स्त्री आहे—बस्स.

आकाश अंधारात लपले. हिरवीगार बहरलेली झाडे ओळखता येईनात. दूर गावात दिवे लागले. सडक अंधूक दिसू लागली. झऱ्याने दुसऱ्या दिशेचा मार्ग पत्करला.

पोन्ननने भानावर येऊन नजर समोर फेकली. कोणी माणूस जाताना दिसला. तो समोरच चाललेला आहे. एक अव्यक्त आणि असाधारण स्पंदन. त्याने वेग वाढवला. समोरची आकृती हळुहळू पुढे सरकत होती.

चारपाच मिनिटांतच तो तिच्या जवळ पोचला. त्याने आश्चर्याने पाहिले—ती एक मुलगी होती. त्याचे हृदय धडधडू लागले. त्याच वेळी स्त्रीने मागे वळून पाहिले. जास्तीत जास्त वीस वर्षांची युवती. काखेत एक गाठोडे. पोन्नन तिच्याबरोबर चालू लागला.

त्याला तिच्याशी बोलावेसे वाटत होते; पण हृदय धडधडत असल्यामुळे शब्द फुटत नव्हता. मौनातच काही क्षण गेले. त्याला थंडी वाजू लागली. शरीर कुडकुडू लागले, दात कडकडा वाजू लागले.

ती युवतीही त्याच्याकडे भय, संशय आणि विनयमिश्रित भावांनी पहात होती. तिला आपला थोडा विश्वास वाटू लागलाय, असे त्याला काही वेळाने जाणवले. आपला शान्त स्वभाव स्त्रीने विश्वास ठेवावा इतका चांगला आहेच, अशा विचाराने पोन्नने बोलायची हिम्मत केली. " कुठं जायचंय ?" पोन्ननचा कंठ विचारताना गदगदित झाला होता.

तिने सोळा मैलांवरील गावाचे नाव सांगितले.

" तू कुठं जातोयस ?" ती विचारू लागली.

काही वेळाने पुन्हा विचारले. त्याने तीन मैलांवरील बाजार भरणाऱ्या गावाचे नाव सांगितले.

काही क्षण दोघांचे मौन, पोन्नन वारंवार तिच्याकडे पहात होता. ती न बोलता त्याच्या मागून चालत होती.

पोन्नने विचारले, " तू एकटी तिथपर्यंत जाशील ?"

" हो, का नाही जाणार ?" ती आळसावल्या स्वरात म्हणाली.

" तिथं पोचेपर्यंत तर मध्यरात्र होईल."

" हो."

इतके बोलून ती गप्प. पुन्हा काही वेळ स्तब्धता.

पोन्नने शांततेचा भंग करीत विचारले, " तू कुठून आलीस ?"

तिने एका दूरच्या शहराचे नाव सांगितले.

" तिथं कशाला गेली होतीस ?"

तिथं एका ठिकाणी घरकाम करीत होते."

" मग ?"

" ते सोडून परत जातेय."

" का बरं ?"

" ती थोडी संभ्रमात पडली आणि मग लाजत म्हणाली,

" ते एक मोठे ऑफिसर आहेत."

" त्याचा काय संबंध ?"

" माणूस चांगला नव्हता."

" पगार देत नव्हता ?"

" पगार देत होता, ठरल्यापेक्षाही जास्त देत होता."

पोन्नला भानगडीची थोडीशी कल्पना आली, " मग काय ?"

" मोलकरीण ठेवायच्या लायकीचा तो नाही. " ती लाजत म्हणाली.

सगळा प्रकार पोन्ननच्या ध्यानात आला. त्याला ऑफिसरच्या वर्तनाची घृणा वाटली.

" त्याला बायको नाही ?"

" आहे तर ! मोठ्या मोठ्या मुलीही आहेत. सगळ्यांचा डोळा चुकवून तो मोलकरीण गाठतो. "

आता अंधार फारच वाढलेला होता. अगदी जवळ आलेली व्यक्तीच ओळखता आली असती. ते दोघे हळुहळू चालत होते.

" तुझं नाव ?"

" मीनू —— "

" घरी कोण कोण आहे ?"

" आई, दोन धाकटया बहिणी नि लहान भाऊ."

" अन तुला ?" तिने विचारले.

" एकटाच आहे. "

" आईवडील कुणीच नाहीत का ?"

" नाही——"

" बायको ? "

" नाही. "

तोही अनाथ आहे. ती मन मोकळे करून आपली दुःखपूर्ण कहाणी सांगू लागली. पुरुषाला आपले हृद्गत सांगण्याची इच्छा स्वाभाविकच म्हटली पाहिजे.

संभाषणाची गाडी पुढे सरकली. पोन्ननला वाटले की अंधार गडद होतोय.

" या दाट अंधारात तू घरी एकटीच जाणार ?"

" मी एक आगपेटी न एक मेणबत्ती विकत घेऊन ठेवलीय. "

" ती कुठपर्यंत पुरेल ?"

तिला उत्तर देता आले नाही.

" मेणबत्ती पेटवायचीय ?" थोडया वेळाने त्याने विचारले.

" नाही."

" तू उद्या सकाळी गेलीस तर नाही चालणार ?"

" शक्य नाही."

त्याने विचार केला, ' ती तयार झाली तर मी हिला आश्रय कुठं देणार ?' ही

चिंता त्याच्या मनात असताना तिचाही चेहरा चिंतामग्न दिसत होता.

त्यांनी दोन मैलांचे अंतर तोडले तोपर्यंत आठ वाजले असावेत. अंधारात ते एकमेकांना पाहूही शकत नव्हते. कधीकधी ते एकमेकांवर आदळत; पण पोन्नने तिला मेणबत्ती पेटवण्यास सांगितले नाही. त्याने स्वतःही पेटवली नाही.

जात असताना एका वळणावर ते शंकित होऊन उभे राहिले. समोर ताडीचा गुत्ता होता आणि बाहेर दूरवर तिथला प्रकाश दिसत होता. सडकेच्या बाजूला कपडा बांधून त्यावर मोठ्या अक्षरात 'ताडी' लिहिलेले होते. त्यामुळे पिणारे दुरूनच आकर्षित होत. तिथे पहाटेसारखा मंद प्रकाश आहे. बैलगाडीवाले आराम करतात. रात्रभर गडबड असते.

"हे पहा, तिथं बरीच गर्दी अन उजेड आहे. मला पुष्कळ लोक ओळखतात, म्हणून आपण सडक सोडून शेतातून जाऊ या अन नंतर दुसऱ्या सडकेवर चढू." पोन्नने दूरच्या वळणाकडे संकेत करून संभ्रमपूर्वक विचारले.

"मी नाही येणार, मी इकडूनच जाईन."

"ते पहा, कोणी येतंय. आपल्याला पाहील, इथं उभं रहाणं ठीक नाही. चल, तिकडून जाऊ."

आता पोन्नन पुढे आणि मीनू त्याच्या मागे असे चालू लागले.

ते दोघेही अंधारात अदृश्य झाले. एक फर्लांग गेल्यावर पोन्नन उंचवटयावर चढला. मीनूलाही हात पकडून त्याने वर ओढले. ते कंदमुळांच्या आणि धानाच्या शेतातून जाऊ लागले. पोन्नने मीनूचा हात धरून ठेवला होता. हिरव्या गार शेतांतल्या दाट अंधारातून तो चाचपडत मार्ग काढीत होता. मीनूला धाप लागली होती.

पाऊलवाटा आणि नाल्या ओलांडीत ते पुष्कळ पुढे गेले. त्या उंचवट्यावरून उतरून सडकेवर पोहोचले. मैल दीड मैल अंतर चालून गेल्यावर तो अडचणीचा प्रवास संपला. सडक निर्जन होती. दळणवळण पूर्णतः थांबले होते. पोन्ननला आता धीर आला. त्याला अनेक ठिकाणी खरचटले होते; पण त्याने पर्वा केली नाही.

मीनूने विचारले, "तू रहातोस कुठं ?"

"अशी काही जागा ठरलेली नाही."

"मग ?"

"कुठंही आडवा होईन."

ते चालतच होते. एका झोपडीजवळ आल्यावर पोन्नन थबकला, म्हणाला, "इथं

आराम करून आपण सकाळी पुढं जाऊ या."

" नाही, मी तर आताच जाणार. "

ती त्याचा हात झिडकारून जाऊ लागली. पोन्ननने तिला अडवले.

" तू एकटी तो बाजार ओलांडू शकणार नाहीस. कुणी पकडील. माझं ऐकणं शहाणपणाचं होईल. "

" ओह ! मला माझं रक्षण करायची अक्कल आहे. तुला वाटत असेल, तर तू या झोपडीत थांब. "

ती पुन्हा जाऊ लागली. तेवढयातच पोन्ननला काही अंतरावर प्रकाश दिसला. " कुणी तरी येतंय. पाहील. तू झोपडीत ये. " तो आवेशाने मीनूला म्हणाला.

" नाही, मी येणार नाही, मी आधीच सांगितलंय. "

" काहीही झालं तरी– "

" हो."

तो प्रकाश जवळ येत होता. पोन्ननची छाती भयाने धाडधाड उडत होती. जवळचे आठ आण्यांचे नाणे मीनूला काढून देत तो म्हणाला, " ही घे अधेली. माझ्याजवळ आणखी काही नाही. सकाळच्या गाडीनं तू जाऊ शकतेस. या वेळी इथं थांबणंच योग्य होईल. लवकर आत ये. "

तिची चलबिचल झाली. मग तिने धीटपणे नाणे उचलले आणि म्हणाली, " इथं कुणी रहात नाही ? "

" नाही, हे चहाचं दुकान आहे अन सध्या मोकळंच आहे. तो प्रकाश जवळ येतोय, लवकर आत ये. "

पोन्ननने मीनूचा हात पकडला तेव्हा ती पदरात आठ आणे नीट बांधून ठेवीत होती.

मीनू म्हणाली, " गाडीनं जाणार नाही. पैसे आईला देईन. "

तो तिचा हात धरून झोपडीकडे वळला. मीनू त्याच्या मागे मागे आली. पोन्ननने झोपडीचे दार उघडले. मग वाकून आत गेला. तीही आल्यावर त्याने दरवाजा बंद केला.

अंधारात तो थोडा वेळ थांबला. सुरक्षित असल्याची खात्री पटल्यावर त्याने दिवा पेटवून उंचावर ठेवला, नारळाच्या पानांचे अंथरूण तयार केले व मीनूला त्यावर बसायला सांगितले.

" तो दिवा आण ! " मीनू गाठोडे सोडीत म्हणाली. पोन्ननने दिवा समोर ठेवला

तेव्हा त्याला तिचे सुजलेले पाय दिसले. " हे काय ? " त्याने विचारले.

" हूं ! फार चालल्याने असे झाले आहेत. " तिने गाठोड्यातून एक केळे काढून पोन्ननला दिले. बिडी पेटवताना दुकानात त्याने असेच केळे पाहिले होते. लाल फुग्यासारखे केळे, पोन्नन म्हणाला, " तू खा. मी चहा प्यालो होतो."

" मी एक खाल्लं होतं. आता भूक नाही." पोन्ननने केळे खावे म्हणून ती आग्रह करू लागली.

अखेर पोन्ननने केळे घेतले व थोडे खाऊन बाकीचे तिला दिले. तो म्हणाला, " तुझ्याजवळ काही पैसे असतीलच —— "

" हूं ! दोन आणे होते. तीन पैशांचे केळे घेतले. बाकीच्या पैशांची आगपेटी अन मेणबत्ती. "

" पण तू तर आत्ताच म्हणालीस की एक केळं खाल्लंय. "

" मला भूक नव्हती म्हणून तसं म्हणाले. "

" मग कशाला विकत घेतलंस ? "

" घरी जातेय. धाकट्या भावाला द्यावं, असा विचार करून घेतलं होतं. "

" आता काय करशील ? "

" उद्या विकत घेईन. " तिने सुरक्षित जागेवर असलेली अधेला चाचपडली.

दिवा विझला. नारळाच्या पानातला रातकिडाही गप्प झाला, थोड्या वेळाने पुन्हा किरकिरू लागला, अर्धा तास उलटला. रातकिडा थोड्याच वेळासाठी शांत झाला. चार-पाच मिनिटांनी अधिकच जोराने किरकिरू लागला. हा त्याचा जणू क्रमच होता.

मध्यरात्र झाली होती. पोन्नन दार उघडून बाहेर आला. त्याचे शरीर घामाने भिजले होते. बाहेर गार वारा वहात होता. ताप्यामुळे अंधार थोडा कमी जाणवत होता. तो जमिनीवर बसला. पोटात कावळे कोकलत होते. त्याने दोन्ही हातांनी पोट दाबून घेतले. भुकेने आतडी जळजळत होती. भूक मारण्यासाठी तो पाणी शोधीत होता; पण ते न मिळाल्याने थोडा वेळ तेथेच निजून राहिला.

थंड जमिनीवर आडवा झाल्याने त्याला तरतरी आली. तो उभा राहिला.

दुसऱ्या दिवशीचे काय ? या विचारानेच त्याचे डोके गरगरू लागले. त्याला भूक सहन होत नव्हती. सकाळ झाल्याबरोबर चहाच्या दुकानातील सर्वच्या सर्व पदार्थ पोटात कोंबण्याची इच्छा त्याला होत होती. आता तर जवळ एक पैसाही नाही ——सकाळी काय होईल ? आपला भूकबळी होईल याची त्याला खात्री वाटली.

मीनू झोपली असेल का ? तीही माझ्यासारखीच भुकेली असेल, तिच्याही मनात उद्याच्या खाण्याचे विचार येत असतील. केवळ स्वत:च्याच नव्हे, तर सर्व कुटुंबाच्या. क्षुधाग्नी भडकलेला असतानाच पोन्नन उठून हळूच झोपडीत गेला.

त्याने काडी पेटवली. मीनूचे केस विखुरलेले होते आणि गाढ झोप लागलेली होती. तो दिवा घेऊन तिचा चेहरा निरखू लागला. पण तिची झोप चाळवली नाही. कशी झोपलीय ! तिच्याकडे एकदा पहाण्याचीही शक्ती पोन्ननच्या अंगात आता नव्हती.

दिवा विझल्यावर पोन्ननला एक उपाय सुचला. भुकेने शरीर आणि मन थकले होते आणि वर उद्याची चिंता. तो मीनूजवळ बसला. तिचा उष्ण नि:श्वास त्याच्या पोटाला जाणवला. तो चमकला.

दुसऱ्या दिवशीची समस्या फार मोठी होती. ती कशी सोडवायची, ते सुचत नव्हते.

जाग आल्यावर हाच विचार मीनूलाही सतावील. तीही भुकेली असेल. आमच्या-सारखेच कितीतरी लोक भुकेले असतील. मी गरीब माणूस काय करणार !

पोन्नन सावधगिरीने मीनूजवळ बसला आणि तिचा पदर चाचपडला, दु:ख माहीत नसावे, इतकी गाढ झोप तिला लागली होती. जणू तिच्या स्वप्नात स्वर्गातली दृश्ये दिसत होती. पोन्नने तिच्या पदराची गाठ हलकेच सोडली. 'स्वर्गातल्या इंद्राच्या कुशीत तिला ऊर्वशी बनून झोपू द्या.' पोन्नने अधेली काढून घेतली. उभे राहून गडद काळोखातल्या मीनूकडे त्याने एकदा पाहिले. दु:खाचे आणि कृतज्ञतेचे भाव त्याच्या मनात दाटून आले.

ज्याने चोच दिली, तो चाराही देईल. असा विचार करीत पोन्नन बाहेर निघाला आणि हळूहळू रस्त्याकडे चालू लागला.

# वरमाला

—नागवल्ली आर. एस. कुरूप

दक्षिण भारतातील सगळया शहरांची त्याला उत्तम माहिती आहे. कुठेही पाच-पन्नास लोक जमले की हा गारुडी तिथे पोचलाच.

उंच, हडकुळा आणि काळया रंगाचा माणूस आहे तो.लांब मिश्या आणि गोल लाल डोळे यांनी त्याच्या चेहऱ्यावर गांभीर्य आणलेले आहे. खांद्याला झोळी लटकलेली असून डोक्यावर चारपाच पसरट टोपल्या आहेत. बायको आणि लहान मुलगी सावलीसारखे त्याच्या बरोबर असतात.

त्याने डोक्यावरील ओझे खाली उतरविले की त्याची बायको झोळीतून पुंगी काढून वाजवू लागते. आता खेळ सुरू झाला. गारुडी पुंगी वाजवू लागला की त्या आवाजाने साप टोपलीतल्या टोपलीत फूत्कारतो. पुरेशी गर्दी गोळा झाल्यावर तो सावधपणाने पेटारा उघडतो. बापरे ! पेटारा उघडताच एक भयंकर साप बाहेर डोकावतो. त्याच्या डोळयांची चमक प्रेक्षकांना खिळवून ठेवते. निरुपद्रवी का असेना, साप पाहून कोणाला भीती वाटत नाही ?

गारुड्याच्या पुंगीच्या तालावर फणा काढून साप नाचू लागतो. लोक अधिकच आकर्षित होतात.

तो गारुडी एक चांगला कलाकार आहे. त्याच्या व्यवसायासाठी आवश्यक ते सगळे कौशल्य त्याने संपादन केलेले आहे. तो पुंगी आणि वाजा वाजवतो तेव्हा लोक आकृष्ट होतात. गर्दी जमल्यावर तो खेळ सुरू करतो आणि बायकोशी थट्टा-मस्करी करीत बराच वेळ खेळ चालवतो. तामिळ आणि मल्याळम यांची भेसळ असलेली भाषा ते बोलतात आणि त्यांची प्रश्नोत्तरे चालू असतात.

" बाई ! हा साप कसा आहे ?" तो बायकोला विचारील.

" चांगला आहे." ती उत्तर देईल.

" चावला तर...?"

" वाईट आहे."

"वाईट साप चावला तर काय होईल ?"

"अधोगती."

"असं झालं तर काय केलं पाहिजे ?"

"पुंगी वाजवली पाहिजे..."

"पुंगी वाजवली तर ?"

"साप नाचेल."

"ठीक आहे, तू फार हुशार आहेस. पुंगी वाजवली तर साप नाचेल. मग चावणार नाही. ठीक आहे नं ?"

"हो जी."

तो पुंगी वाजवतो. साप नाचू लागतो. तो एक पेटारा उघडून सगळ्यांना साप दाखवतो. जमलेली माणसे स्वतःला विसरून नाच पहाण्यात मग्न होतात.

प्रेक्षकांना तो आत्मकथा ऐकवतो.

तो मुलीकडे वळून म्हणतो, "ए मुली, इकडं ये..."

ती त्याच्या जवळ पोहोचते.

"आपलं नाव सांग."

"गारुड्याची मुलगी."

"तू किती दिवस उपाशी आहेस ?"

"चार दिवस."

"चार दिवस...!"

"हो !"

"अग, गारुड्याच्या मुली ! तू जिवंत कशी."

"गारुड्याच्या मुलीची अशीच दशा असते ?"

"कशी ?"

"भुकेली !"

"ऐका मालक !" तो प्रेक्षकांकडे वळून म्हणतो.

"तुमच्या लाडक्या मुलीप्रमाणंच हीही एक मुलगीच आहे नं ? ही चार दिवसांपासून भुकेली आहे. कारण, ही गारुड्याची मुलगी आहे."

प्रेक्षकांतल्या भल्या माणसांसमोर तो क्रूर आणि गंभीर प्रश्न उपस्थित करतो.

तो म्हणत होता, "अग, चुरुचुरू बोलणाऱ्या मुली, शांत हो, तुला आज जेवायला मिळेल. माझं म्हणणं ऐकशील ?"

" ऐकेन."

" शाब्बास ! सगळया मुलींना लग्नात कोणती माळ घालतात ?"

" फुलांची माळ. "

" गारुड्याच्या बेटीला लग्नात कोणती माळ ?"

" सापाची."

"ठीक आहे, याच सापाची माळ घालून या भल्या माणसांपुढं जा. तुझ्या वाड्ग्यात ते जरूर भिक्षा घालतील. तुला खायला मिळेल."

गळ्यात सापाची माळ घालून आलेल्या मुलीच्या वाडग्यात सर्व लोक काही ना काही टाकतात. पोटाची खळगी भरण्यासाठी विषारी जीवाणू गळ्यात घालणाऱ्या मुलीविषयी सहानुभूती वाटल्यामुळे नव्हे, मन द्रवल्यामुळेही नव्हे—फक्त त्या भयंकर दृश्यापासून सुटका व्हावी म्हणून !

तो राहणारा कुठला ? त्याचे नाव काय ? कोणालाही माहीत नाही. तिघांचा परिवार निरुद्देश फिरताना मात्र दिसतो.

ते जमिनीवर किंवा छपराखाली घर बांधीत नाहीत. खोलीतल्या अशुद्ध हवेत श्वास घेत ते जिवंत रहात नाहीत. बंधमुक्त खुल्या हवेत ते जगतात. त्यांना परस्परांविषयी वाटणाऱ्या प्रेमाची तुलना रुपया-पैशांनी किंवा पृथ्वीवरील इतर मूल्यवान वस्तूंनी केली जाऊ शकत नाही. त्यांचे जीवन प्रेमाने परिपूर्ण आहे. कुंपणात बांधलेली निश्चित जागा, पावसाळ्यात निवाऱ्यासाठी झोपडी, उद्याची तरतूद म्हणून जमविलेला पैसा—यांपासून ते फार लांब आहेत. सतत भटकणारे ते कुटुंब वस्तुतः उच्च कलेचे सजीव दृश्य आहे.

या परिवारामागेही एक प्रणयकथा असेल, कित्येक वर्षांपूर्वी त्या स्त्रीने आणि पुरुषाने एकमेकांबरोबर प्रेममय जीवन जगण्याचा निश्चय केला असेल, विस्तीर्ण आकाशाखाली, चंद्र—ताऱ्यांना साक्ष ठेवून त्यांनी आपले जीवन परस्परांना अर्पण केले असेल. भटके जीवन जगणाऱ्या पुरुषाला सहधर्मचारिणी आणि अबलेला आश्रयासाठी पुरुष मिळाला, त्यांच्या सुंदर सहजीवनाचे फळ आहे ती मुलगी.

त्या कौटुंबिक बंधनात माधुर्य आणि दृढता आहे. तो केवळ बाह्याचार नाही. नवऱ्याच्या कष्टांवर बायकोचे सुख किंवा वडिलांच्या संपत्तीवर मुलांची चैन असा प्रकार तेथे नाही. सगळेच एकमेकांवर अवलंबून आहेत. तिघेही जणू जीवनाचे खरे प्रतीक आहेत.

त्या कुटुंबाने देशोदेशी भटकन्ती केलेली आहे. दक्षिण भारतातल्या कित्येक

शहरांत कित्येक वेळा त्यांनी आपला खेळ करून दाखविला आहे. वेगवेगळया मंदिरांत आणि धर्मशाळांत त्यांनी रात्री काढल्या आहेत. हजारो मैलांचे अंतर त्यांनी पायी तुडवलेले आहे.

त्यांच्या जीवनात एक वेगळया जवणाचीही निश्चिती नाही. ते कुटुंब गरिबीचे जिवंत चित्र आहे. दु:खपूर्ण अनुभवांची पर्वा न करता जीवनाच्या वाटेवर ते कुटुंब मनाची उभारी ढळू न देता जात होते.

आणखी चार-पाच वर्षे उचटली. जग अतिशम वेगाने बदलत होते. अनेक शहरे ओळखणेही कठीण झाले होते. नवे नवे शोध लागले आणि शास्त्रीय प्रगती होऊ लागली तसतसे अनेकांनी आपले वडिलार्जित व्यवसाय सोडले. पण त्या गारुड्याची दिनचर्या बदलली नाही.

जुने पेटारे घेऊन आपल्या बायकोबरोबर आणि मुलीबरोबर तो पूर्वीसारखेच खेळ दाखवीत फिरत आहे. काळाचा परिणाम त्याच्या शरीरावर दिसत असला तरी गारुड्याने काळाचा पराभव केला, असेच म्हटले पाहिजे. सततच्या भटकंतीने तो क्षीण झालेला आहे. पाय आता चालायला तयार नाहीत. जीवन-संघर्षाने तो खचला आहे. गारुड्याचा आत्मा एकदा त्याला म्हणाला की जीवनाला तोंड देण्याची शक्ती आता राहिली नाही, आपले अशक्त शरीर आता एका ठिकाणीच पडून रहाणार या कल्पनेने तो एकदम दचकला.

त्यांच्या एकुलत्या एका मुलीच्या रूपातही या दहा वर्षांत केवढा बदल घडून आला होता! कालची भोळीभाबडी मुलगी आज सुंदर तरुणी बनली होती. सततच्या कष्टांनी उलट तिचे अंग प्रत्यंग सुंदर, सुडौल झाले होते.

तिच्या चेहऱ्यात एक विशेष आकर्षण आहे. शहरी मुलींसारखे नटणेमुरडणे तिला माहीत नसले तरी सामान्य वस्त्रांतही ती आकर्षक वाटते. जीवनाचे आघात सोशीत आल्यामुळे तिचे मन आणि शरीर दणकट झाली आहेत. कामी पुरुषांचे तीक्ष्ण कटाक्ष आणि प्रलोभने यांचा पराभव कसा करावा, ते तिला नेमके समजते.

मुलीच्या यौवनाची बापाला चिंता वाटते. यौवनाच्या उंबरठ्यावर सलज्ज भावाने उभी असलेली मुलगी एखाद्या प्रश्नचिन्हासारखी त्यांच्यासमोर उभी होती. हा प्रश्न सर्वच आईबापांना काळजीत टाकतो. आजच्या व्यवहारी जगात लग्न एक चिंतेचा विषय झाला आहे.

पैशासाठी लग्न करणाऱ्या पुरुषांच्या जगात गरीब तरुणीला कुमारीच रहावे लागते. गरीब गारुड्याच्या मुलीला तर हे अधिकच लागू पडते. कारण, त्याच्याजवळ

हुंडा म्हणून द्यायला दोनतीन म्हाताऱ्या सापांशिवाय दुसरे काही नसते. आजच्या जगात गारुड्याचा व्यवसाय पत्करायला कोण तयार होईल !

निरुत्तर करणारे हे प्रश्न पित्याला व्याकुळ करून सोडीत.

त्या रात्री मुलगी निजल्यावर तिच्या आईने वडिलांना हलक्या आवाजात विचारले, " मुलीसाठी वर शोधायचा नाही का ?"

" गारुड्याच्या मुलीशी लग्न करायला कोण येईल ?"

" हो, देवालाच आपली काळजी !"

अशा प्रकारे आपल्या चिंतेचे ओझे देवावर टाकीत.

काही वेळाने आईने आपण होऊन विचारले, " देवाने ही मुलगी आम्हांला कशाला दिली ! अन द्यायचीच होती तर गरिबाच्या घरात लावण्य कशाला जन्माला घातलं !"

विधाता या प्रश्नाचे उत्तर काय देणार !

मध्यरात्रीच्या नि:स्तब्ध वातावरणात संसाराच्या कटकटीने त्रासलेल्या हृदयाच्या अंतराळातून निघालेले ते प्रश्न घुमले. त्या वेळी असे वाटले की जणू निसर्गही श्वास रोखून बसला आहे. शेजारच्या झाडावर बसलेल्या घुबडाने घूत्कार देऊन त्या प्रश्नांचा स्वीकार केला.

निजलेल्या मुलीकडे पहात आई म्हणाली, " बिचारी ! निजली आहे. तू या पापिणीच्या पोटी कशाला जन्म घेतलास !"

वीस वर्षांपूर्वी तिच्या सौंदर्याने ती आपल्या प्रसववेदना विसरली होती. कालान्तराने असा प्रश्न विचारावा लागेल, हे तिच्या स्वप्नातही आले नव्हते. मुलीचे रडणे ऐकताना आनंद झालेल्या बापाच्या मनात असा विचार कधी आला नव्हता की पुढे ती एक समस्या होईल.

मुलगी दिसामानाने वाढली, रांगू लागली, धावू लागली तरीही तिची वाढ हाच एक प्रश्न आ वासून उभा राहील याची जाणीव त्याला झाली नव्हती.

पैशालाच सर्वस्व मानणाऱ्या या जगात मुलगी उपवर झाल्यावर गरिबांनी छाती पिटून घेतली पाहिजे.

आईवडिलांच्या हृदयावरील ओझे मुलीलाही जाणवत होते. अंथरुणावर पडलेल्या पण झोप न लागलेल्या मुलीने आईवडिलांचे संभाषण ऐकले होते. तिचाही जीव व्याकुळ झाला. तिनेही आपल्या काळजीचा भार दयाळू परमेश्वरावर टाकला.

तो युवक काही दिवसांपासून त्या कुटुंबाच्या मागे मागे फिरत आहे. त्याचे कारण गारुड्याच्या लक्षात आले होते; पण ते त्याला तरुणाच्या तोंडूनच ऐकायचे होते. म्हणूनच त्याने त्याला हटकले नाही.

एका संध्याकाळी तो तरुण गारुड्याकडे आला व त्याने आपले मन बोलून दाखविले.

गारुड्याने त्याला आपादमस्तक न्याहाळले आणि विचारले,

" तुझे आईवडील जिवंत आहेत ?"

" नाही. "

" तुला माझं काम येतं ?"

" येतं. मी जातीनं गारुडी आहे. माझे वडीलही गारुडीच होते. "

" तू हे काम करायला तयार आहेस ?"

" हो. "

" तुझ्या कुटुंबात कोण कोण आहे ?"

" कुणी नाही. मी एकटाच हिंडत असतो. "

गारुडी गप्प झाला. आपल्यासारखाच जगभर पायी फिरणारा जावई मिळाला तर ? ...

गरीबाचा भाऊ गरीबच असणार.

काही वेळ विचार केल्यावर गारुडी त्या तरुणाला म्हणाला, " ठीक आहे. असं असेल तर शहराजवळच्या जंगलात जाऊन चांगल्या जातीचा साप पकडून आण. माझी मुलगी बालपणापासून सापाची माळ घालीत आली आहे. तू त्याचे विषारी दात काढून माझ्या मुलीच्या गळ्यात घाल. त्यानंतर तुमचं लग्न करून टाकू. " लहानपणापासून सर्पमाला घालणाऱ्या मुलीला लग्नाची माळ म्हणून ती सर्पमालाच घालायची आहे. तिच्या वडिलांची एवढीच इच्छा आहे. ती ऐकून तरुण चुपचाप उभा राहिला.

गारुडी म्हणाला, " माझा धंदा माझ्या बरोबरच संपायला नको. म्हणूनच मी तसं म्हणालो. " तीच त्याची इच्छा आहे ! परंपरागत धंदा ! तो त्याच्याबरोबर बंद पडू नये. तो टिकवण्याचे सामर्थ्य भावी जावयात आहे की नाही याची परीक्षा घेतली पाहिजे.

तो तरुण नमस्कार करून निघून गेला, थोडा वेळ त्याच्याकडे पहात गारुडी म्हणाला, " धैर्यानं वाग. ईश्वर तुझं रक्षण करो. ! "

त्या दोघांचे संभाषण मुलीनेही ऐकले. तेवढा वेळ मुलीचा विचार जणू त्याच्या

डोक्यातून निघून गेला होता. आपल्या मुलीलाही त्या युवकाचे आकर्षण वाटते याची जाणीव त्याला नव्हती. जावयाचे रंगरूप गारुड्याला पसंत होते. मुलीचे मन त्याला कळले असते तर कदाचित त्याने इतकी कठीण परीक्षा घेतली नसती !

त्या झाडीत खूप साप आहेत, अशी प्रसिद्धी होती. दुसऱ्या दिवशी सकाळीच तो तरुण पुंगी घेऊन झाडीत गेला आणि कुलदेवतेचे स्मरण करून पुंगी वाजवू लागला. थोड्या वेळाने झाडीतून पानांची सळसळ ऐकू आली. तो अधिकच उत्कंठेने पुंगी वाजवू लागला.

झाडीतून एक भयंकर फूत्कार आला. तो एकदम घाबरला; पण तरीही अधिकच जोराने पुंगी वाजवली. चारपाच क्षण युगासारखे गेले. पुंगीचा आवाज ऐकून बाहेर आलेला साप पहाताच तरुणाची भयाने जणू बुबुळे बाहेर आली. एक भयंकर काळसर्प फणा काढून त्याच्यासमोर नाचत होता. त्याचे पेटते डोळे एकटक पुंगीवर लागले होते. पुंगी थांबली किंवा तो थोडाही हलला तर साप दंश करील. बसण्याची जागा न सोडता आणि पुंगी न थांबवता सापाचा गळा पकडला पाहिजे.

ते दृश्य पाहून पाषाणहृदयी व्यक्तीही द्रवली असती –– इतकी कठीण परीक्षा !

त्याला वाटले की आपले जीवन क्षणिक आहे आणि क्षीण तंतूच्या आधाराने लटकत आहे. त्याच्या डोक्याबरोबर शरीरही डोलल्यासारखे हलत होते.

तो आणखी जोराने पुंगी वाजवू लागला.

गारुड्याच्या मुलीचे मन त्या दिवशी सकाळपासूनच शंकाकुल होते. आपल्या भावी पतीच्या परीक्षेने तिच्या हृदयात अनिष्ट आशंकेचे थैमान माजले होते. दिवस उलटत गेला, तसतशी तिची भीती वाढू लागली. दुपार झाल्यावरही तो तरुण आला नाही, तेव्हा तिला वाटले की आपल्या हृदयाची धडपड थांबेल. आईबापांची नजर चुकवून ती झाडीकडे धावत गेली.

साप त्याच्यासमोर नृत्य करीत असताना दोन तास उलटले. तरीही त्याला पकडता आले नव्हते. हात हालवला तर तो फूत्कारून डंख मारील. त्याला वाटले की साप आपल्या श्वासाचाही आवाज ऐकत आहे. इतका वेळ पुंगी वाजवून त्याची फुप्फुसे फुटायला आली होती. तो घामाने चिंब भिजला. डोळे लाल झाले. आपण थोड्या वेळातच थकून खाली पडू असे त्याला वाटले. त्याला असा भास झाला की आपण जिची आराधना करतो ती मूर्ती समोर उभी आहे. स्वर्गातून आपले आईवडील हात करून बोलावीत आहेत. त्याला चक्कर आली. कानात अनेक अस्पष्ट

आवाज ऐकू येऊ लागले.

तरीही तो पुंगी वाजवीत राहिला.

ते भयंकर दृश्य पाहून ती एकदम किंचाळली. किंचाळण्याचा अचानक आलेला आवाज ऐकताच त्याने मागे वळून पाहिले. त्याच क्षणी सापाने जोराचा दंश केला.

वेदना असह्य होत असतानाच त्याने सापाचे डोके घट्ट आवळले. त्याची तडफड होत होती, पण त्याने पकड सैल केली नाही.

आक्रोश करणाऱ्या युवतीला तो साप दाखवून तो म्हणाला, " पहा, ही आहे माझी वरमाला. "

युवतीने एकदम आक्रोश थांबवला. हजारो मूक विचार तिच्या मस्तकातून धावत गेले.

तिचे डोळे कठोर झाले, जणू तिने दृढ प्रतिज्ञा केली होती. ती त्याच्या समोर मान झुकवून उभी राहिली आणि हट्टाने म्हणाली, " माझ्या गळ्यात घालून दे."

तो दचकला. प्रेमाचे प्रत्यक्ष रूप पाहून तो चकित झाला.

" मुहूर्त होत आला, गळ्यात घाल. " ती म्हणाली.

त्याचे सगळे शरीर विष भिनून निळे पडत होते. कंपित हृदयाने त्याने साद घातली–

" माझी बायको ! "

" माझा धनी ! "

प्रेम साहित्यातील खोट्या शब्दांशी अपरिचित दोन आत्म्यांचे प्रेम त्या छोट्या वाक्यांत व्यक्त झाले. त्यांना जे म्हणायचे होते, ते त्या शब्दांनी स्पष्ट केले होते.

फक्त दोन शब्द, " माझी बायको ! " " माझा धनी ! " जगातल्या प्रेम काव्याचा सारांश त्या शब्दांत सामावला होता.

" माळ नाही घालणार ? " ती अधीर होऊन म्हणाली.

तीव्र वेदनेने थरथरणाऱ्या हातांनी त्याने ती फूत्कार टाकणारी वरमाला तिच्या गळ्यात टाकली.

सापाने तिच्या गळ्याला वेढा घातला आणि फूत्कार करीत डसण्यासाठी फणा उभारला.

" माझी बायको ! " किंचाळत तो खाली पडला. " माझा धनी ! " म्हणत तीही त्या तरुणाजवळ कोसळली.

जिवंतपणी नव्हे, तर मृत्यूत त्यांचे मीलन घडवून आणणारी ती वरमाला हळू-हळू सरपटत झाडीत गेली.

# फ्रीज

—इ. एम. कोवूर

आमच्या डायनिंग हॉलच्या पश्चिमेच्या भिंतीशी एक पांढरा रेफ्रिजरेटर किंवा फ्रिजिडेअर ठेवलेला आहे. तो वाह्यात दृष्टीला पडला की माझ्या डोळ्यांसमोर दोन वस्तू उभ्या रहातात. एक उत्तर भारतात कोठेतरी पाहिलेले संगमरवरी शिवलिंग आणि दुसरे शुभ्र कपड्याने डोके आच्छादून पोळी किंवा पुरी खाणारी लठ्ठ गुजराती वधू. यांतली दुसरी कल्पना मोलीकुट्टीला सांगावी, असे एक दिवस वाटले. मॅनेजर मेनोन यांच्याकडे पाहिलेला नव्या प्रकारचा टिकोजी विणण्यात ती तल्लीन झाली होती. डोके वर करून तिने माझ्याकडे असा तीव्र कटाक्ष फेकला की जणू गृहपाठ न केलेल्या विद्यार्थ्याकडे मुख्याध्यापिका पहात आहेत. म्हणाली, " जोणी कुट्टी ! अशा चावट गोष्टी न बोलता गप्प बसा नं ! " गुर्जर स्त्रीप्रमाणे " भलभलत्या कल्पनांना तुम्ही चटावले आहात. " एवढे बोलून टिकोजी विणण्यात ती पुन्हा मग्न झाली. लाल रेशमाच्या धाग्याने ती ' जॅक अँड जिल ' चे चित्र काढीत होती. एकदा वाटले, पहिली उपमाही सांगावी, पण…

असे का व्हावे ? मी यावर अनेकदा विचार केला आहे. स्त्रियांना संगीत आवडते, त्यांना कवितेची जाण असते, आणि चांगल्या उपमा त्यांना समजण्याची कुवत त्यांच्यात असते, अशी स्त्रियांची प्रशंसा कितीतरी लोकांनी केली आहे; पण अनुभवान्ती मी हे मत स्वीकारू शकत नाही.

मोलीकुट्टी सुशिक्षित आहे. जुन्या काळची इंटर झालेली आहे, तीही पहिल्या वर्गात ! दिल्लीत कुठल्याशा फिनिशिंग स्कूलमध्ये एक वर्ष काढले. माझे मत विचाराल तर या शिक्षणाने ' लॉगर्यम ' पाढ्यांप्रमाणे किंवा आयकर नियमांच्या शेड्यूलप्रमाणे तिची उपजत काव्यशक्ती आटून गेली आहे.

घरी येणारे लोक तिच्या शिवणकलेची आणि पुष्परचनाकौशल्याची खूप प्रशंसा करतात. कला आणि सौंदर्य हे विषयच असे स्फुरणदायी आहेत की, तिची प्रशंसा चढत्या भाजणीने होऊ लागते. या गोष्टी माझ्या आकलनापलीकडच्या आहेत.

पाहिलेली कोणतीही वस्तू जशीच्या तशी नकलायची कला मोलीकुट्टी दिल्लीच्या फिनिशिंग स्कूलमध्ये शिकली होती. हे वारंवार सांगावेसे माझ्या मनात येत होते. ते काही का असेना, माझ्यासारखा सामान्य कुटुंबातला पण श्रीमंती आयुष्य जगण्याचा प्रयत्न करणारा नवरा असे सगळे विचार मनात आणू शकतो; पण सुखाने जगण्याचे नीतिनियम ते विचार प्रकट होऊ देत नाहीत.

ऑफिसात खूप काम पडते. शनिवारी दुपारनंतर आणि रविवारीच काय तो विश्रांतीसाठी थोडा वेळ मिळतो. पलंगावर ताणून द्यावी आणि वाटेल तेव्हा कूस बदलून आवडीचे पुस्तक वाचावे. मधूनमधून मांजरीसारखी झोप काढावी हीच माझ्या दृष्टीने खरी विश्रान्ती आहे; पण विश्रान्तीच्या बाबतीत माझ्या प्रिय पत्नीचा मतभेद आहे. मला सोबतीला घेऊन 'ए' टाईप घरांपैकी कोणत्या तरी घरी जाऊन वायफळ गप्पा मारायच्या, त्यांनी दिलेली मिठाई खायची, हा आहे मोलीकुट्टीचा शनिवार दुपारनंतरचा कार्यक्रम. तिच्या बरोबर जायला दर शनिवारी दुपारी सज्ज झालेच पाहिजे. पति-पत्नींनी एकत्र जाऊन इतरांना त्रास द्यावा हे आहे दिल्लीच्या फिनिशिंग स्कूलचे शिक्षण. करणार काय ? मनातल्या मनात शिव्याशाप देत कधीकधी विरोध प्रगट केला तरीही मलाच माघार घ्यावी लागते. न जाऊन भागतच नाही.

आम्ही इथे सामान्य कॉलनीत रहातो. या कॉलनीत अशीच चार-पाच घरे आहेत. ही केन्द्रीय सरकारने बांधलेली आहेत. या गृहनिर्माणयोजनेत सरकारने पंधरा की अठरा कोट रुपये खर्च केले आहेत. अधिकारी, तंत्रज्ञ आणि नोकर सगळे मिळून चार हजारांहून अधिक लोक इथे रहातात. अधिकाऱ्यांसाठी बांधलेल्या घरांपैकी एकात आम्ही रहातो.

तेथे घराचे तीन प्रकार आहेत. 'ए' टाइपची घरे टेकडीच्या शिखरावर आहेत. झोपायच्या दोन खोल्या, एक बैठकीची खोली आणि तिला लागून भोजनगृह, दोन स्नानगृहे, एक व्हरांडा, जमिनीवर मोझॅक, एका ठिकाणी थोडी उघडी गच्ची आणि समोर बगीचा. 'बी' टाईप घरात झोपायच्या दोन खोल्या, एक जेवणघर, व्हरांडा, स्नानगृह आणि सीमेंटची फरशी. या घरांना बगीचा आणि उघडी गच्ची नाही. 'सी' टाईप घरात एक शय्यागृह, एक भोजनगृह आणि एक स्नानगृह. गच्ची आणि व्हरांडा या घरांनाही नाही. जमीन सीमेंटचीच. भाड्याप्रित्यर्थ सगळ्यांना पगाराचा दहावा हिस्सा द्यावा लागतो. साडेसातशे ते हजार रुपये पगार असणारे सगळे 'ए' टाईप घरांत रहातात. पाचशे ते साडेसातशे रुपये पगार

असणारे 'बी' टाईप घरांत आणि बाकीचे सगळे 'सी' टाईप घरांत रहातात. आम्ही 'ए' टाईप घरात रहातो. कारण, साडेसातशेपेक्षा पंचवीस रुपये जास्त मिळतात! 'बी' मधून 'ए' मध्ये आल्याला आम्हांला दीड वर्ष झाले असेल, बढती मिळाल्यावर नव्या घरात आलो, त्या दिवशी मोलीकुट्टीचा आनंद गगनात मावत नव्हता. तिच्या चेहऱ्यावरून संतोष आणि अभिमान निथळत होता. आपल्या सगळ्या नातलगांना 'ए' टाईप घराचे वैशिष्ट्य मोलीकुट्टीने त्याच दिवशी लिहून कळविले आणि सोबत आपला नवा पत्ताही जोडला.

पण मला माझे जुने 'बी' क्लास घरच जास्त पसंत होते. त्या घरासमोर एक मोठे फणसाचे झाड होते. वाऱ्याच्या झोताबरोबर फडफडणाऱ्या पानांची शोभा मी तासन् तास पहात असे. त्या वेळी मन कोठे हरवून जाई कोणास ठाऊक! पण या नव्या घरासमोर वृक्ष नाही. म्हणून हे नवे घर मला पसंत नाही. माझे हे मत समजताच मोलीकुट्टीने मला सुनावले की 'ए' टाईप घराची प्रतिष्ठा काय असते, ते समजण्याची अक्कल मला नाही.

रविवारी सकाळी अदमासे दहा वाजता माझ्या दुर्दैवाची परिसीमा होते. माझी बायको आपला आवडता फ्रीज त्या दिवशी 'डिफ्रोझ' करते. स्विच बंद करून तो धुतला-पुसला जातो. मग काही वेळ तो उघडा ठेवला जातो. रविवार हा त्याच्या आजारपणाचा दिवस असतो. बायको त्याची जी शुश्रूषा करते त्यात मलाही सहभागी व्हावे लागते. बर्फाच्या ट्रेमधील वितळलेले पाणी बाहेर फेकण्याचे काम माझे आहे. तसेच आतील खाद्य पदार्थ बाहेर काढून तो धुवून-पुसून साफ करणे हेही माझेच काम आहे. मला थंड वस्तू सहन होत नाहीत. बोटे गारठली की ट्रे कधीकधी इकडेतिकडे आदळतो.

"असं मन भलतीकडे ठेवून ट्रे आणि फ्रीज धूत जाऊ नका. ही काही लाकडाची किंवा दगडाची वस्तू नाही. हत्तीनं ओंडका उचलावा तशा धसमुसळेपणानं फ्रीजचं काम केलं पाहिजे का?"

फ्रीज साफ करीत असताना अज्ञान आणि बेजबाबदारी या विषयावर मला अशा प्रकारे एक लांबलचक प्रवचन ऐकावे लागते.

समाधी घेतलेल्या पांढऱ्या दगडासारखी दिसणारी ही वस्तू 'फ्रिजिडेअर' या नावाने ओळखली जाते. काही लोक हिला 'रेफ्रिजरेटर' असेही म्हणतात. मला वाटते. 'फ्रीज' म्हणणेच ठीक. पण फ्रीज म्हटले की मोलीकुट्टी फारच नाराज होते.

आजकाल तो शब्द ऐकणेही माझ्या कानांना दु:सह झाले आहे. माझी प्रिय

मोलीकुट्टी ओठ पुढे काढून आणि जिभेचे टोक विशिष्ट प्रकारे वळवीत जेव्हा 'रि' चा 'री' असा दीर्घ उच्चार करते, तेव्हा तिथून पळून जावेसे वाटते; पण सातशे पंचाहत्तर रुपये पगार मिळवणाऱ्या 'ए' टाईप अधिकाऱ्याला असे पळून कुठे जाता येते ?

मला होणाऱ्या या सगळ्या मनस्तापाचे कारण आमच्या जवळच 'बी' टाईप घरात रहाणारी आमची नातेवाईक बेबीकुट्टी होती. हे सांगताना मला फार वाईट वाटते. ती आपल्या वडिलांची एकुलती एक मुलगी आहे. तिचे वडील विख्यात ठेकेदार आहेत. कित्येक वर्षांपासून ते अर्धा कोटी, पाऊण कोटी किंवा एक कोटी रुपयांचेच काम घेतात. सर्व एंजीनियरांचा त्यांच्यावर लोभ आहे म्हणा किंवा त्यांना एंजीनियरांचा लळा आहे असे समजा ! त्यांचे हितशत्रूच अशा कंड्या पिकवतात की सरकारी सीमेंटची पोती, लोखंड आणि इतर सामान त्यांच्याजवळ पोचले की त्याचे रूपान्तर शंभराच्या नोटांत होते. माझा यावर पुरेपूर विश्वास आहे असे मात्र नाही. बाकीच्या साऱ्या ठेकेदारांपेक्षा ते वाईट आहेत, असेही म्हणता यावयाचे नाही; पण मला एक माहीत आहे की केमिकल एंजीनियर जॉर्ज टॉमसला मुलगी दिली तेव्हा लग्नात त्याने पसतीस हजार रुपये हुंडा दिला. शिवाय सोन्याचे दागिने.

मोलीकुट्टी आणि बेबीकुट्टी यांच्या भांडणाचा इतिहास जाणण्यासाठी या वसाहतीच्या संपूर्ण जीवनावर दृष्टी फिरवावी लागेल. इथले वरिष्ठ दर्जाचे लोक 'ए' टाईप घरात रहातात. त्यांचे एकमेकांकडे जाणेयेणे असते आणि आपसांत गप्पांच्या बैठकी रंगतात. देण्याघेण्यांचे व्यवहारही होतात. ज्यांच्याकडे मोटर नसते. त्यांच्या मुलांना इतर आपल्या गाडीतून इंग्रजी माध्यमाच्या शाळेत पोचवितात आणि परत आणतात. इथल्या गृहिणी मतभेद झाले तरी ते बाहेर दिसू देत नाहीत. बाह्यतः त्या मिळूनमिसळून वागतानाच दिसतात. त्यांना 'बी' आणि 'सी' टाईप घरांतील गृहिणींबद्दल तुच्छता वाटते. ख्रिस्ती मिशनऱ्यांना भारतीय जसे मेंढरांसारखे वाटतात तसेच 'ए' क्लासमध्ये रहाणारांना 'बी' आणि 'सी' क्लासमध्ये रहाणारे वाटतात. ते जणू त्यांचे संरक्षक आणि पालकच !

पण एक गोष्ट सांगू ? 'ए' क्लासच्या पुरुषांत घमेंडखोर स्वभाव फार थोड्यांचा आहे. ते 'बी' क्लासशी गप्पागोष्टी करतील, लक्षांत ठेवा फक्त 'बी' क्लासशीच आणि सिगरेट घेतील-देतील. योजनेतल्या वैगुण्यांबद्दल चर्चा करतील. फुरसत असली तर थोडी निंदाही करतील. 'बी' आणि 'सी' क्लासचाही परस्परांशी असाच संबंध आहे. भारतीय जातिव्यवस्थेवर डॉक्टरेटसाठी प्रबंध लिहिणारा

एक संशोधक आमच्या शेजारी रहात असे. अमेरिकेतल्या कुठल्याशा विद्यापीठा-कडे त्याचा प्रबंध सादर केला जाणार होता. मी त्याला सांगितले की आमच्या कॉलनीचे नीट अध्ययन केले तर त्याला संशोधनात्मक प्रबंधासाठी आवश्यक ती सगळी माहिती इथेच एकत्र सापडेल !

बेबीकुट्टी 'बी' क्लास क्वार्टरमध्ये राहू लागल्यानंतर मला तिला भेटायला जावे लागले. तिची आई आणि माझे वडील चुलतभाऊ-बहीण होते. बेबी लहान-पणी माझी फार लाडकी होती. वडिलोपार्जित संपत्तीमुळे आमच्या समाजात तिला प्रमुख स्थान प्राप्त झाले होते. केवळ अडीच एकराच्या शेतीवर गुजराण करणारे माझे वडील त्या भाग्यशालिनीपुढे कःपदार्थ होते.

जॉर्ज थॉमस आणि बेबीकुट्टी यांना भेटायला माझ्याबरोबर मोलीकुट्टी काही आली नाही.

" तुम्ही जा. तुमचे नातलग लागतात नं ? मग एखाद्या दिवशी मी येईन. माझ्या मागं खूप कामं आहेत. नायलॉनच्या साडीला आणि निळ्या बंगलोरी ब्लाऊजला मला इस्त्री करायचीय. त्या समोरच्या 'बुक केस' ला पॉलिश करायचं काम केव्हा-पासून पडलंय. सुरेश अन त्याची बायको उद्या चहाला येणार आहेत. शिवाय ही मासिकंही नीट लावून ठेवायची आहेत."

" हे सगळं परत आल्यावरही करता येईल, नाही का मोलीकुट्टी ? या काही वितळून जाणाऱ्या वस्तू नाहीत !" मी काहीसा रागावून म्हणालो.

" वितळणार नसतील, पण सगळी कामं वेळच्या वेळी झाली पाहिजेत. मला मदत करायला इथं नोकर ठेवलेले नाहीत. शेजारी कुणी रहायला आलंय. म्हणून आजच त्यांना भेटायला गेलं पाहिजे ही गोष्ट माझ्या डोक्यात शिरत नाही !"

तिने मला एक 'डोज' देऊन ठेवला होता की 'बी' टाईपवाल्यानेच पहिल्यांदा 'ए' टाईपवाल्याकडे आले पाहिजे. हा कॉलनीचा अलिखित नियम आहे. त्याचीच आठवण देण्याचा मोलीकुट्टीचा उद्देश होता; पण तो मुद्दा आपल्या लक्षातच आला नाही असे भासवीत मी एकटाच बेबीच्या घरी गेलो.

बेबीकुट्टीला आपली बुद्धिमत्ता आणि वैभव यांचा अहंकार नव्हता. ती बेसुमार उंच किंवा लठ्ठ नव्हती, तर लहानशा चिमणीसारखी उत्साही आणि सुडौल होती.

" भाऊ, तू एकटाच आलास ? वहिनी कुठं आहेत ?" तिने विचारले.

मी खोटेच सांगितले की मोलीकुट्टीला सर्दीचा ताप आला आहे. हा आहे सर्व-मान्य सन्मान्य बहाणा. पण तिने पिच्छा पुरवला.

" त्या तर मला थोड्या वेळापूर्वीच शेजारच्या घरातून परतताना दिसल्या."

" अॅस्प्रो नाही तर अमृतांजन घ्यायला गेली असेल." मी दुसरे खोटे बोललो.

मग त्या नववधूने लग्नात भेट मिळालेल्या सगळ्या वस्तू मला दाखवल्या. मनगटी आणि मेजावरील घड्याळ, डिश सेटस्, वॅनिटी बॅग्ज, विजेची उपकरणे, हस्तिदंती शोभेच्या वस्तू, साड्या, जोडे, अनेक वस्तू. हजाराहून जास्त किंमतीचा रेडिओग्रामच होता. तो पाहिल्याबरोबर मी चमकलो. कारण, आजउद्या नाही तर कधीतरी मोलीकुट्टीच्या नजरेला तो पडला असताच. बारा रेकॉर्ड ठेवण्याची सोय त्यात केली आहे. हे सर्व तिला दिसेल. अशा तऱ्हेच्या वस्तूंची तिची मागणी जुनीच आहे. आतापर्यंत मी टाळीत आलो. पण इथे ती वस्तू पाहिल्यावर ती नक्कीच हट्ट धरील. सध्याच खर्चाची तोंडमिळवणी करता येत नाही. या खरेदीने तर मनस्ताप आणखीच वाढेल; पण अखेर मला पराभव पत्करावा लागेल, हेही मला दिसत आहे. देवा ! हे सर्व आता होणारच आहे.

घरी परतलो तो मोलीकुट्टीच्या प्रश्नांच्या माऱ्याने माझा श्वास कोंडू लागला.

" ते केव्हा आले ? "

" परवा. "

" किती हुंडा मिळाला ? "

" पसतीस हजार. "

आपल्या बरोबर काही वर्षांपूर्वी दहा हजार आणणाऱ्या मोलीकुट्टीला हा पसतीस हजारांचा आकडा बोचला असेल. तरीही थोडे संकोचून ती म्हणाली, " दागिने खूप आहेत का ? "

" मी सगळे पाहिले नाहीत; पण सात आठ हजारांहून जास्तीच असतील. "

पुन्हा औदासीन्य.

" भेट म्हणून आलेल्या वस्तू ! "

" पुष्कळच आहेत. "

" उत्तमोत्तम फॅशनेबल वस्तू आहेत की गावठी पद्धतीच्या ? "

" डिनर सेटस्, कॉकटेल सेट, वॅनिटी केसेस, सात-आठ सूटकेसेस, घड्याळे, ब्यूटी सेटस्, तऱ्हे-तऱ्हेच्या साड्या ... " मी आनंदाने पाढा वाचला. मोलीकुट्टीला ही माहिती खुपत होती. कदाचित चिडवण्याचा आनंद मिळावा म्हणून मी ' सॅडिस्ट ' झालो असेन.

" अंगठ्या, कडी, बांगडी जोड, हिरे इत्यादी – "

या वस्तूंची नावे ऐकता ऐकता तिचे कान किटले. "दूध उताला आलं असेल !" असे म्हणत ती एकदम निघून गेली. मी एक बातमी तिच्यापासून लपवून ठेवली होती, रेडिओग्राम !

बेबीकुट्टी आणि तिचे यजमान आमच्या घरी आले. बेबीकुट्टी तीन-चारश्याची साडी नेसली होती. आमच्या कॉलनीचे जीवन आणि त्यातील अलिखित नियमांची तिला गंधवार्ता नव्हती. कदाचित कळून सवरून अडाणीपणाने वागण्याइतकी ती चतुर असेल !

तिने आमच्या घरातल्या सगळ्या खोल्या आणि तिथल्या सगळ्या वस्तू काळजी-पूर्वक पाहिल्या. भुवई चढवून तिने असा भाव व्यक्त केला की 'ए' टाईप घरात फक्त इतक्याच सोयी ! इथे माणसे रहातात तरी कशी ! कमीत कमी तीन बेड रूमस एक ड्रॉइंग रूम आणि तीन बाथरूम हव्यातच.

तिच्या वडिलांच्या घरात एकवीस खोल्या आहेत. सात बेडरूम, दोन डाइनिंग हॉल, सात बाथरूम आणि विजेच्या उपकरणांनी सुसज्ज स्वयंपाकघर.

मोलीकुट्टीला या मुलीविषयी घृणा वाटू लागली. तिच्या नजरेत मला तो भाव दिसला, घृणा वाटू लागली की तिचे डोळे सापाच्या रंगाचे होत.

श्रीयुत जॉर्ज यांच्याविषयी तिची काही तक्रार नव्हती, तो नुसता चुपचाप बसला होता. चाचपडून पाहिले तरच कदाचित कळायचे की याच्या तोंडात जीभ आहे ! मोलीकुट्टीच्या आतिथ्याचा सारा ओघ जॉर्जकडे वळला. तो आमच्या कॉलनीच्या रीतिरिवाजांचे अक्षरशः पालन करणारा युवक आहे. पण त्याची नववधू तशी नाही; मोलीकुट्टी म्हणालीच होती, " जरा घमेंडखोर आहे. "

दोन-तीनदा भेट झाल्यावर त्यांची मैत्री एवढी वाढली की बोलणेही बंद झाले. मी काय करणार ? तिचा नवरा चांगला आहे आणि बेबीकुट्टीच्या सवयी मला आवडतात. पण मोलीकुट्टी...

दोन-तीन आठवड्यांनी मी मोलीकुट्टीला म्हणाली, " आपण एकदा बेबीकुट्टीकडं जाऊ या ? "

" तुम्हांला जायचं असेल, तर जा, मला काही यायचं नाही. "

" का ? तुला बरं वाटत नाही का ? "

" मला काही धाड भरली नाही, आज 'ए' टाईप महिला क्लबचं संमेलन आहे. "

" पण मग तू बेबीकुट्टीला बरोबर नेऊ शकत नाहीस का ? "

" ते बाकीच्या महिलासदस्यांना थोडंच आवडणार आहे ? अध्यक्षा चारी अन उपाध्यक्षा मेनोन या तर हे कधीच सहन करणार नाहीत. "

" त्यांना का सहन होऊ नये ? बेबी सुशिक्षित आहे, मग अडचण कसली ? "

" नुसतं सुशिक्षित असून भागतं का ? "

" मग ? "

" इथं काही अंतर ठेवलं जातं नं ? ए, बी, सी असं. आम्ही त्यात बदल का करावा ? "

मला पुष्कळच बोलायचे होते; पण मी काही बोललो नाही. हट्टही धरला नाही. तिचे म्हणणे नीट समजावून घेतले. वेतनमानाप्रमाणे जनतेचेही तीन-चार वर्ग पडले आहेत, वर्गावर्गात दऱ्या उत्पन्न झाल्या आहेत.

परवा ऑफिसात जाताना खिडकीजवळ उभे राहून मी पाणी पीत होतो व दूर एका झाडावर बसलेल्या चिमणीकडे पहात होतो. तेवढ्यात मला दिसले की वाऱ्यावर पदर फडफडवीत एक बाई मोलीकुट्टीकडे चालली आहे. शेजारच्या घरात रहाणारी ती ' खोटी आई ' आहे. अख्खी कॉलनी श्रीमती वर्गीजना त्यांच्या पश्चात याच नावाने ओळखते. परमेश्वरा ! जरूर काही कारण असेल.

" मोलीकुट्टी, ते पाहिलंस का ? "

हा श्रीमती वर्गीजचा आवाज होता,

" काय ? "

" पहा तिकडे – जॉर्ज टॉमसच्या घराकडे – "

मीही तिकडे पाहिले.

एक मोटर, चारपाच फूट उंचीची लाकडाच्या चौकटीत जखडलेली कोणती तरी वस्तू तीतून निघाली. ती वस्तू आत नीट ठेवण्याचा प्रयत्न चार मजूर करीत होते. सैन्याचे नियंत्रण करणाऱ्या नेपोलियनच्या आविर्भावात बेबीकुट्टी व्हरांड्यातून मार्गदर्शन करीत होती.

" ते काय आहे, मिसेस वर्गीज ? "

" फ्रिजिडेयर; प्रेस्ट कोल्ड फ्रिजिडेयर, १९६३ मॉडेल. "

" कुठून आलं ? "

" तिच्या वडिलांनी पाठवलं असं श्रीमती गोपी म्हणाल्या. तेवीसशे रुपयांचा आहे ! "

मग त्या दोघींत काय बोलणे झाले, ते मी ऐकले नाही. कारण, मला ऑफिसात

जायचे होते.

सायंकाळी मी घरी आलो, तेव्हा मोलीकुट्टी कष्टी दिसत होती. तिचा सगळा जोर थंडावला होता. मी संभ्रमात पडलो. आदर्श पतीने वागावे त्याप्रमाणे मी तिच्या चिंतित अवस्थेचे कारण विचारले. पण उत्तरादाखल जणू सिंहीण चवताळून माझ्यावर धावून आली.

" माझ्या सुखदु:खांची पर्वा आहे कुणाला ? तुमचं खाणं, पिणं आणि सिगरेट ओढणं तर व्यवस्थित चालू आहे ? "

कठोर शब्द आणि तिरस्काराचा भाव !

" तू हे काय बोलतेस ? "

" आत्ता म्हणाले तेच. दुसऱ्याचं दु:ख कळू शकतं पण त्याला हृदय असावं लागतं. इथं जे नाही ते तिथं आहे ! मोठे आले माझ्या आजारपणाची चौकशी करणारे ! ... "

उपहासाची जागा रडण्याने घेतली. स्वत:विषयीच्या अनुकंपेपासून हिस्टीरियाच्या प्रथम अवस्थेकडे मोलीकुट्टी चालू लागली. मी सरळ खोलीबाहेर पडलो.

एक गोष्ट सांगायची राहिली. महत्त्वाचीच गोष्ट. एक रेडिओग्राम मी हप्तेवारीने विकत घेतला होता. त्यावर लागोपाठ चौदा रेकॉर्डस ऐकता येते.

बेबीकुट्टीकडे आम्ही दोघे जाऊन आल्याला आठवडा उलटत नाही तो आमच्या घरातही एक चांगला रेडिओग्राम का असला पाहिजे आणि त्यापासून कोणते फायदे आहेत, याचे उत्तम ज्ञान मोलीकुट्टीला झाले होते.

पाहुण्यांशी गप्पा करताना रेकॉर्ड बदलण्यासाठी उठणे बरे दिसत नाही. दहा-पंधरा रेकॉर्डस एकदम लावणे सोयीचे असते. त्या एकीनंतर एक वाजत रहातात. आमच्या ड्रॉइंग रूमसाठी यापेक्षा अधिक सुंदर वस्तू कोणती असणार ?

मी आमच्या सात बल्बवाल्या रेडिओची प्रतिष्ठा वाढविण्याचा आणि रेडिओ-ग्राम तुच्छ लेखण्याचा व्यर्थ प्रयत्न केला. अखेर मोठ्या पेटीसारखी दिसणारी ती वस्तू आमच्या दिवाणखान्यात विराजमान झालीच.

रेडिओग्राम घेतल्यावर पुढे दोन-तीन दिवस आमच्या घरात गाण्या-बजावण्याची मोठी धामधूम होती. श्रीमती चारींना हिंदी गाणी आवडतात. त्यांतही सयगल आणि लता मंगेशकर त्यांना विशेष प्रिय आहेत. सयगलचा घुमणारा आवाज त्यांच्या बालपणीच्या आठवणी जाग्या करतो आणि आनंदाने त्यांचे मन नाचू लागते. लता मंगेशकरचा आवाज ऐकताना त्यांना असे वाटते की जणू त्यांचा

सोळाव्या वर्षात प्रवेश झाला आहे. श्रीमती गोपींना ' रॉक अँड रोल 'वर बसवलेली तमिळ गाणी आवडतात. ती ऐकताना त्या मातोश्रींची मांडी आपोआप हलू लागते. ' खोटया आई 'ला पाश्चात्य सुरावटी आवडतात. श्रीमती वरदाचारींना चेम्बै वैद्यनाथ अय्यर, एम. एस. सुब्बलक्ष्मी, बालमुरलीकृष्ण यांची गाणी आवडतात. दोनतीन दिवस माझ्या घरी पी. लाल, बालमुरली, सुब्बलक्ष्मी, लता सगळ्यांची गाणी लावली जात होती. मग सगळे एकदम शान्त झाले. पण मी एक पाहिले, आमच्या भोवतालच्या सर्वच घरांतून रेडिओग्रामला प्रवेश मिळाला.

रेडिओग्राम, वॉटर हीटर या वस्तू हप्तेवारीने मिळणे कठीण नव्हते. पण सगळे हप्ते वेळेवरी चुकवणे फार त्रासदायक व्हायचे. म्हणून मोलीकुट्टीशी काही गोष्टी मोकळेपणाने बोलण्याचे ठरविले. खरे तर मी आधीच बोलायला हवे होते.

" कुणाच्याही घरी एखादी नवी वस्तू पाहिली की ती विकत घेण्याचा विचार करणं किंवा विकत घेणं हे दुःखदायक आहे, नाही का मोलीकुटी ?"

" तुम्ही कुणाविषयी बोलता आहात ? "

" असं पहा, हा रेडिओग्राम आणि वॉटर हीटर यांची फार गरज होती का ? आणखी काही वर्षं आपण तशीच काढू शकलो असतो. आणखी एक विचारू ?– हा रेडिओग्राम न लावून किती दिवस झाले ?"

" प्रत्येक दिवशी थोडाच या वस्तूंचा उपयोग असतो ? घरात तांदळाचं पोतं आहे म्हणून काय जाता येता भात खातात ? तुम्हांला वाटत असेल की या वस्तूंचा रोज उपयोग झाला पाहिजे, पण तसं नाही. "

" मग ? "

" आपल्या प्रतिष्ठेसाठी हे सगळं ... "

" याचा अर्थ ? "

" एक प्रतिष्ठा आली की या वस्तू आवश्यक असतात. नाही तर दुसरे लोक टवाळी करतात. "

" मला नीटसं कळलं नाही, मोलीकुट्टी ? "

" ' ए ' टाईप घरात रहाणारे लोक ' बी ' किंवा ' सी ' टाईप वाल्यांसारखे थोडेच राहू शकतात ? "

" का बरं ? ती काय माणसं नाहीत ?"

" असतील, पण ' ए ' टाईपचे तर नाहीत. "

" म्हणजे ' बी ' टाईपवाले ' ए ' टाईपवाल्यापेक्षा अधिक चांगले राहू शकत नाहीत

का ? – " मी चिडून म्हणालो.

" ठीक आहे. ' बी ' टाइप प्रमाणे राहण्यापेक्षा इथून कुठं तरी दूर निघून जाणं चांगलं. "

मी हरलो. ज्याला प्रतिष्ठा म्हणजे काय तेसुद्धा समजत नाही, त्याने आपली हार मानावी हेच योग्य.

बेबीकुट्टीच्या घरी रेफ्रिजरेटर आल्यानंतर दहाच दिवसांनी मोलीकुट्टी मला घरगुती काटकसरीचे धडे शिकवू लागली.

" वस्तू वाया जाऊ देणं फार वाईट आहे, नाही का जोणीकुट्टी ? "

" अगदी बरोबर. मी कारखान्यांतल्या मजुरांना रोज सांगत असे की नासाडी करण्याइतका अपराध जगात दुसरा नाही. "

" खाद्य पदार्थ वाया जाऊ देणं त्याहीपेक्षा वाईट ठरेल, नाही का ? "

" यात काय संशय ? भारतातलं वीस टक्के अन्नधान्य वाया जातं. काही कुजल्यामुळं व बाकी उंदरासारख्या प्राण्यांनी खाल्ल्यामुळं. "

" म्हणजेच जेवणाच्या वस्तू सुरक्षित ठेवल्या पाहिजेत. "

" तर ! ती एक राष्ट्रीय गरजही आहे. "

" आपण दिवसभरात फार अन्न वाया घालवतो ! "

" कसं ? " मी उत्सुकतेने विचारले.

" उरलेली भाजी आपल्याला फेकून द्यावी लागते ! "

" गरजेपुरतंच अन्न शिजवलं पाहिजे. "

" भाजी कधी अशी मोजूनमापून केली जाते का ? शिवाय बाजारातून आणलेली कच्ची भाजी अन फळं सडून जातात. "

" मग आपण त्यासाठी काय केलं पाहिजे ? "

" सांगितलं तर अंगावर धावून याल. वस्तुत: माझी हिम्मत नाही; पण मला नेहमीच कटकटीला तोंड द्यावं लागतं. "

" आडून आडून नको. स्पष्ट काय ते सांग. "

" एक फ्रीज असावा. या सगळ्या वस्तू वाचतील. आठवडाभराचं सामान सुरक्षित ठेवता येतं. आणखीही एक सोय होईल. "

" ती कोणती ? "

" बर्फ, आइस्क्रीम, फ्रूट सॅलड, सगळं घरातच बनवता येईल. कुणी जेवायला आलं तर दहा ठिकाणी धावपळ करावी लागणार नाही. शिवाय ऑरेंज, स्क्वॅश

अन तुमची बीयरही गार करता येईल."

बीयरचा उल्लेख मला वश करण्यासाठी गळाला लावलेला मांसाचा तुकडा होता.

"किती रुपये लागतील ?"

"प्रेस्ट कोल्ड आहे तेवीसशे रुपयांचा आणि केल्विनेटर आहे सव्वीसश्यांचा. आपल्या घराला कॅल्विनेटरच चांगला पडेल."

" बेबीकुट्टीकडे प्रेस्ट कोल्ड आहे म्हणून वाटतं ?" मी हसत हसत विचारले.

खिजवल्यावर ती वसकन अंगावर येईल, असा माझा अंदाज होता. पण उलट ती हसण्यात भागीदार झाली.

"पैसे कुठून आणायचे ?"

"वीस हप्त्यांत देऊ."

"मग वॉटर हीटर आणि रेडिओग्रामचे हप्ते कोण देईल ?"

"ते सगळं निभवून नेऊ, जोणीकुट्टी, आम्ही 'ए' टाईप घरात राहतो. आमचं जीवनमान उंच असले पाहिजे." ती मृदू स्वरात म्हणाली.

माझ्या घरात माझा पराभव होऊ नये, हे कसे शक्य होते ? अखेर मी हार मानली.

अशा प्रकारे शिवलिंगाची आठवण करून देणाऱ्या फ्रीजची प्रतिष्ठापना झालीच.

मी विचार केला, आता काही दिवस भुणभूण रहाणार नाही, काळ सुखात जाईल. पण भगवंताला हे मान्य नव्हते. एक-दोन महिन्यांनी 'खोटी आई' पुन्हा आमच्या घरी आली.

"मोलीकुट्टी, तू पाहिलंस ते काय आहे ?"

एक नवी फियाट कार, नेमकी बेबीकुट्टीच्या घरासमोर, मीही पाहिली.

"कुणाची आहे ?"

"श्रीमती जार्ज टॉमसची. तिच्या वडिलांनी – खोटारड्या, चोर कॉन्ट्रॅक्टरनी विकत घेऊन पाठवली म्हणतात."

मला चक्कर आली. सुदैवाने खिडकी जवळच होती.

# न कळणारी गोष्ट

—पोंजिक्करा राफी

पद्मनाभ कुरूपची काळी गाय खुरप्याच्या रोगाने सात दिवस आजारी होती. मग ती स्वर्गवासी झाली.

मेलेली गाय पुरण्यासाठी पद्मनाभ कुरूपने आपल्या आश्रमात रहाणारे चिक्कू आणि तोम्मन यांना बोलावले. चिक्कू आणि तोम्मन यांना निश्चित व्यवसाय नाही. शेतीची कामे करावीत, नाव वल्हवावी, लाकूड फोडावे आणि कशीबशी गुजराण करावी, असा त्यांचा क्रम होता. केरळातील खेड्यांत विविध कामे मिळतील तशी करून पोट भरणारे कमी नाहीत. जणू त्यांचे जीवन निरुद्देश असते.

चिक्कूचे डोळे घारे होते आणि तोम्मनचे तोंड नेहमी उघडे रहायचे. पाहिल्याबरोबर तो अगदी मूर्ख वाटायचा. दोघेही येऊन जमीनदारापुढे मान खाली घालून उभे राहिले. आपल्या केसांवरून हात फिरवीत चिक्कूने हलक्या आवाजात विचारले, " हुजूर ! आम्हांला कशाला बोलावलं ? " या वेळीही तोम्मन मूर्खासारखा तोंड उघडे ठेवून उभा होता – मूर्खपणा आणि दास्य यांच्या संयुक्त राशीसारखा !

ते म्हणाले, " आमची काळी गाय खुरप्याच्या रोगानं सात दिवस आजारी पडून मेली. तुम्हांला ती गाय दिसत नाही का ? "

चिक्कूने विचारले, " गेल्या वर्षी पहिला बछडा देणारी गाय नं ? "

आपल्या पोटावर हात फिरवीत पद्मनाभ कुरूप म्हणाला, " हो, हो ! तीच. दुसरा बछडाही होणार होता, पण काय करू ? ईश्वराची इच्छा. गेल्या वर्षी ती चार शेर दूध देत होती. या वर्षी आणखी जास्त दिलं असतं. "

आपल्या दुर्दैवाला दोष देत पद्मनाभ कुरूपने त्यांना खड्डा खणून गाय पुरण्याचा आदेश दिला व विचारले, " कुठं खड्डा खणण्याचा विचार आहे तुम्हा लोकांचा ? "

उत्तरादाखल तोम्मन म्हणाला, " तुम्ही खड्ड्याविषयी का विचारता आहात ?"

पद्मनाभ कुरूपला या प्रश्नाचे फार आश्चर्य वाटले.

चिक्कूनी तोम्मनला डोळ्यांनीच गप्प रहाण्याचा इशारा केला, तोम्मनला चिक्कूचा गूढ संकेत समजला नाही, पण तरीही तो गप्प झाला. चिक्कूने त्याला

घाई करण्याचा चतुर आदेश दिला.

" खड्डा दुसरीकडं कशाला खोदायचा ? तिथंच खोदून टाका. " चिक्कूने तोम्मनला पुन्हा डोळयांनी खूण केली की गप्प राहा, म्हणून त्याने मालकाला काही उत्तर दिले नाही. तोटयाचा व्यवहार मान्य करणारा व्यापारी उभा रहावा, तसा तो उभा होता, त्याला काही सांगायचे होते, पण तो बोलला नाही. तोम्मन मूर्खपणा करील याचीच भीती चिक्कूला वाटत होती. म्हणून तो घाईघाईने तोम्मनजवळ गेला आणि त्याच्या कानात काहीतरी सांगितले. चिक्कूचा मुद्दा कळल्याबरोबर तोम्मन पढवलेल्या चोरासारखा दिसू लागला.

पद्मनाभ कुरूपचे लक्ष त्यांच्या खाजगी संभाषणाकडे नव्हते, म्हणून त्याला कसलीच शंका आली नाही. ते चिंचेच्या झाडाखालील जमिनीकडे पहात होते. कारण, पूर्वीही त्यांनी तिथे एक गाय पुरली होती. त्या झाडाच्या पश्चिमेला आणि पूर्वेला तोम्मन आणि चिक्कू रहात असत.

ते त्या दोघांना म्हणाले, " चिंचेच्या झाडाखाली गाय पुरणं योग्य होईल. "

त्यांचे बोलणे संपल्यावर चिक्कू आणि तोम्मन आपापल्या झोपडीत गेले. काही मिनिटांत एक जाड बांबू आणि दोरी घेऊन ते गायीकडे आले. गायीवर टाकलेली चटई त्यांनी बाजूला केली. गाय कोळशाच्या ढिगाऱ्यासारखी पडली होती.

दोघेही काही क्षण गायीकडे पहात राहिले. नंतर पोलिसांजवळ असते, तशा काठीने मारझोड करून चिक्कूने माश्या हाकलल्या. माश्या चिक्कू आणि तोम्मन यांना शिव्याशाप देत उडून गेल्या. पाय बांधण्यासाठी त्यांनी गाय हलवताच सगळीकडे सडल्याचा दुर्गंध पसरला. पद्मनाभ कुरूप आणि त्यांची पत्नी यांनी नाक दाबून धरले ... फक्त म्हातारी आजी रडत राहिली.

गायीचे प्रेत उलटे करून बांबूवर लटकवण्यात आले. बांबूचे एक टोक चिक्कूने आपल्या खांद्यावर आणि दुसरे तोम्मनने आपल्या खांद्यावर घेतले. गाय घेऊन जाताना वजनाने त्यांच्या अंगांत गोळे आले. पण ते प्रसन्न होते. कारण, त्यांची इच्छा पूर्ण होणार होती.

घरातल्या सगळया स्त्रिया रडू लागल्या आणि गायीला सद्‌गती मिळावी म्हणून प्रार्थना करू लागल्या. गायीला पुढचा जन्म कोणत्या योनीत येईल आणि आम्ही कोणत्या योनीत जन्म घेऊ ? हाच विचार त्यांच्या मनात येत होता.

" हम्हा... हम्मा ! " गोठयातली एक गाय हंबरली. बाकीच्या गायींनी आपली वेदना मौनानेच व्यक्त केली.

" हम्मा ... हम्मा ! " ओरडणाऱ्या गायीच्या डोळ्यांतून अश्रू ओघळत होते. ती दावे तोडण्यासाठी जोर लावीत असतानाच एका माणसाने येऊन तोम्मन आणि चिक्कू यांनी गायीची काय दशा केली त्याची वार्ता सांगितली, हे ऐकून घरातले सगळे लोक स्तंभित झाले. पद्मनाभ कुरूप यांना तर संतापाने वेड लागण्याची वेळ आली.

ते किंचाळले, " ! पापी ! सैतानाची अवलाद ! इतका विश्वास टाकल्यावर असं वागतात ? अशानं सर्वनाश ओढवेल ! "

कोणताही अडथळा न जुमानणाऱ्या हत्तीसारखे ते धावत निघाले. " पापी ! सैतानाची अवलाद ! " अशा शिव्यांचा भडिमार चालूच होता.

रागाने थरथरत ते चिक्कूच्या घरासमोर पोचले. तिथे चिक्कू, तोम्मन, चात्तन, अय्यपन, पळनी वगैरे जमले होते. खूप आरडाओरडा चालला होता.

त्यांच्यासमोर पोचल्याबरोबर पदमनाभ कुरूप किंचाळले, " पाप्यांनो ! "... ते सगळे गुळावर बसलेल्या माश्यांसारखे भ्याले.

त्या वेळी तोम्मन गायीचे मांस सुऱ्याने कापीत होता. चिक्कू आणि अय्यपन त्याला मदत करीत होते.

मालकांना पाहिल्याबरोबर ते उभे राहिले. त्या तिघांना कुरूपनी कान पकडून जोराच्या थपडा मारल्या. विटाळ झाल्याची जाणीव झाल्याबरोबर ते मागे सरले, त्यांनी मारणे थांबवले. चिक्कू आणि त्याचे सगळे साथीदार गयावया करीत क्षमा मागू लागले.

मेघगर्जनेसारख्या कानठळ्या बसणाऱ्या आवाजात पद्मनाभ कुरूप किंचाळले, " पाप्यांनो, हे काय करता आहांत ? "

तोम्मनचा थरकाप उडाला, हातातला सुरा गळून दूर जाऊन पडला, काही क्षण तेथे स्तब्धता पसरली. सुऱ्याचे टोक सूर्यप्रकाशात चमकले. नारळाच्या पानांवर एक चाकू आणि लाकडावर एक कुऱ्हाड ठेवलेली होती...

निःशब्द वातावरण !

त्यांना काही बोलायचे होते, पण मनातले शब्द ओठाशीच अडले. त्यांचा उच्चार कसा होणार ? काळ-स्वरूप कुरूप समोर उभे होते. त्यांचे डोळे खदिरांगारासारखे लाल होते. सगळे बिचकून उभे राहिले.

त्यांच्या हुकमाप्रमाणे सगळ्यांनी चिंचेच्या दक्षिणेला खड्डा खोदला. मग गायीचे कापलेले अवयव आणि कातडेही कुरूपाने आपल्या समक्ष खड्यात टाकायला लावले.

त्यावर माती टाकल्यावरच ते तिथून हलले.

दोन–तीन दिवस त्या गरिबांच्या घरांत चूल पेटली नाही. मग मध्यरात्री घरां-तून धूर बाहेर आला. हा धूर कोणत्या तरी गूढ उद्योगाचा परिणाम होता. त्या वेळी पद्मनाभ कुरूप सुखाची झोप घेत होते.– त्यांना काहीच कळले नव्हते.

# हसरी सुरी

**—के. टी. मुहम्मद**

आली मोल्लाक्काला वाटले की जणू त्याची सुरी चमकल्या मासोळीप्रमाणे हसत आहे. त्याच्या शरीराला बिलगलेली ती सुरी अजून त्याच्याजवळच आहे आणि हसत आहे. कमरेवरील म्यानात ती अजून चुपचाप पडलेली आहे. आजपर्यंत आज्ञाधारकपणाने त्याचे ऐकत आली आहे; पण आज कृतघ्न झाल्यासारखी हसत आहे. एरवी त्याने पर्वा केली नसती, पण आज ... ?

आज असह्य वेदनेने त्याला चारही बाजूंनी घेरले आहे. त्याच्या हृदयाचा फुगा फुगता फुगता फुटेल, अशी भीती वाटत आहे. त्याच्या पुढे भयानक पर्वत उभा आहे. अव्यक्त आणि उत्कंठापूर्ण शक्ती त्याला जाळीत आहे.

ती सुरी त्याच्या वेदनेला हसते. त्या वेळी ती समुद्राच्या तळाशी किंवा पर्वताच्या पलीकडे फेकून द्यावेसे वाटते. आपण तसे वागत नाही. कारण, आपली सगळी रहस्ये त्या सुरीला माहीत आहेत, याचीही त्याला जाणीव आहे. त्याने सुरीवर जिवलग मित्रासारखे प्रेम केले आहे. तिची धार कायम राहील, याकडे लक्ष पुरविले आहे. माणसाला सगळ्याच उपयोगी वस्तू आवडतात. ती सचेतन असल्याप्रमाणे तो तिला बिलगून रहातो. तिच्याजवळ मन मोकळेही करतो.

आली मोल्लाक्काची सुरी ही त्याची सहचरी आहे, जीवनाचा आसरा आहे. पण आज तो खोलीत आला, त्या वेळी त्याच्या मनात वादळ उठले होते. सुरी काढून ठेवणे, हाच त्या वादळापासून सुटका करण्याचा मार्ग होता. तो बाकड्याच्या काठावर ती काढून ठेवतो आणि एकटक तिच्याकडे पहात रहातो. छपरातून उन्हाचे कवडसे आत येत होते. तो तिथेच उभा राहिला. सुरीची कहाणी त्याच्या जीवनाची कहाणी आहे. सुरीव्यतिरिक्त आपल्या रूपाची तो कल्पनाही करू शकत नाही.

कहाणी एका सुरीची आहे.

आत येणारा कवडसा तिरपा होत सुरीच्या धारेवर पडला.

चांदीसारख्या चमकणाऱ्या सुरीला प्रकाशाचा स्पर्श झाला. आली मोल्लाक्का

चिंताग्रस्त मनःस्थितीत असला तरी एकदम चमकला. एकाएकी त्याला वाटले की सुरी त्याच्याकडे पाहून हसत आहे. त्याने चिंतेची कक्षा ओलांडली, त्याचे डोळे आणि मन अंगाई गाऊन चिंतांना प्रेमाने झोपवीत होते.

व्यामोह होऊ शकतो, उन्मादही.

त्याच्या चिंता दारूकामासारख्या वाढत आहेत.

रक्ताने न्हाऊन निघालेला तो मुलगा त्याच्या डोळ्यांसमोर नाचू लागला. त्या मुलानेच त्याला चितेच्या जळत्या आगीत ओढून आणले आहे. असा भास होतो की तो साश्रु नयनांनी हळूहळू त्याच्याकडे येत आहे. पण त्या मुलाला चिरून फेकायला किंवा त्याला आलिंगन द्यायला आली मोल्लाक्का असमर्थ आहे.

त्याच्या हृदयातला मोर्चा पुढे सरकत आहे. माणसांचा नव्हे, तर बकऱ्यांचा, गायींचा, कोंबड्यांचा ... अगणित जीवांचा तो न संपणारा मोर्चा आहे. त्या दृश्या-वरून नजर काढून घेणे त्याला जमत नाही. त्याला सगळे स्पष्ट दिसत आहे.

त्या सगळ्यांच्या गळ्यांत लाल-भडक पट्ट्या बांधलेल्या आहेत ? लाल पट्ट्या ? ... नाही, नाही. ते रक्त आहे. रक्त गोठून दगडासारखे झाले आहे. त्यांचे गळे वेगळेच आहेत – कापून लटकल्याप्रमाणे, धडापासून वेगळ्या झालेल्या गळ्यातून रक्ताचे पाट वहात आहेत. त्या सगळ्यांच्या गळ्यांवर कोणी सुरी चालविली आहे?

धारदार, स्पर्श केल्याबरोबर कापणारी सुरी समोर पडली आहे, पण सगळा बोल त्या सुरीलाच लावता येईल काय ? मग अपराधी कोण ?

अपराधी म्हणून आपल्याकडेच बोट दाखविले जात आहे, असे मोल्लाक्काला वाटले. त्या हृदयांतून निघालेला तो मोर्चा संपत नव्हता. संपत नाही. संपणारच नाही.

प्रेतांचा अवाढव्य मोर्चा पाहून तो भयभीत होतो. खिन्न झाल्यामुळे त्याला स्वतः-चाही विसर पडतो. तो प्रेत-लोकाकडे ढकलला जात आहे.

तो मोर्चा संपला का ? नाही, पण जनावरांमध्ये एका माणसाचे मस्तक दिसते. तो निरखून पहातो. कोण आहे ? चेहरा ओळखू येत नाही; पण तो अनोळखीही नाही. तो त्याच्या माहितीचा आहे. तरीही, तो कोण आहे ? कोण आहे ? तो भय-भीत होतो. एक परिचित-अपरिचित माणूस. आली मोल्लाक्काला असा भास झाला की तो घामाने डबडबला आहे आणि भीतीने करुणा भाकीत आहे. पळून जाऊ ? त्याच्या मनात एकदा विचार आला. पळण्याचा प्रयत्नही केला पण त्याचे पाय हलले नाहीत. त्या व्यक्तीच्या हातात एक तीक्ष्ण सुरी चमचमत होती. भुतासारखा तो तिच्याकडे सरकत होता. आली मोल्लाक्का थरथर कापू लागला. त्याला किंचाळावेसे

वाटले, पण ......

त्याला हसरी सुरी दिसत आहे. तो ती डाव्या हातात घट्ट पकडतो.

'अगणित जीवांचे ... बकऱ्यांचे, गायींचे, कोंबड्यांचे ... गळे कापून ती सुरी आली आहे का ?' त्याच्या मनात हाच विचार घुमतो. ती सुरी अजूनही त्याच्या हातात आहे. ते जीव तर प्राणान्तिक वेदनेने तडफडून मरण पावले. त्यांचा मृत्यू त्याने पाहिला आहे आणि सुरीला डोळे असतील, तर तिनेही ......

चितेच्या ज्वाला पुन्हा भडकल्या. धर्माने त्याला मोल्लाक्का हा किताब दिलेला होता. धर्म-शिक्षक, धर्माचरणात दिरंगाई न करणारा माणूस धर्माच्या दृष्टीने पर-मात्मा असतो. अशीच माणसे जनावरे कापतात. या घृणास्पद कामासाठी मारणे किंवा कापणे अशा शब्दांचा उपयोग होत नाही. ते पुण्यकर्म आहे. पुण्य संपादन करण्या-साठी आमच्या पूर्वजांनी माणसेही बळी दिली होती.

त्याने गुरे कापण्याचे काम स्वीकारले तेव्हा ते हास्यास्पद आणि पापपूर्ण मानले गेले नव्हते. त्याची तशी श्रद्धा होती, अनुभवही असाच होता की त्याचे वर्तन न्याय्य आहे. जगातल्या सगळ्या वस्तू माणसाच्या सुखासाठी आहेत. कुराणातले हे वाक्य त्याला दिलासा द्यायचे. पैगंबराने आणि त्याच्या साथीदारांनी उंट मारून खाल्ले होते. ही नीती सर्वांना मान्य आहे.

अशा प्रकारे मोल्लाक्का रक्षाकेन्द्रात पोचतो. कदाचित ... कदाचित शंभर हजार 'कदाचित' माणसाच्या अस्थिपंजराप्रमाणे त्याच्याशी सामना होत आहे. लटकणाऱ्या गळ्यांची गुरे आणि त्यांचा मोर्चा त्याला वारंवार उत्तेजित करतात. प्राणान्तिक वेदनेने ते तडफडत आहेत. रक्ताचे सरोवर कसे लाल आहे ! त्याची नदी बनते. त्या पशु-पक्ष्यांचे रक्तही माणसाप्रमाणेच लाल आहे. मृत्यूचा हुंकार घुमत आहे. हीन-दीन आत्मे निरोप घेत आहेत. त्याने आपल्या हाताकडे पाहिले. असे वाटले की सुरी निरपराध आहे. पण मी निरपराधी का नाही ? या सुरीसारखे मला का हसता येत नाही ? मोल्लाक्काने स्वतःलाच विचारले. वाटले की वेड्यासारखे खूप हसावे.

गुरे मारण्याचे पाप धर्माच्या नावाखाली खपून जाईल असा विचार करूनच त्याने ते काम स्वीकारले होते. या कामात काही पाप नाही असेच म्हणावे लागेल.

पण आज मन शंकित झाले आहे की धर्म कुठे चकवीत तर नाही ? तो विचार करू लागला —— नाही तर माझ्या हृदयात ही पीडा का उत्पन्न व्हावी ? हृदय विदीर्ण का व्हावे ?

तो मुलगा त्याच्या डोळ्यांसमोर अधिकाधिक जवळ येतो.

" मोल्लाक्का, जरा ही कोंबडी कापून द्या, घरी जावई आलेत. "

थोड्या वेळापूर्वी मम्मूट्टीसाठी एका गळ्यावरून सुरी फिरवली होती. ती कोंबडी हातात घेऊन मम्मूट्टी आला, तेव्हा त्याच्या मागोमाग रडत-भेकत त्याचा मुलगाही आला होता.

" हा का रडतोय ?" मोल्लाक्काने विचारले.

" त्याच्याकडे दुर्लक्ष करा, कोंबडी मारायची नाही म्हणतो. म्हणूनच रडतोय." मम्मूट्टीने उत्तर दिले.

" अब्बाजान, तिला मारू नका. " तो रडतच होता.

मुलाच्या म्हणण्याकडे मुळीच लक्ष न देता कोंबडीचे पाय आणि पंख पकडीत मम्मूट्टी म्हणाला, " ही कोंबडी याला प्राणांहून प्रिय आहे. दिवसभर तिला खायला घालीत असतो. पहिल्यांदा तिला खाऊ घालतो मग स्वतः जेवतो ... असा हा मुलगा ! "

मोल्लाक्का हातात सुरी घेऊन तिच्या तीक्ष्ण धारेवरून हात फिरवू लागला. मुलगा कोंबडीला बिलगून आक्रोश करीत होता.

" मी नाही मारू देणार. नाही मारू देणार. " तो हट्टाने म्हणाला.

मुलाच्या रडण्या-भेकण्याकडे लक्ष न देता आपले काम करायला मोल्लाक्का आणि मम्मूट्टी तयार झाले. मम्मूट्टीने मुलाला बाजूला सारले. मुलगा असहाय्य होऊन रडत होता, आणखीही काही मुले तेथे आली होती. ते आनंदाने कोंबडीवर सुरी चालण्याची वाट पहात होते.

मोल्लाक्काने भांड्यातून थोडे पाणी घेऊन कोंबडीच्या चोचीत घातले. पाणी पिऊन मरणे भाग्याचे असते. कापणारा माणूस कापण्यापूर्वी पाणी पाजण्याचे विसरत नाही.

कोंबडीचा गळा पकडून मोल्लाक्का मारायला तयार झाला. त्याने देवाचे नाव घेऊन सुरी कोंबडीच्या गळ्यावर चालविल्याबरोबर मुलगा किंचाळला. " मला तुम्ही ठार मारा. " असे म्हणत तो कोंबडीवर पडला आणि त्याने तिला छातीशी कवटाळून घेतले. मोल्लाक्का आणि मम्मूट्टी एकदम चपापले. मोल्लाक्काने चाकू झटक्यात ओढला. कुठे सुरी मुलाला न लागो. तो सुन्न झाला.

कोंबडी छातीशी कवटाळून मुलगा अजूनही रडत होता. कोंबडीच्या गळ्यातून रक्त वहात होते.

मम्मूट्टीला संताप आला. त्याने मुलाच्या हातातून कोंबडी हिसकली आणि त्याला दूर ढकलले.

" अब्बाजान, तिलाही आमच्यासरखी वेदना होते– तिलाही जीव आहे नं ?" मुलगा रडत रडत म्हणाला. असह्य वेदनेमुळे कोंबडीच्या चोचीतून अस्पष्ट आवाज आला. कोंबडीची तडफड मुलाला पहावत नव्हती. तो म्हणाला, " तुम्ही पाप करता आहात. अल्ला तुम्हांला नरकात टाकील. "

मोल्लाक्का सुरीला लागलेले रक्त धूत होता. मुलाच्या बोलण्याचा त्याला धक्का बसला. तो थबकला. मम्मूट्टीचे ओठ रागाने थरथरत होते. पण तो मुलाला अडवू शकला नाही. त्याने संतापून मुलाला दोनतीन थपडा मारल्या, मुलगा म्हणाला की त्याच्या शर्टाला रक्त लागले आहे, पण मम्मूट्टीला जणू काही ऐकूच आले नाही.

" वा रे तुझे प्रेम ! " मम्मूट्टी तिरस्काराने म्हणाला.

त्याचा मुलगा बेशुद्ध पडायला आला होता.

" मी तिच्यासाठी मार खायला तयार आहे. "

त्याच्या बोलण्याचा अर्थ मम्मूट्टीच्या ध्यानात आला नाही. मुलाच्या डाव्या खांद्यातून रक्त वहात असलेले त्याला दिसले. त्याने मुलाकडे लक्षपूर्वक पाहिले. त्याचे डोळे पिवळे पडत होते. मुलगा कोसळणार तोच .. मम्मूटी जोराने किंचाळला, " मोल्लाक्का ! "

मोल्लाक्का भीतीने कापू लागला. त्याच्या हातातून सुरी गळून पडली. सगळे रक्त तो धुवू शकला नाही. कुणाचे रक्त आहे ? त्या कोंबडीचे की या मुलाचे ? सुरीला लागलेल्या रक्ताकडे पहाण्याची त्याची हिंमत होईना. त्याच्या कानात मुलाचे शब्द घुमत होते.

" आम्हासारखा तिलाही जीव आहे, अल्ला हे सगळं पहातोय लक्षात ठेवा ! "

ती कोंबडी तडफडत आहे, मरणाची वेदना असह्य झालीय, हे मोल्लाक्कालाही कळते. वेदना केवळ माणसालाच नव्हे, सर्व प्राण्यांनाही होते. माणसाला जगावेसे वाटते तर काय बाकीच्या प्राण्यांना मरावेसे वाटते ? खून करणाराला सरकार मृत्युदंड देते. पण या मूक प्राण्यांच्या जीवाला काय काही किंमत नाही ! रणांगणावर मृत्यूचे तांडवनृत्य होते, तेव्हा आत्म्याची किंमत काय असते ? याचा निर्णय कुणी केला ? अनेक प्रश्न मंडावू लागले.

त्याचे हृदय पेटू लागले. डोके भणाणून गेले.

त्या मुलाला तो शाप देऊ शकला नाही. त्याची जणू वाचा बसली.

त्याच्या श्रद्धेने त्याला झिडकारले आहे ? आजपर्यंत तो ज्या धर्माची सेवा करीत

होता, त्यानेच त्याला नाकारले आहे का ? तो भ्याला. त्याला एकटे वाटू लागले.

त्याच्या हातातली सुरी खूप हसत होती. तिची मूठ विस्तवासारखी तापली होती. मोल्लाक्काला वाटले, आपला हात जळत आहे.

त्याच्या हृदयात निघालेला मोर्चा कोणत्या घोषणा करीत आहे ? मुलाच्या आवाजासारखा आवाज त्याच्या कानांवर पडत आहे. त्या जनावरात एक माणूस — त्याची अस्पष्ट आकृती मोल्लाक्काजवळ येत होती. त्याच्या हातातली सुरी मोल्लाक्काच्या सुरीसारखीच दिसत होती. त्याने आपली सुरी घट्ट पकडली, ती चमकत होती, नव्हे, ती हसत होती. त्याला वाटले, सुरी आपल्या हातातून निसटू पडते. एका गळयाशी परिचय झालेली ती सुरी वेगाने दुसऱ्या गळयाच्या रोखाने निघाली आहे. त्याच्या डोळयांपुढे काजवे चमकले. त्याला अंधेरी आली. भीतीने वेड्यासारखे झाले.

त्याचा श्वास जोराने चालू लागला. तो अस्पष्ट पण परिचित पुरुष त्याचा गळा दाबीत आहे का ? त्याचा श्वास कोंडला. शुद्ध हरपत आहे ? त्या बंधनातून मुक्त होण्याचा प्रयत्न मोल्लाक्काने केला, पण तो असफल ठरला. त्या माणसाचा सुरी घेतलेला उजवा हात त्याच्या दिशेने सरकत होता. मोल्लाक्का करुणा भाकू लागला. त्याला चक्कर आली, डोळयांपुढे सुरी आणि कापलेले गळे नाचू लागले. गळे कापले जात आहेत आणि त्यांतून निघालेले रक्त गोठून काळे पडत आहे.

प्राणान्तिक वेदनेने जीव तडफडतो आणि अखेर मरतो. सुरीवर कोणाचे रक्त आहे ? — कोंबडीचे की मुलाचे ?

माणसाचे रक्त आहे !

मोल्लाक्काचा हात वर उचलला गेला. त्याने सुरीवर तीक्ष्ण दृष्टी टाकली. ती सुरी अजूनही हसत आहे ? तो वेडा झाला. त्याने दात कडकडा चावले.

सुरी, गळे, रक्त.

हे सगळे रॉकेटच्या वेगाने त्याच्या हृदयात धावू लागले. गळयावरील फास घट्ट होत आहे, श्वास कोंडल्यासारखी त्याची तडफड झाली. त्याला स्वत:ला सावरता येईना, त्याची जाणीव नाहीशी झाली.

तरीही, सुरी आणि गळे.

सुरी गळयाच्या दिशेने वेगाने येते. सुरी मृत्यूचे रूप धारण करीत आहे. गळा कापला जातो, रक्ताचे कारंजे उडते. तरीही, मृत्यू, मग सुरी, मग गळे, मग मृत्यू.

त्याच्या हाताने सुरी पकडून वेगाची हालचाल केली, मांस कापल्याचा एक

आवाज, बस. ...

मोल्लाक्काच्या गळ्यातून एक आर्त स्वर निघाला. त्याचे कपडे रक्ताने माखले. सुरी हातातून निसटून खाली पडली व तोही कोसळला.

रक्ताने भिजलेली ती सुरी ! हसरी सुरी !

# बळीचा बकरा

—नंबनार

लेफ्टनंट कर्नल सहूजा लंचसाठी आले तेव्हा श्रीमती सहूजा पाहुण्यांच्या खोलीत सोफ्यावर निजलेल्या होत्या.

कर्नल आवाज न करता कपडे बदलून पायजमा घालून त्या खोलीत आले, तरीही त्यांच्या पत्नीला जाग आली नाही. कर्नलना कडकडून भूक लागली होती; पण तरीही पत्नीच्या सौंदर्याचे अवलोकन करीत ते चुपचाप उभे राहिले. अपूर्व लावण्य, पंधरा वर्षे संसार झाला, दोन मुले झाली, पण तरीही लावण्याला धक्का पोचलेला नाही. कर्नल पत्नीजवळ बसले. मग तिच्या चेहऱ्याशी वाकून हळूच गालांना स्पर्श केला. तिथल्या हवेत गुलाब आणि गार्डली पावडरचा मिश्र सुगंध होता.

श्रीमती सहूजा दचकून जाग्या झाल्या आणि उठून बसल्या.

" डीयर, मी आहे." कर्नल म्हणाले.

" वाट पहाता पहाता झोप लागली." डावा तळवा ओठांवर ठेवून तिने जांभई दिली.

" आय'म सॉरी ! " कर्नलनी जवळ ओढून तिचे चुंबन घेतले.

" ओह, नो, नो, डियर...!"

मग दोघे लंचसाठी डायनिंग हॉलमध्ये आले.

म्हातारा बटलर टेबलावर जेवण आणून वाढायच्या तयारीतच होता.

' कम सप्टेंबर ' मधील एका गाण्याची चाल गुणगुणत कर्नल थकल्यासारखे खुर्चीवर बसले.

चिकन सूप चमच्याने पीत असतानाच कर्नल म्हणाले, " डियर, मी आज त्याला शिक्षा दिली."

" कुणाला ?"

" शिपाई भोलानाथला. "

" कोणती शिक्षा दिली ?"

" अठ्ठावीस दिवसांची आर. आय."

श्रीमती सहूजा हसल्या.

" फारच छान ! कोर्ट मार्शल करून त्याला सिव्हिल जेलमध्ये टाकायचं होतं. बदमाश कुठला ! "

कर्नल थोडे बेचैन होऊन म्हणाले, " त्यानं एवढा मोठा अपराध केला नाही. त्याचं वर्तन मला पसंत नव्हतं एवढंच. म्हणून नियमाच्या चक्रव्यूहात अडकवून शिक्षा दिली."

कर्नल आणि श्रीमती सहूजा चिकन सूप पीत पीत भोलानाथाविषयी बोलत होते आणि भोलानाथ रेजिमेंटमधील क्वार्टर गार्डच्या कोठडीत भिंतीला टेकून बसला होता. त्याने आपले दु:ख ईश्वराशिवाय कोणाला सांगावे ? ईश्वर हे सर्व जरूर पहात असेल. वीस वर्षांच्या शिपायाच्या नोकरीत पहिल्यांदा दंड मिळाला आहे आणि तोही चूक नसताना. नोकरी संपत आली असताना. ' शीट रूल ' मध्ये लाल शाईची नोंद झाली. तेही सहन करता येईल. पण अठ्ठावीस दिवसांचा पगार मिळणार नाही, हा विचार येताच जिवाचा थरकाप होतो. गावातल्या मोडकळीला आलेल्या घरात मनीऑर्डरची वाट पहात बायको आणि चार कच्चीबच्ची बसली आहेत. पगार मिळाल्याबरोबर पहिले काम बायकोला पैसे पाठवणे हे असते. त्यानंतरच भोलानाथ बराकीत परत येतो. त्यानंतर मन थोडे शांत होते; पण येत्या महिन्यात काय करायचे ? हा विचार करता करता भोलानाथच्या डोळ्यांपुढे अंधेरी आली, डोके भणभणू लागले.

भोलानाथची ' इन्फंट्री 'त वीस वर्षांची नोकरी झाली आहे. काही दिवसां-पासून दमा मागे लागला आहे. नव्या रेजिमेंटमध्ये आल्याला तीन महिने झाले. सिक्कीम बॉर्डरहून इथे आला आहे.

सिक्कीम बॉर्डरवरील गोठवणाऱ्या थंडीत त्याला फार त्रास होत होता. त्याला अखेर इस्पितळात भर्ती व्हावे लागले होते.

नव्या लोकांच्या स्टाफ परेडच्या दिवशी शिपाई भोलानाथ सी. ओ. साहेबांना म्हणाला, " साब, मी दमेकरी आहे."

त्याची पर्वा न करता कर्नल साहेब म्हणाले, " कठीण काम करता येत नाही?"

" नाही साब."

" हलकं काम दिलं तर ? जमेल नं ?"

कर्नलनी झटकन वळून सुबेदार मेजरना हुकूम केला, " मी याला माझा आर्डरली

केलंय. उद्या सकाळी चार वाजता बंगल्यावर येऊ द्या. ओ. के ! "

" बहोत अच्छा साब ! " सुबेदार मेजर म्हणाला.

कर्नल झटकन ऑफिसात गेले.

भोलानाथ दचकला. ऑर्डरली ! आजपर्यंत हे काम केलं नाही. थोडाही स्वाभिमान असलेला शिपाई हे काम पत्करताना संकोचतो. इतके कष्ट सोसले; पण अभिमानाला ठेच लावणारे काम त्याने आजपर्यंत केले नाही, नोकरी सरता सरता हेही करावे लागणार !

" साब, मला हे काम नको. " असे शब्द ओठांपर्यंत आले होते. पण तोपर्यंत कर्नल ऑफिसात पोचले होते.

नंतर जाऊन म्हणणे योग्य झाले नसते. अनेकांचे म्हणणे आहे की कर्नल फार निर्दय आहे. पहिल्याच दिवशी त्याची नामर्जी ओढवून घ्यायची नव्हती. म्हणून त्या वेळी गप्प राहिला. ' थ्रू प्रॉपर चॅनेल ' आपला रिपोर्ट घेऊन जाणेच हाती होते.

त्याच दिवशी सेंट्रल रोलकालमधून आपला रिपोर्ट घेऊन भोलानाथ सुबेदार मेजरना दाखवायला गेला.

" साब, हे ऑर्डरलीचं काम माझ्यानं होणार नाही ! "

सुबेदार-मेजर संतापाने जागच्या जागी उठून म्हणाला, " मग तू कोणतं काम करू शकशील ? टोळीचा कॅप्टन सुट्टीवर आहे, ते काम तुला देऊ ?"

शक्य तेवढया विनयाने भोलानाथ म्हणाला, " साब, मी रेशन चेकिंग करायला जात जाईन."

" रेशन चेकिंगला जाऊन तू काय करशील ? माश्या मारशील ? म्हातारा झाला आहेस अन शिवाय दुबळा दमेकरीही आहेस."

सुबेदार मेजर जे म्हणाले, ते ठीकच होते. म्हातारा झाला आहे, प्रकृती चांगली नाही, दमाही झाला आहे. पण हे सगळे त्याच्या चुकीने तर झाले नाही !

भोलानाथ तरीही विनम्र आवाजात म्हणाला, " साब ! मी ऑफिसातला ऑर्डरली होऊ ?"

सुबेदार मेजर खवळले, " मूर्ख, गाढव ! माझ्यासमोरून चालता हो. लक्षात ठेव उद्या सकाळी कर्नल साहेबांच्या बंगल्यावर रिपोर्ट केला नाहीस तर...?

भोलानाथला निराश होऊन परतावे लागले. मोठ्या संकटात सापडला होता. आपले दुःख सांगायला दुनियेत कोणी नाही. यापेक्षा सिक्कीमच्या गारठ्यात आयुष्य घालवणे जास्त चांगले होते !

शिपायांचे एक विश्व आहे. माणूस, जनावर, किडे सगळयांचे मिळून एक विश्व. या विश्वात शिपाई फक्त किडे आहेत. हुकूम ऐकण्याव्यतिरिक्त शिपाई करूच काय शकतो ? चांगल्यावाइटांचा विचार करण्याचा अधिकार त्याला नाही.

हुकमाप्रमाणे दुसऱ्या दिवशी सकाळी भोलानाथ बंगल्यावर पोचला. मोठा, आलेशान बंगला. समोर बगीचा. मागे नोकरांच्या खोल्या आणि गॅरेज. कर्नलच्या दोघा मुलांना फक्त इंग्रजी येते. अनोळखी लोकांवर तुटून पडणारा अल्सेशियनही तिथे आहे. त्यामुळे कर्नलचा बंगला ही भीती आणि नाविन्य यांचे मिश्रण असलेली अद्भुत वस्तू वाटते. त्या दुनियेची नायिका सुंदर आणि गर्विष्ठ होती. पहिल्या नजरेतच भोलानाथला मेमसाहेबांविषयी घृणा वाटू लागली.

सकाळी सहा वाजता बंगल्यावर जाणारा भोलानाथ रात्री फार उशिरा आपल्या खोलीवर पोचायचा. बागेला पाणी देणे, बाजारातून मांस, भाज्या विकत आणणे, धोब्याकडे जाणे, मग घरातल्या सगळया पादत्राणांना पॉलिश करणे अशी पुष्कळ कामे त्याच्यावर सोपवलेली होती. पहिल्यांदा अशी कामे करताना त्याला फार दुःख झाले. पण त्याचा काय उपयोग ? अशिक्षित, म्हाताऱ्या आणि आजारी माणसाचे दुःख कोण समजून घेणार ? सहन करणेच चागले. 'मला अन माझ्या बायको-मुलांना या जगात जिवंत रहायचंय.'

तीस दिवस हलकी कामे करून का होईना, आपण घरी पैसे पाठवू शकतो एवढाच संतोष भोलानाथच्या जिवाला होता.

दोन महिने उलटले. एके दिवशी बंगल्यामागील नळावर भोलानाथ साहेबांची बनियन धूत होता. त्या वेळी एक पेटिकोट नळाखाली असा येऊन पडला की जणू आकाशातून टपकला होता. भोलानाथने मागे वळून पाहिले, त्याच्या मागे मेमसाहेब उभ्या होत्या.

"हा पेटिकोट धुवून टाक. मला एयर फोर्स ऑफिसर्स मेसमधे जाताना घालायचाय."

भोलानाथ एकदम उभा राहिला. तो रागाने कापू लागला. निखाऱ्यासारख्या लाल डोळयांनी मेमसाहेबांकडे पहात म्हणाला, "हे माझ्यानं होणार नाही, समजलं ?"

"गाढवा, हा धुतल्यानं काय तुझे हातपाय मोडतील ?"

संतापाने भोलानाथचे भान हरपले, "आता तोंडातून एक शब्दही काढला तर तुझ्या स्त्रीत्वाची पर्वा मी करणार नाही." एवढे बोलून एक मिनिटात तो यूनिट

लाईनमधे आला, सुबेदार मेजरना सगळी हकीकत ऐकवून म्हणाला, "माझं वाटेल ते करा, पण आजपासून कर्नल साहेबांच्या ऑर्डरलीचं काम मला नको."

"तू पागल झालाहेस का ?"

"हो. मी पागल झालोय."

"मूर्खा, भानगड काय आहे ?"

"मेमसाहेबांचा पेटिकोट मी धुणार नाही. तुम्ही सगळे मिळून वाटल्यास मला फासावर चढवा नाहीतर देशाबाहेर हाकला."

भोलानाथचा चेहरा पाहिल्यावर सुबेदार मेजरलाही घडले ते वाईट, असे वाटले. ही तर स्वाभिमानाला ठोकर आहे.

"रिपोर्ट असेल, तर तू 'प्रॉपर चॅनेल' नं माझ्याकडं आण. माझ्यासमोर असा उभा राहू नकोस."

'प्रॉपर चॅनेल' म्हटल्याबरोबर भोलानाथ बाणासारखा आपल्या खोलीत येऊन पलंगावर पडला. त्याने निर्णय घेतला की, 'वाटेल ते होवो, आपण कर्नलसाहेबांच्या बंगल्यावर जायचं नाही.'

त्याच दिवशी दुपारी लंच घेताना कर्नलची पत्नी म्हणाली, "डियर, आम्हांला वाटलं होतं तसा भोलानाथ नाही. फार घमेंडखोर आहे."

"हूं, काय झालं ?"

"मी पेटिकोट धुवायला सांगितलं तर नाही म्हणाला, बदमाष कुठला !"

"तो काय म्हणाला ?"

"म्हणतो काय ! बडबडत गेला."

"इतकी घमेंड ! मी त्याला ठीक करीन." कर्नल म्हणाले व सुबेदार मेजरला फोनवर बोलावून सांगितले, "भोलानाथला आजपासून ऑर्डरलीच्या कामावर पाठवू नका."

भोलानाथचे ऑर्डरलीचे काम अशा प्रकारे संपले. तो बिचारा कर्नलच्या दृष्टीने वाईट माणूस ठरला.

नंतर भोलानाथला गेट आर. पी. चे काम देण्यात आले. काम चांगले होते. तिथे नेहमी चांगल्या पोशाखात रहावे लागायचे.

उत्तम इस्त्री केलेला पोशाख घालून आर. पी.चा बॅज मिरवीत तो म्हातारा शिपाई यूनिटच्या मुख्य फाटकापाशी उभा असतो. एका हातात छोटी छडी असते आणि येणाऱ्या-जाणाऱ्या ऑफिसरांना सलाम ठोकावा लागतो. कर्नलसाहेबांच्या

येण्या-जाण्याकडे भोलानाथचे बारीक लक्ष असते. तो कर्नलना कडक सॅल्यूट ठोकतो. कर्नलसाहेब त्याला पकडण्याच्या फिकिरीत आहेत, हे त्याला माहीत होते. शिपायांच्या चुका काढून दंड ठोठावताना अधिकाऱ्यांना थोडीही दया येत नाही.

कर्नलनी आपल्याला पकडण्यासाठी जाळे लावले आहे याची जाणीव भोलानाथला होती. आपण सापडू नये म्हणून तो कसोशीने काम करतो. एवढी काळजी घेऊनही अखेर तो जाळ्यात अडकलाच.

एक वाजायची वेळ असेल. कर्नलच्या जेवणाची वेळ होती. या जाणिवेने भोलानाथ सावध होता. कर्नलची जीप इथून जाईल तेव्हा सगळी शक्ती एकवटून झटक्याने सॅल्यूट द्यायचा आहे. कर्नल गेल्यावरच त्याला जेवायचे आहे. भूक फार लागते; पण भुकेमुळे कामात कुचराई नको. त्याच क्षणी गोळी झाडल्याचा आवाज आणि कुत्र्याचे केकाटणे भोलानाथला ऐकू आले. त्याच्याजवळच हातात बंदूक घेतलेला असा हवालदार चरणसिंह उभा होता. जणू काही घडलेच नव्हते.

भोलानाथ हे भयंकर आणि दारुण दृश्य पहात असतानाच कर्नलची जीप फाटकातून बाहेर आली. भोलानाथ सॅल्यूट करायला विसरला.

कर्नलनी जीप मागे घेऊन भोलानाथजवळ उभी केली तेव्हा त्याने गडबडून सॅल्यूट केला.

" तुझ्याजवळ जीप उभी राहिल्यावरच तू मला सॅल्यूट करशील काय ?" कर्नलने विचारले.

काय उत्तर देणार ! जीभ जणू पोटात उतरली, तोंडातून शब्द फुटेना.

" मी इथून निघालो तेव्हा तू काय मेलेला उभा होतास ? "

" जी नहीं, साब ... साब ! "

" साब के बच्चे, तू काय करत होतास ? "

" साब ! कुत्रा गोळी लागून ... "

कुत्र्याला गोळी लागली तर त्याचा तुझ्याशी काय संबंध ? गाढवा ! तुम्हा सगळ्यांना फ्रंटवर पाठविलं, तर काय कराल ? "

कर्नलसाहेबांना फाटकात उभे पाहून सुबेदार मेजर धावत आला, कर्नल सुबेदार मेजरकडे पाहून जोराने म्हणाले, " दिसत नाही, या टोळीतली शिस्त ! हा क्षुद्र शिपाई सी. ओ. ला साधा सॅल्यूटही करीत नाही ! "

भोलानाथला काही सांगायचे होते, पण त्याच्या आधीच सुबेदार मेजरनी ' बोलू नकोस. ' म्हणत भोलानाथला मारायला हात उगारला.

कर्नल म्हणाले, " उद्या याला माझ्यासमोर मार्च करवा. "

कर्नलनी जीप स्टार्ट केली. सुबेदार मेजरनी सॅल्यूट केला. जीप हिंस्र श्वापदासारखा आवाज करीत निघून गेली.

जीप डोळ्यांआड झाल्यावर सुबेदार मेजरनीही त्याच्यावर तोंडसुख घेतले. भोलानाथच्या तोंडून शब्द फुटला नाही.

मी का सॅल्यूट केला नाही, याचे कारण कोणी समजून घेत नाही. बिचारा एक प्राणी प्राण सोडण्यासाठी तडफडत होता त्यामुळे लक्ष दुसरीकडे गेले; पण हे कुणाला सांगावे आणि कोण ऐकून घेईल ... ?

दुसऱ्या दिवशी भोलानाथने कर्नल समोर मार्च केला.

कर्नलने भोलानाथला अठ्ठावीस दिवस आर. आय. ची शिक्षा ठोठावली.
पुष्कळ दिवस प्रतीक्षा केल्यानंतर यश मिळाल्याच्या आनंदात कर्नलनी सिगारेट पेटवली. त्यानंतर ते जीपमध्ये बसून लंचसाठी गेले. ही आनंदाची बातमी बायकोला सांगितल्यावरच त्यांचे मन शांत झाले.

भोलानाथला कायद्याच्या कचाट्यात अडकवून शिक्षा केल्याची गोष्ट खुलवून सांगत मिस्टर आणि मिसेस सहजा जेवले.

बिहारमधील एका गावातील मोडकळीला आलेले घर भुकेने तडफडणाऱ्या पत्नीसाठी आणि मुलांसाठी मनीऑर्डर घेऊन पोस्टमन पुढील महिन्यात आला नाही.

# एक कथाकार सुळावर

– टी. पद्मनाभ

पाऊस जोराने कोसळत आहे. त्याबरोबरच थंडीही वाढत आहे. सकाळी आकाश निरभ्र होते. मग कुठून तरी वारा ढग घेऊन आला, ते आले तेव्हा पांढरे होते, बकरीसारखा त्यांचा स्वभाव सरळ होता; पण त्यांचा इरादा फार लवकर बदलला, ते वेगाने सगळ्या आकाशात जमा झाले. बाष्पपूर्ण काळे मेघ पहाताना मला जी अनुभूती होते, ती सांगायला मी संकोचतो. पण मला प्रथम आठवतं ती माझ्याशी अचानक नातं जोडणारी श्यामवर्णी नाजूक स्त्री. देह कसा ? एकदम निर्वस्त्र.

आज सकाळी आलेल्या एका प्रगल्भ चित्रकाराजवळ मी ही गोष्ट बोललो. तो माझा मित्रच आहे. त्यामुळे लपवालपवी करण्याची आवश्यकता नव्हती, पण मूर्खाचं बडबडणं ऐकावं तसं तो माझं बोलणं ऐकत होता. माझी नाडी पकडून तो म्हणाला, " फार थकलाहेस, जास्त बोलू नकोस. "

आलेला राग मी गिळला. कारण, मला पुढं गप्पा करता आल्या नाहीत. मी थकलो नव्हतो. मन उल्हसित होतं.

मला त्याच्याकडे पाहून जोराने बोलायची इच्छा होती. पण जीभ वळली नाही. पडल्या पडल्या असहायपणाने पहात होतो.

मी जागेपणीच स्वप्न निर्मिले होते. मित्र कोणाचं तरी चित्र काढीत होता. त्याच्याजवळ एक सुंदर थैली होती. तीत कागद, पेन्सिल आणि रंग सुरक्षित ठेवलेले आहेत, थैली कायम त्याच्याबरोबर असते. मला आश्चर्यही वाटले. एक दिवस मी विचारले, " तू मरशील तेव्हाही ही थैली बरोबर राहील ? "

" अवश्य, ही थैली नसेल तर मी ईश्वराजवळ पोहोचू शकेन कसा ? " तो म्हणाला.

माझा ईश्वरावर विश्वास नाही. पण माझा चांगल्या चित्रावर विश्वास आहे. चित्रकाराविषयी मला आदर वाटतो पण माझी अशी खात्री आहे की, सगळ्यांनी पॉल गॉगिनप्रमाणं जगलं पाहिजे. दक्षिण सागरातील सुंदर ताहिती बेटावरील वादळ

म्हणजे पॉल गोगँ.

मी पॉल गॉगिन असतो तर – कदाचित – पॉल गोगँ आणि मी यांच्यामध्ये एक फ्रेम केलेलं चित्र आहे. ईश्वराचं चित्र आहे. त्याची काच फुटलेली आहे. कुणी फोडली ती काच ?

कोण आहे ?

लवकर सांगा.

नाही –

त्याला मारू नका

मातेचा वेदनायुक्त — निराशाजनक आवाज.

नाही – नाही, इकडे ये.

मला भीती वाटू लागली, पळण्याचा प्रयत्न केला, पण पळू शकलो नाही.

वेदनेने तडफडून मी किंचाळलो.

मग चित्र काढले नाही.

त्या दिवशी एक मूल होतो.

सतत चित्र काढले असते तर –

कोण झालो असतो ?

पॉल गॉगिन. ताहिती द्वीपाचा –

दोस्ताची थैली पाहून ती घटना आठवत होती.

फार थंडी वाजते.

विजेची गाडी आवाज करीत धावते.

धाड् ··· धाड् ··· धाड् ··· धाड् ··· धाड् ··· धाड्.

खोलीत अजून दिवा लागला नाही, कोण लावील ? मी उठणार नाही. असाच पडून राहीन. अंधार मला झाकून टाको.

खिडकी उघडी आहे. अंधार आहे आणि भिजलेले आकाश, एकही तारा नाही. वाऱ्याबरोबर पावसाचे थेंब आत येत आहेत, पण मी खिडकी बंद करीत नाही. मी उद्या असाच मेलो तर माझ्या पापण्यांवर आणि मिश्यांवर हे थेंब पडलेले सकाळी दिसतील. मला पहाणारे म्हणतील –

' अरेरे – मरण पावला ! '

' आजकाल त्याची प्रकृती ठीक नव्हती. कदाचित त्याच्या जीवनात कठोर घटना घडली असेल. '

'कधीकधी तो कथा लिहीत असे.'

वैडूर्यांच्या चमकत्या मोत्यांची नथ घातलेल्या त्या युवतीबद्दल कोणी काही म्हणणार नाही.

कुठे आहे ती ?

तारकांकित निळ्या आकाशाखाली गुलाब-गंधाचा स्वीकार करून मी मृत्यूचे स्वागत करतो.

काश्मीरातल्या बनिहालची रात्र. मी अगदी असाच पडलो होतो. माझ्याजवळ लोकरीची मेंढी आणि मोठमोठे कुत्रे होते. दूरवर बर्फाने झाकलेले पहाड, तळाशी सतत आवाज करणारा झरा, हिमावृत प्रदेशाला जणू तार्‍याप्रमाणे टिळा लावीत होता.

सकाळी उठल्यावर कळले की मी मेलो नाही । त्या रात्री मी मेलो असतो तर! माझ्या कथेविषयी मी अजून काही सांगू शकलो नाही. आता सांगण्याची वेळ आलीय.

ही खोली तितकीशी चांगली नाही, मग मी इथं का राहू लागलो ? कारण, ही जागा चांगली आहे. त्याचीही अनेक कारणं आहेत. शिवाय इतर काही काम नसलं तर या पलंगावर पडल्या पडल्या बाहेर पाहू शकतो. दूरवर वाऱ्याने हलणाऱ्या हिरव्या वृक्षराजीमागे आकाशच काय ते दिसते; पण मला जणू सर्व काही दिसून चुकतं. डॉ. राव यांच्या बगीच्यात बहराला आलेला गुलमोहर, हिरव्या गवताची झालर असलेल्या सडका, म्हशी डुंबत असलेला घाणेरडा लाल पाण्याचा तलाव, पलीकडे विजेची गाडी आणि त्याहीपलीकडे विशाल मैदान आणि हिरवंगार अरण्य.

संध्याकाळ होताच सडकेवर गर्दी जमू लागते. त्यात स्त्रियांची संख्या बरीच जास्त असते. तिथे नऊ स्टूडिओ आहेत.

मी तिथे जगतो.

मी एक कथा लिहिली होती. त्या स्त्रियांबद्दलही मी लिहिलंय पण मी अजून त्यांच्याबरोबर कुठं गेलो नाही. अजून कोणत्याच स्त्रीजवळ गेलो नाही.

कदाचित फार जुनी गोष्ट आहे. त्यानंतर'''जाताना मित्राने त्याने काढलेले चित्र मला दिले. बराच वेळ मी तेच पहात राहिलो. अखेर माझ्या डोळ्यांत अश्रू आले. अश्रूंचे काही थेंब चित्रावरही पडले. मी रडलो नाही, पण माझ्या डोळ्यांतून सतत अश्रू झरत होते.

कुणाला काही सांगता आलं असतं तर ···

त्या चित्राखाली मी लिहिलं — " एक कथाकार सुळावर. "

आपला आत्मा लपवणारं ते चित्र. स्पष्ट काहीच नव्हतं पण त्यात सुटलेलंही काही नव्हतं. उघड्या खिडकीतून दिसणारं आकाश, ढग आणि वाऱ्यानं डोलणारी झाडांची पानं हे सर्व त्यात होतं, त्याव्यतिरिक्त माझ्या कथेचं हस्तलिखित असे वाटत होतं की जणू मीच पूर्ण चित्र आहे.

माझी कहाणी !

त्या कहाणीमागं दडलेली कथा मला सांगायची आहे.

अजूनही दोघा मृत मित्रांप्रमाणं ते चित्र आणि ते हस्तलिखित टेबलावर पडलेलं आहे.

मी माझी कथा त्या सगळ्यांसमोर कशाला वाचली ? मी कशी वाचू शकलो. याचंच मला आश्चर्य वाटतं.

प्रकाशित करायची इच्छाही होती. सांगायचा मुद्दा असा की ती एक सामान्य कथा नव्हती. पुष्कळ लोकांना ती समजत नाही. कोणी कोणी ती वाचून चपापतात. लोक म्हणतात –' वेडा आहे बिचारा. ' म्हणूनच मी विचार केला, ही कहाणी इथंच असू द्या. ही लिहिणं हीच मोठी कामगिरी आहे. ही प्रकाशित केली नाही तर कुणाचं काही नुकसानही झालं नाही. कुणा संपादकाला वाटलं तर माझ्या मृत्यूनंतर तो ही छापू शकतो. शीर्षक असं राहील — आगामी अंकात पद्मनाभची अप्रकाशित कथा. '

पण मित्रांनी हट्ट धरला –– ' नाही. ही कथा तुझ्या साधनेचं बहुमोल फळ आहे, तुझ्या आत्म्याच्या उज्ज्वल प्रकाश आहे. जीवनाचा विकारांची तीव्र व्याख्या ! '

कदाचित.

ही माझ्या मांसाची कहाणी आहे.

यात विशेष काही नाही, आत्म्याच्या चारही बाजूंना तर नेहमीच मांस असतं.

त्या छोट्या खोलीत पुष्कळ लोक होते. माझा कोणाशी परिचय नव्हता. तरीही मी त्यांना बोलताना ऐकलं होतं — टीकाकार, कवी, नाटककार ··· मी चकित झालो. त्यांतल्या कोणी तरी माझी कथा अवश्य वाचली असेल ? ··· पद्मनाभच्या कथा ··· त्या न वाचताच लोक विश्वास ठेवतात की तो एक उत्तम कथाकार आहे.

मला वाईट वाटलं.

वाचायसाठी हस्तलिखित हातात घेताना माझे हात थरथरले, गळा दाटून आला.

हे भीतीमुळे घडले नाही. पण नंतरची घटना विलक्षण होती. वेदना, विषाद आणि निराशा यांनी भरलेले शब्द हृदयाच्या गाभ्यातून वर आले. त्या वेळी माझ्या मनात ती युवती होती. मी केवळ तिच्याकडं पहात होतो. तिच्यासाठी ··· फक्त तिच्यासाठी ··· मी म्हणत होतो.

डोळ्यांतली करुण छटा असलेली ती ··· अन मी वाचणं संपविलं तेव्हा खोलीत पूर्ण शांतता पसरली होती.

मग एक एक मिळून सगळे मला सुळावर चढवू लागले.

··· असं दिसतं की वाक्यरचनेकडे त्यांचे लक्ष नाही. शिवाय आमच्या अग्रगण्य लेखकांच्या कथांत जी एकाग्रता आढळते तीही इथं दिसत नाही.

मला काही समजलं नाही. एकाग्रता ? ही काय भानगड आहे ?

एकाग्रता —— हिप्पोपोटेमस ··· वर्णनं बहुधा अश्लील असतात. स्त्री-पुरुष संबंधावर लिहिणारे हजारो नवीन साहित्यिक ···

···या कथेतील घटना योजकतेने जुळवलेल्या आहेत ···

मी त्या सगळ्यांच्या पायांकडं पाहिलं. माझी कथा कळायला तुम्हांला शंभर वर्षे लागतील. मी फक्त तुमच्यासाठीच लिहीत नाही. तुमच्या वंशजांसाठीही मी लिहितो. मी शंभर वर्षांनी युगे उलटली तरीही जिवंत राहीन. मी मरणार नाही. माणसाचं··· ही कथा फ्रेंच कथेचे अनुकरण आहे. अनुकरण करताना निर्लज्ज ··· मग काही ऐकू आलं नाही.

डोळ्यांवरून शोकमग्न वाटणारी ती. मी तिचीच कथा लिहिलीय, माझी स्वतःची कहाणी. ती चांगली असेल, वाईट असेल, पण फ्रेंच कथेचे अनुकरण कशी असेल ?

माझं डोकं तापलं. शून्यतेनं मन व्यापलं. किती सहज सांगितलं की माझी कथा फेंच कथेचं अनुकरण आहे ! फ्रेंच कथेचं अनुकरण, फ्रेंच कथेचं...

गर्दीच्या रस्त्यावरून मी चालत गेलो. माणसांच्या विस्तीर्ण प्रवाहातला मी केवळ एक बिन्दू होतो. मला कुठं जायचंय, याची काही कल्पना नव्हती.

माझ्यासमोर सावल्या विचित्र रूप धारण करून नाचू लागल्या. दिवे आकाशापर्यंत उंचावले, कुत्रे भुंकले, दुरून एक गंभीर शब्द ऐकू आला. 'सायरन'सारखा तो आवाज प्रतिक्षणी माझ्याजवळ येत होता.

मला चारही बाजूंनी घेरून लोक आरोळ्या ठोकू लागले, 'त्याला सुळावर चढवा, त्याला सुळावर चढवा.' पण मी कसाबसा सुरक्षित मरीनाला जाऊन पोचलो.

'प्रणय-मार्गा 'वरील दगडी बाकावर बसताना मी पाहिलं – दहा वाजले होते.

चंद्र क्षितिजातून वर येत होता. आकाशाखाली सर्वत्र फुलंच फुलं. निर्जन सागर-तट आणि उल्हसित करणारा पुष्पगंध घेऊन वहाणारा मंद वारा.

" शुभ्र ज्योत्स्ना, फुलकित यामिनी
फुल्लकुसुमितद्रुमदलशोभिनी "

इन दि डेझर्ट मून...

बस आली, चौकात उतरून किल्ल्याकडे जायचंय. कंडक्टरनं बस माझ्यासाठीच थांबवली आहे का ? कदाचित ! मग जाऊ या. सरोची एक कहाणी आहे. कथा कशी लिहावी ते ट्राम कंडक्टर सरो सांगतो. हा कंडक्टरही मला असंच काही सांगेल का ? तो हसतोय. कदाचित त्याच्या लक्षात आलं, ठीक ! मी तुला त्रास देत नाही. तुम्ही जे लिहिता ते सगळं मी वाचतो. तुम्ही खूप लिहा !

कंडक्टर, मी कृतज्ञ आहे.

बसमध्ये फक्त दोन व्यक्ती होत्या. एक स्त्री आणि एक पुरुष. तो तिचा पती असेल. तिने ऑरगंडीचा सुंदर ब्लाऊज घातला होता. मी तिचा चेहरा पाहू शकलो नाही; पण माझं अनुमान होतं की ती सुंदर असावी. तिचा आवाज मधुर होता, ती हलके हलके गुणगुणत होती.

द हॅपी डेज आर हिअर अगेन
स्काय क्लाउड्स आर क्लिअर अगेन.

वाऱ्याने भुरभुरणारे तिचे केस सावरीत तो तिला चिकटून बसला. कुठल्याशा विनोदावर ती हसली, पुन्हा गुणगुणली —

द हॅपी डेज आर ...

तिच्या आनंदात सारे जग भाग घेत होते.

लेव्हल क्रॉसिंगवर उतरून जड अन्त:करणाने मी किल्ल्याकडे चालू लागलो.

रात्री खोलीवर परत आलो, तेव्हा फार उशीर झाला होता.

वाऱ्याच्या झोताबरोबर पावसाचे थेंब आत आले की मला तिची आठवण येते. विजेची गाडी गेली की मला तिची आठवण येते. माझ्या शरीरातला अणूपरमाणू स्त्रीस्पर्शासाठी लालचावला होता; तेव्हा तिची भेट झाली होती, त्या मीलनाने जणू नवे जीवन दिले. सगळे सांगूनही तिच्याबद्दल कदाचित मी काहीच सांगितलं नसेल, कदाचित तिच्याबद्दल काही न सांगणंच योग्य होईल.

मी तिला पहिल्यांदा आगगाडीच्या डब्यात पाहिलं होतं, हे आठवतं. ती सुंदर

नव्हती, पण इतर युवतींत तिचं स्वतंत्र स्थान होतं. तिच्या गूढ निळ्या डोळ्यांत विषादाचं विश्व मी पाहिलं.

मी तिला तिच्या दुःखाचं कारण विचारलं नाही. अखेर मला ती 'एगमूर' मध्ये दिसली. ती 'ओव्हर ब्रिज'वरून उतरत होती आणि मी आगगाडीतून चाललो होतो. वर पहाताना तिचा जाड पाय दिसला. हत्तीपाय !

माझं हृदय गोठलं. मी नंतर तिला कधीच पाहू शकलो नाही. भेटायची इच्छा अवश्य होती. कदाचित तीही मला शोधीत असेल. परिचित स्टेशनावर जाताना उत्कंठतेने पहात असेल···

मी अपराधी आहे. त्या कथेचे हस्तलिखित छातीवर ठेवून मी निजून राहिलो. सकाळी पाहिलं तो सगळी अक्षरं लाल झाली होती.

माझं रक्त !

माझी कहाणी !!

# अंधाराचा आत्मा

— एम. टी. वासुदेवन नायर

तो भीत भीत बाहेर आला. पहिल्यांदा त्याने खोलीत पाहिले. अच्युतन नायर गाढ झोपलेला होता. त्याला शंका आली. श्वास घेताना त्याचा कंठमणी पहाताना मजा यायची. आत दबलेली सुपारी पडू पहाते. केसाळ हात आणि ठोकळ बोटे पहाताना किळस वाटते. रागही येतो.

त्या हाताने संध्याकाळी ... काल की काही दिवस आधी ?

वेलायुधनने मान फिरवली. ती अजूनही दुखत होती.

एक दिवस तो हात कापून टाकीन, पण कुणाला पत्ता लागू देता कामा नये. एक मोठा चाकू आधीपासूनच तयार ठेवला पाहिजे. केसाळ हात जमिनीवर पसरून तो निजेल, तेव्हा फक्त एक वार.

त्याला असेच करायला पाहिजे. नाही तर तो अशाच रीतीने लोकांना छळत राहील.

काल ... काल की काही दिवस आधी ?

पश्चिमेकडील ओसरीवर त्याला स्नानासाठी बसविण्यात आले. काही दिवसांपासून अच्युतन नायरच स्नान घालतो. हे वेलायुधनला पसंत नाही. दुसऱ्यांनी स्नान घालायला तो काय लहान मूल आहे ? मोठा झाला आहे. खूप मोठा झाला आहे. गोपीसारखा मोठा झाल्यावर करुतिप्परम्ब नदीच्या घाटावरही स्नान केलेले आहे. आईच स्नान घालीत होती. आता तो मोठा झाला आहे. म्हातारी आजी म्हणते, " वीस- एकवीस वर्षांचा माणूस आहे — सुकृतक्षयम् ... सुकृतक्षयम्. "

ती आपल्याविषयीच बोलत आहे, हे वेलायुधनला माहीत आहे. तरीही स्नानासाठी अच्युतन नायर हाक मारतो. तांब्याच्या तीन मोठ्या घंगाळांत त्याने पाणी भरून ठेवले आहे आणि एक पितळेचा फुटका लोटा स्नानासाठी ...

पाणी भरलेल्या घंगाळाजवळ वेलायुधनला बसविले तेव्हा त्याच्या मनात एक विचार आला. 'पश्चिमेच्या ओसरीला लागून नदी वहात असती तर कसे झाले

असते ? चटई बांधलेल्या मोठ्या नावा आणि मच्छीमारी करणारी होडगी समोरून गेली असती. त्या खोलीच्या छोटया खिडकीतून सर्व दिसलं असतं. चमकणारी मासळी सुळकन इकडं आली असती. वाटलं तर पकडताही आली असती. '

भितीजवळील नळाखाली तिन्ही घंगाळांतील पाणी उलटले.

मातीत मिळून पाणी वाहून गेले. ते पहात असतानाच अच्युतन नायरने बोलावले, " वेलायुधन ! "

बोलवीत नव्हता, ओरडत होता. वेलायुधनने भेदरून त्याच्याकडे पाहिले.

" घमेंडखोर झाला आहेस ? "

तो काही बोलला नाही. त्याचे डोळे निखाऱ्यासारखे पेटले होते. तांब्याच्या घंगाळांत तोंड लपवावे असा विचार करून ते उचलले तो एक थप्पड मिळाली.

" मला मारू नका ... मला मारू नका ... " तो मोठ्यांदा रडला.

आजी दरवाजात आली. तिच्या मागोमाग मोठी आई आणि गोपीदेखील.

आजी डोळे पुशीत म्हणाली, " ईश्वर क्षमा करणार नाही. याचं डोकं ठिकाणावर नाही, म्हणूनच असं होतं. "

" मुलाचा प्रताप पाहिला तुम्ही ? " थोरली काकी वडबडली. " मारलं अन धक्काही दिला. हा सगळा घमेंडखोरीचा परिणाम. " आजी डोळे पुसून दाटल्या गळयाने म्हणाली, " सुकृतक्षयम् ... सुकृतक्षयम् ... "

वेलायुधनने आपल्या मानेवरून हात फिरवला. अजूनही दुखत आहे.

एक धारदार चाकू अय्यप्पनजवळ आहे. संध्याकाळी मजुरी घ्यायला तो धान्याच्या गोदामात जाईल तेव्हाच चाकू उचलून घेतला पाहिजे.

कंठमणी हलवीत अच्युतन नायर झोपेल तेव्हा जोराने एकदा -- फक्त एक --.

सकाळी लोक तमाशा पहातील.

हा वेडेपणा नाही, घमेंड आहे — असे ओरडत नायर मारायला धावेल, तेव्हा कळेल की हात नाहीसा झाला आहे.

मग हात शोधीत घरभर धावेल तेव्हा हसता हसता माझ्या मुरकुंडया वळतील.

वेलायुधन हॉलजवळच्या लहान खोलीत गेला. खिडकीजवळ चटईवर झोपलेली आजी त्याला दिसली. आजीचे सगळे शरीर सुरकुतले आहे. म्हणूनच ती चांगली वाटत नाही, पण त्याला आजीचा राग नाही. कारण, ती मारीत नाही की टाकून बोलत नाही. बाकी सगळयांनी मारले आहे. गोपी आणि कुट्टिशंकरननेही. ती मुले आहेत. मुले मोठयांना मारीत नाहीत.

मोठी आई खाली नाही, हे त्याचे भाग्य. त्यांची खोली वर आहे. मोठी आई, गोपी, त्याचे वडील हे सगळे जेवून वर जातील, तेव्हा खाली यायला वेळ लागेल.

दक्षिणेकडची खोली अंधारी आहे. तिथे दुपारीही अंधार असतो. मधल्या अंगणातून थोडासा प्रकाश त्या खोलीत येतो. कोपऱ्यात धान्याची पोती आणि मोठाल्या टोपल्या ठेवल्या आहेत. त्या अंधारात एखादे भूत तर नसेल! अशी भीती त्याला वाटत होती. कदाचित मामाजीही तिथे लपून बसत असतील. तिथे असला तर नारळाचा हिरकूट्टी असेल. मामाजी मला तिथेच मारतात. त्यानेचमारणे त्यांना आवडते पण तिथे भूत असेल, तर मामाजी कसे लपतील ?

अंगणात पोचल्यावर मामाजीची आठवण आली. कारण, नारळाच्या हिरकुटाने मारायला मामाजी नेहमीच तयार असतात. एक दिवस मामाजींनाही मारले पाहिजे.

अंगणात तो दिसल्याबरोबर सगळे घर हादरून टाकणाऱ्या आवाजात ओरडतील, ' अच्युतन ... '.

मग अच्युतन लगेच धावत येईल. अंगणात येऊ नकोस, असा त्याला हुकूम आहे. तो लठ्ठ बोटांनी त्याचा हात पकडून त्याला घेऊन जाईल. त्याला त्याच्या बोटांचा तिरस्कार वाटतो. कारण, त्यांचा स्पर्श बेडकावर पाय ठेवावा तसा आहे. त्याला अंगणात मार खावा लागत नाही. आजीच्या खोलीतही मार मिळत नाही. उत्तरेकडच्या खोलीत अच्युतनचे राज्य.

दाराआड लपून बाहेर पाहिले. कोणी नाही. मामांना आणि शंकरन कुट्टीला दिसता कामा नये. दिसल्याबरोबर ओरडा करतील, " पहा पिताजी, मोठा भाऊ चाललाय."

मामींनी पाहिले तरी हेच होणार. त्या मामांना बोलवणार नाहीत. ओरडतील, " अच्युतन नायर, पहा, हा बाहेर आलाय." कधीकधी मलाही विचारतील, " आता कुठं निघालास ? "

त्याचे पांढरे डाग पडलेले ओठ पहावत नाहीत. उबग येतो. टेकडीवरून एक मोठा दगड उचलून आणायचा आहे. ती अच्युतन नायरला बोलावील, तेव्हा तो तिच्या तोंडात भरून द्यायचा आहे.

कुट्टी शंकरचे काय करायचे ?

त्याच्या टकलावर जाते ठेवून, कान पकडून चालायला सांगितले पाहिजे.

पुष्कळ दिवसांपासून अंगणातही गेलो नाही. कडक उन्हात डोळे दिपतात. ऊन उतरले की मामाजी अंगणात शतपावली करतात.

ओणम महोत्सवानिमित्त आंगण सारवून ' तृक्काकरप्पन ' देवतेच्या भोवताली

पिठाची रांगोळी काढली होती. ती अजूनही तशीच आहे.

'तृक्काकरप्पन' देवता पहायला तो अंगणापर्यंत आला असताना अच्युतन नायरने गळा पकडून धक्का दिला होता. तिथे मामाजी मोठ्या मोठ्या लोकांशी गप्पा करीत होते. त्यांनी त्याला पाहू नये, म्हणूनच त्याला धक्का मारून बाजूला ढकलले होते.

पश्चिमेच्या भिंतीशी पाण्याची बादली ठेवली आहे. अंगणातले चांदीचे कागद गोळा करून पाण्यात बुचकळण्याचा खेळ खेळावासा वाटतो. आम्रवृक्षाच्या सावलीत मोठ्या आईचा बछडा रवंथ करीत आहे.

गार सावलीत उभे झाल्याबरोबर वेलायुधनला हुशारी वाटली.

आता काय विचार आहे ?

असेच हिंडावे. अच्युतन नायर कुठे तरी झोपला असेल, मामाजी वरच्या बाजूला आहेत. चांगली संधी आहे.

दक्षिणेच्या दारापलीकडे ब्राह्मणांची घरे आहेत. तिथे जायला भीती वाटते. ब्राह्मणांच्या घरांच्या उंचवट्यावर पुल्लांनी झाडांमध्ये केस करकरा खाजवीत हडळ उभी असेल. ती उवा मारीत असेल.

भगवती ! एकदा हडळ पहावी, एवढीच इच्छा आहे. मुलांचे रक्त चोखून प्रेत विहिरीत फेकायचे, हेच हडळीचे काम. ती मोठ्यांनाही त्रास देते. तो आता मोठा झाला आहे. दरवाजातून जाताना डोके वाकवून जावे लागते. मिशाही आल्या आहेत, इतका मोठा झाला आहे. त्याने तोंडावरून हात फिरवला तिथे खाज सुटली होती.

मोठा झालो असलो तरी हडळ समोर आल्यावर काय करील ? ती वाऱ्याच्या वेगाने येते. त्या भगवतीला अजून पाहिले नाही, असेच तो मनात म्हणत होता.

अच्छा, मी एकटा असताना ती आली तर ? केळयाचा घड हातात घेऊन बचाव करीन. तो लागल्याबरोबर ती पळून जाईल. ही युक्ती कुणी सांगितली होती बरं.

खूप वर्षांपूर्वी वहिनींनी सांगितली होती. पण अजूनही आठवते. रेशमी जांघिया घालून नदीकाठी वाळू उकरताना सांगितली होती.

देवकी वहिनी आहे की आई ? आज आई नाही ? ताडाच्या झाडामागे निरुपयोगी झुडुपाखाली मातीत लाडकी आई झोपली आहे. कानतुटकी बहीण मीनाक्षीने आणि आईने 'नटप्पुरा'त बसलो असताना सांगितले होते ?

त्या नाहीतर अम्मुकुट्टी असतील. तेव्हाच एक कावळा येऊन बछड्याच्या पाठीवर बसला. कावळा चलाख आहे. त्याचा एक डोळा फुटलेला आहे. वेलायुधनला हे सगळे

माहीत आहे. लहानपणी केलेला अभ्यास – 'काळा कावळा काळी कोकिळा' हा धडाही येतो. त्याला पुष्कळ गोष्टी माहीत आहेत. पण काही करायला किंवा बोलायला गेले तर लोक म्हणतात, " डोकं फिरलंय., पूर्वजन्माचं कर्मफळ आहे." त्या बाईचे डोळे मिटले हे छानच झालं. ही सगळी दुर्गती तिला पहावी लागली नाही."

हे सगळे लोक त्याच्याविरुद्ध आहेत. त्याचा तिरस्कार करतात हे वेलायुधनला माहीत आहे. बछडयाच्या पाठीवर कावळा चोच मारीत असतानाच हलक्या आवाजात कोणी तरी हाक मारली.

" दादा ! "

प्रथम तर तो दचकला. वाटले, ' हडळ असेल. पण हडळ नावानं हाक मारीत नाही. आपण किती मूर्ख आहोत ! '

मागे वळून पाहिले तो उघडया खिडकीत अम्मुकुट्टी उभी होती. वेलायुधन मोठयांदा हसला.

अम्मुकुट्टीने हातांला मेंदी लावली होती. नारिंगी रेशमाचे वस्त्र घातले होते व लांबसडक केस मोकळे सोडले होते. तिने पुन्हा हाक मारली, –

" दादा ! "

वेलायुधनला काय बोलावे ते सुचेना. तिच्या गुलाबी गालांवर त्याची नजर खिळली.

" दादा, काय पहाता आहात ? "

" हूं ...... हूं ! "

" दादा, बाहेर हिंडू नका. "

आता त्याने हळूच नजर उचलली. रेशमी वस्त्राखाली अम्मुकुट्टीचे पोट दिसत होते. तो लाजला. अम्मुकुट्टीशी बोलताना थोडा वेळ त्याला अच्युतन नायरचा विसर पडला.

खिडकीचा गज पकडून तिच्या सुंदर बोटांना स्पर्श करायची इच्छा झाली.

" गुडघ्याला जखम कशी झाली ?"

त्याने काही उत्तर दिले नाही.

तिच्या बोटांचा घाट पिकलेल्या केळयासारखा आकर्षक होता.

" काय ? काल मार खावा लागला नं ?"

तो गप्प राहिला.

" कसला विचार करतोस ? "

अम्मुकुट्टीने चाहूल घेण्यासाठी मान वळवली.

" मामाजी येताहेत. "

वेलायुधन अजूनही विचार करीत होता. एकदा स्पर्श केला तर ? ... फक्त एकदा ? ...

" दादा, हा आजार बरा होईल. "

" हूं. "

" अच्युतन नायरचं म्हणणं ऐकलं पाहिजे. "

" हूं "

" नाही तर मार मिळेल. "

" हूं. "

" परवा रात्री का रडत होतास ?"

" हूं ... हूं ... "

अम्मुकुट्टी खिडकीजवळ उभी राहिली. हात बाहेर काढल्याचे थोडे वाईट वाटले. पाठ करून तिने कपडे नीट केले, मग खिडकीवर हात टेकवले. थोडे बरेही वाटले.

भीत भीत त्याने विचारले, " मी तुमच्या हाताला एकदा हात लावू ?"

त्याचे म्हणणे ऐकून अम्मुकुट्टीला हसू आले. तो काही बोलला की गोपी आणि शंकरनकुट्टी जसे चेष्टेच्या स्वरात हसतात, तसे अम्मुकुट्टीचे हास्य नाही. तिचे हसणे पाहून थोडे ओशाळल्यासारखे वाटले.

त्याने हळूच बोटांना स्पर्श केला. गजांतून अम्मुकुट्टी त्याचे हे वर्तन पहात होती.

" दादा, आता जा, नाही तर अच्युतन नायर येईल ... " अम्मुकुट्टी म्हणाली.

पण त्याने जागा सोडली नाही.

" लवकर जा नं ... " ती पुन्हा म्हणाली.

ती गंभीर होऊन पुन्हा म्हणाली. तो तिथेच उभा राहिला.

अखेर ती पायऱ्या चढत निघून गेली. वेलायुधन तिच्या आकृतीकडे पहात राहिला.

पश्चिमेकडील अरुंद पायऱ्यांवरून ती गुणगुणत चालली होती. तिचे विखुरलेले केस, पिवळा ब्लाऊज, पिकल्या आंब्यासारखे गाल ... ओऽहो ! अम्मुकुट्टी किती सुंदर आहे !

कपडे खाली लोंबकळत ठेवल्याचा वेलायुधनला विषाद वाटला. चिखलाने घाण

झाले आहेत. अरे, सगळ्या अंगाला माती लागली आहे. तोंडावर केसांची लव आली आहे. आता गोविंदा न्हावी आला, की त्याला म्हणायचे,

अम्मुकुट्टीचे शरीर किती स्वच्छ होते ! थोडाही कळकटपणा नाही. ती नेसलेली काळ्या काठाची साडी किती स्वच्छ होती. ती खिडकीजवळ उभी असताना तो भाग चमेली आणि केतकीच्या गंधाने भारलेला होता. वेलायुधनने आपल्या हातांचा वास घेतला. ' हाय ... हाय ... यांना तर कोंबडीच्या विष्ठेचा घाण वास येतोय. ' वास घेताना त्याला उबग आला.

अम्मुकुट्टीला स्पर्श केला, तेव्हा आपल्या हातांची घाण लागली असेल. तिला आपला तिरस्कार वाटला असेल.

मी तिला स्पर्श केला, हे मामीला कळले तर किती लोकांना मार खावा लागेल कोणास ठाऊक !

सगळ्यांची डोकी फुट्ट देत. मामाजी, अच्युतन नायर, मामी, मोठी आई, — सगळ्यांचीच. शंकरनकुट्टीचेही. सारखा चेष्टा करीत असतो. दुसरा एखादा मुलगा दिसला तर बोलावून सांगतो, " पहा. हे सगळं वेलायुधनचं वेडेपण आहे. "

त्याचेही डोके फुटले पाहिजे.

अम्मुकुट्टी थट्टेने हसत नाही. ती त्रासही देत नाही. भगवती, तिचे कल्याण होवो.

लहान रस्त्याच्या दोन्ही बाजूंना बांबूची बेटे आहेत. खाली सापाचे बीळ आहे. वेली सापासारख्या बिलगल्या आहेत. दिवसा भीतीचे कारण नाही, पण रात्री तेथे वेताळ नाचतो.

हा रस्ता त्या उंचवटयाच्या पायथ्याशी संपतो. तिथे आंब्याच्या झाडाखाली हरिजन स्त्रिया पाणी भरीत आहेत.

" छोटे मालक, कुठं जाता आहात ?"

त्याने उत्तर दिले नाही. तिला काय करायचे आहे ? कदाचित या लोकांचा विचार मामाजींशी चुगली करायचा असेल. नाहीतर अच्युतन नायरला बोलावून आणतील.

रस्त्याच्या काठावर लाल माती खोदून बनविलेल्या खड्ड्यात कोणी तरी जोराने दगड मारला, त्याने हळूहळू उंचवटा पार केला.

पाणी भरायला आलेल्या हरिजन स्त्रीने मुलाच्या डोक्याला तेल लावता लावता त्याला पाहिले. ती मैत्रिणीला म्हणाली, " त्याला बाहेर असं मोकळं का सोडतात ?

देखरेख करणारा गाढ झोपलेला दिसतोय. "

वेलायुधनने त्यांच्याकडे लक्ष दिले नाही. मागे वळून न पहाता तो उंचवटा चढू लागला. पायथ्याशी अनेक वाळलेली झुडपे आहेत. उंचवट्याला एक खडकाळ टेंगूळ आले आहे. तिथे पडलेली ताडाची फळे वेचली पाहिजेत. वेलायुधन तेवढ्यासाठीच तिथे आला होता. कड्यावर उभे राहून खाली पहाताना गंमत वाटते. चारही बाजूंना पसरलेली घरे, एका बाजूला मंदिराचा कळस आणि दुसरीकडे सुपारीचे बाग. किती मोहक आहे हे दृश्य !

पूर्वेकडे लांबवर ओसाड शेते पसरली आहेत. दुसरीकडे लाल मातीची सडक आणि मागे नदी.

रेताड जमीन पाहून वेलायुधनच्या मनात अनेक आठवणी उभ्या राहिल्या... गायींना आंघोळीला घेऊन जाणारी हरिजन मुले, काकडीची हिरवी शेते, नारळाची पांढरी पाने ओढीत पाण्यातून जाणारे, मच्छीमारीला निघालेले कोळी...

आई म्हणाली होती, " पाण्यात उतरू नकोस. तिथं मगर आहे. "

तिने हेही सांगितले होते की मगर हा भयंकर प्राणी आहे. पाण्यात उतरलेल्याला जबड्यात पकडून घेतो.

तिथे खेळावेसे वाटते. अच्युतन नायर, मामाजी आणि इतर लोकांपैकी कोणीही त्याला तिथे खेळण्याची परवानगी देणार नाही.

हो, आजी कधीकधी परवानगी द्यायला तयार होते. पण नंतर म्हणते, " तुझा आजार बरा झाल्यावर... वेलायुधन... "

नेहमीच हेच ऐकावे लागते, आजार बरा झाल्यावर.

" तुम्ही सगळे रोगट आहात. नाही, नाही, मी असं म्हणता कामा नये. "

" या सगळ्यांना काठीनं ठार केलं पाहिजे. सगळे मेले पाहिजेत. नाही, नाही – सगळे नाही – अम्मुकुट्टी सोडून, सगळे मेल्यावर फक्त आम्ही दोघं वाचावेत. पण मी एकटा कसा राहीन ? सगळीकडं भुतं असतील – अंगणात, खोलीत, गोठ्यात– सगळीकडं. आजीलाही हे सगळं माहीत आहे. आमचे पणजोबा वेताळ आहेत. "

त्यांचे नाव चत्तूमामा. ते रात्री सुनेच्या हातची कोंबडी खाल्ल्यावर पाणी पाणी करीत मेले. मांसात विष मिसळले होते. ते आक्रोश करीत राहिले, पण कोणी लक्ष दिले नाही. अजूनही अंधाऱ्या रात्री पाण्यासाठी विव्हळण्याचा आवाज ऐकू येतो. वेलायुधन आख्खी रात्र त्यांचा आवाज ऐकण्यासाठी पडल्या पडल्या कान देतो.

सगळी राख झाल्यावर देवघरात मोहरांनी भरलेला हंडा मिळेल. सोने मिळाले

तर ' ताम्नी ' टेकडीवरील झोपडीच्या ठिकाणी मोठे घर बांधता येईल, ते महाला-सारखे दिसेल. त्याच्या खिडक्या फुलांनी सजलेल्या असतील आणि भिंतीवर चित्रे असतील, सोन्याची भांडी असतील. तो महाल खूप उंच, आभाळाला भिडणारा असेल.

एक दिवस साऱ्याची राख होईल, पेटत्या लाल जिभा काढून घरंदारं गिळंकृत करणारी आग ! ती लागली की मी मोहरांनी भरलेला हंडा घेऊन त्या टेकाडाकडे पळून जाईन. जरीकाठी कपडे घालून राजकुमारासारखा चालेन. अम्मुकुट्टी पहातच राहील.

आजच आग लावून टाकू ? सगळ्यात आधी देवघराला. मामांची पहिल्यांदा राखरांगोळी झाली पाहिजे. अच्युतन नायरची नेमणूक मामाजींनीच केली आहे. ' बाहेर जाशील तर तंगडी तोडीन ' मामाजी म्हणाले होते. शंकर कुट्टीच्या पाठीवर हात ठेवल्याबद्दल मामाजींनी मला खूप ठोकले होते. अच्युतन नायरच्या हातात नारळाचे मोठमोठे तुकडे होते.

मामाजी रात्रभर तांब्याचा हंडा शोधतील, पण त्यांना तो मिळणार नाही. ताश-मामांनी घडा कुठे ठेवला, ते कोणालाच माहीत नाही. त्यांना स्वतःलाही नाही.

ही फार जुनी गोष्ट आहे. आजीने सांगितली होती. आजीच्याही आजीच्या लहानपणची गोष्ट आहे. ताशमामांनी व्यापारात खूप धन मिळविले होते. त्या काळी सोन्याच्या मोहरा चालत.

त्यांनी मोहरा हंडयात भरून तो पुरून ठेवला. हंडा कुठं आहे कुणालाच आठवत नाही. ते खोदता खोदता मेले.

अजूनही रात्री खोदण्याचा आवाज ऐकू येतो. वेलायुधन ऐकण्यासाठी एकाग्रतेने कान देईल. संध्याकाळी घरात भीती वाटते. ताशमामा खणण्यासाठी येत असतील.

बिचारा ताशमामा वेडा झाल्यामुळे सर्व गोष्टी विसरला. वेलायुधनला सगळ्या गोष्टी आठवतात. मामाजींनाही आठवतात. अम्मुकुट्टीबरोबर शाळेत गेलो होतो, हेही आठवते. पिसाळलेला कुत्रा मारल्याचा प्रसंगही आठवतो. अंगणात रक्त सांडले होते. बिचारा कुत्रा ! पिसाळलेल्या कुत्र्याला मारून मारून ठार करतात. सगळ्या शेतावर पाखरे उडू लागली होती. त्याला भीती वाटली होती. कापणीला आलेल्या शेतात तो लपला होता. त्या दिवशी अम्मुकुट्टीही सोबत होती. एक लहान मुलगीही होती, पण ती दिसायला चांगली नव्हती.

सगळ्या घटना त्याच्या लक्षात आहेत. म्हणूनच त्याच्यात वेडेपणा नाही, तो वेडा नाही.

तरीही गोपी, शंकरनकुट्टी आणि शेजारची मालू म्हणते, " तो वेडा आहे. "

त्यांच्या आईवडिलांना मारलं पाहिजे. खोटं बोलून माणसांना त्रास देतात त्या सगळ्यांना मारलं पाहिजे. एक धारदार चाकू पाहिजे.

झाडांतून डोके काढीत एक काळी बकरी बें ... बें ... करीत आहे. बकरीच आहे का ?– वेलायुधन दचकला. मग निरखून पाहिले तर बकरी गायब. हडळ बकरीचे रूप घेऊन लपली असेल; त्याने भिऊन चारही बाजूंना पाहिले. चमकत्या प्रकाशात काळे काळे काहीतरी एकत्र येताना दिसले. जवळचा काळ्या दगडांचा ढीग हलून उठताना दिसतो. उन्हे उतरली आहेत आणि आता अंधार दाटत आहे. अंधारात आग खाणारा वेताळ रहातो. तो विवश होऊन डोळे मिटून उभा राहिला. तेव्हाच अंधारातून आवाज ऐकू आला — ' वेलायुधन ! ' एक खरखरित हात त्याच्या खांद्यावर पडला.

" मला मारू नका ... मला मारू नका. "

" वेलायुधन ! "

" मला मारू नका ... मला मारू नका. "

डोळे बंद करून अंधारात तो रडत रडत पळाला.

" मला मारू नका ... मला मारू नका. "

२

डोळ्यांपुढील अंधार दूर झाला तेव्हा बाहेर केळीच्या झाडांत प्रकाश पसरत होता.

खोलीत अंधार आहे. चटई अंथरून आरामात बसला. डोके दुखू लागले तेव्हा भिंतीला पाठ टेकवली. चारही बाजूंना सामसूम आहे. बाहेर उजेडात काळेकाळे आकार इकडेतिकडे हलत आहेत, पण आपण खोलीत असल्यामुळे भिण्याचे कारण नाही. छोटी खिडकी आहे. तीतून वेताळ आत येऊ शकत नाही.

पोपयांच्या पानांतून आकाशाचा तुकडा दिसतो. तारे सुंदर फुलझडीसारखे दिसत होते. पहाता पहाता ते सगळे तारे काळे झाले. तारेही काळे असतात का ?

गुडघ्यांत डोके ठेवून बसलो. डोळे बंद केले की त्यांतून काळे आणि लाल गोळे निघताना दिसतात. प्रकाशाची वाट पहात खोलीत बसलो होतो.

दिवस उजाडला की केळयाच्या झाडांतील हे काळे काळे आकार नाहीसे होतील.

अच्युतन नायर दिसला की संताप अनावर होतो. दरवाजा बाहेरून बंद आहे. पूर्वी असे करीत नसत.

" दरवाजा उघडा ! " त्याने जोरात हाक मारली.

उत्तर नाही.

तो पुन्हा ओरडला, " दरवाजा उघडा. " या वेळीही उत्तर नाही. शेवटी त्याने दरवाजावर लाथ मारली.

दरवाजा तुटून खाली पडला.

बाहेर अच्युतन नायर आणि मामाजी दिसले. दोघांना एकत्र पाहून भीती वाटली. एकाने पकडले व दुसरा मारू लागला. काय आहे त्यांच्या मनांत !

आता त्याच्याजवळ एक चाकू आहे. एकाच घावात दोघांचे डोके साफ. आपली डोकी सांभाळून ठेवा म्हणावे. अच्युतन नायर आणि मामाजी मागायला येतील, तेव्हाही तो देणार नाही !

तो खाली पहात उभा राहिला.

मामाजी म्हणाले, " अरे ! तू माझ्या हातचा मार खाऊ नकोस. "

अच्युतन नायर छाती खाजवीत म्हणाला, " घमेंडीने वागतो. हड्डी नरम करीन, लक्षात ठेव. जरा बाहेर तर जाऊन पहा, नाही धडा शिकवला तर ..."

" तोंड बंद ठेव. " मामाजी म्हणाले, " जरा बोललास तर पोलिसात देईन."

तेव्हा वेलायुधनने मनात विचार केला की पोलिसाचेही डोके उडवायचे आहे.

चाकू मिळाला तर तो हे करून दाखवीलच, तो आता बडबडू लागला. थोड्या अंतरावर उभे राहून मामाजी अच्युतन नायरला म्हणाले, " आता तर सगळ्या लोकांना त्रास देऊ लागलाय. "

" हे सगळं ढोंग आहे, ढोंग. " वेलायुधनकडे डोळे वटारून पहात अच्युतन नायर म्हणाला.

" बदमाशी करशील तर टाळकं फोडीन. " मामाजी म्हणाले, " याला बंद करून ठेवणंच योग्य. "

अच्युतन नायर दार बंद करून परत गेला.

दार बंदच राहील. सकाळी आणि संध्याकाळी अच्युतन नायर थोडा वेळ फिरवायला घेऊन जाईल. तो खांद्यावर हात ठेवून वेलायुधनबरोबर चालतो. हे वेलायुधनला मुळीच पसंत नाही.

त्याच्या खोलीत फक्त तोच येतो. कधीकधी दाराजवळ आजीचा आवाज ऐकू येतो — " सुकृतक्षयम् ... सुकृतक्षयम् "

दिवसा पश्चिमेकडील खिडकीत बसायला वेलायुधनला आवडते. तिथून पोपईची

झाडे, केळघांचे बाग आणि बकऱ्या बांधायची जागा दिसते. पोपईच्या सावलीत गोपीशंकर आणि शेजारची मुले खेळतात. ते कधीकधी खिडकीजवळ येऊन दात विचकून पळून जातात.

एके दिवशी शंकरकुट्टीने पाठीवर ढेकूळ मारले होते. दुसऱ्या दिवशी वेलायुधनने बदला घेतला.

बाहेर कुठे तरी काश्याचे भांडे दगडावर आदळून पडले. तो नाद छान वाटला. मग लहान मुलाच्या रडण्याचा आवाज ऐकू आला. थोड्या वेळाने दार उघडून अच्युतन नायर आला आणि म्हणाला, " मुलांना त्रास देशील तर तुझ्या फासळ्या काढीन. "

वेलायुधनने विचार केला, " एक लांब चाकू मिळाला तर ! "

" बदमाशी करशील ? पोलिसात जायचंय का ? "

" मी अच्युतन नायरचं डोकं उडवीन. "

" अरे ! " तो बडबडला, " काय म्हणालास ? "

तो पुन्हा म्हणाला, " मी डोकं उडवीन. "

अच्युतन नायरने हात उगारला तर त्याला रडू कोसळले, " मला मारू नका ... मला मारू नका ... "

" तुला गप्प बसायला सांगितलं होतं नं ? "

" मला मारू नका ... मला मारू नका. " बाहेरून आजी म्हणतच होती, " सुकृत्क्षयम् ... सुकृत्क्षयम् ... "

अच्युतन नायर गेल्यावर तो खिडकीजवळ जाऊन बसला.

बाहेर पानातून काळे काळे आकार जात येत आहेत, असा भास झाला.

अंधार पडेपर्यंत भ्यायचे कारण नाही.

अंधारात खिडकीतून आला तर ? आग खाणारा वेताळ, केस पिंजारलेली हडळ ... तर मग ...

रात्र आणि अंधार यांचा त्याला तिरस्कार वाटतो. भितीला टेकून रात्रभर लक्ष ठेवतो. कुऱ्हाड पडल्याचा आवाज ऐकू येतो ? दरवाजातून कोणी ताहानेला पाणी तर मागत नाही ?

धुळीने माखलेल्या छातीवर अश्रू टपटपतात. किती दुःख आहे ! बाहेरचे दिसत नाही. ऊन कमी होत आहे. अंधार पसरत आहे,

आग खाणाऱ्या वेताळाला सांभाळणारा अंधार ...

भिंतीकडे तोंड वळवून उभा राहिला. वळून पाहिल्यावर भीती वाटते. कारण, खिडकीबाहेर कोणी तरी दिसते.

मान वळवून हळूच एकदा पाहिले. भीती वाटली. केस मोकळे आहेत. तोंडात जाळ आहे का ? छम छम असा आवाज, कदाचित पायात पैंजण ...

" दादा ... " एक मृदू स्वर ऐकू आला. भिऊन त्याने आपले तोंड जमिनीला टेकवले.

" दादा, ही तर मी आहे ! "

वेदना आणि भीती एकदम बोलली, " मला मारू नका ... मला मारू नका. "

ती खिडकी पानांच्या चटईने बंद केली.

आता पानांतून येणारा प्रकाश अंधाराला छिद्रे पाडीत आहे.

खूप दिवस गेल्यावरच खोलीतल्या अंधाराची भीती नाहीशी झाली. चारही कोपऱ्यांत लपून बसलेले काळे आकार त्याचे सोबती बनले. ते त्याच्या कानांत हजारो गोष्टी सांगत. त्यालाही सांगायचे आहे की एक दिवस ताश मामांनी पुरलेला सोन्याचा हंडा घेऊन जायचे आहे ... तान्नी टेकडीवर महाल बनवीन. त्याच्या सातव्या मजल्यावर बसून नदी अन नाव पहात जाईन !

नारळाच्या पानांतून दोन डोळे दिसतात. बाहेरून कोणीतरी डोकावते. पुष्कळ आवाज ऐकू येतात.

" बीरान कुट्टीचं भाग्य ... "

" ती हे दुःख न पहाताच गेली. किती चांगलं झालं. "

भिंतीवर मोहरांसारखे कोसळणारे सोनेरी किरण पहात राहील. वर अंधारात लपून बसलेल्या मित्रांना बरेच काही सांगेल.

... एकदा अच्युतन नायर ताटात भात घेऊन आला, दरवाजा उघडताच त्याने पुढ्यात उडी मारली. नायर ताट बाहेर ठेवून, दरवाजा बंद करून गेला. परतला तेव्हा हातात एक मोठी छडी होती.

" पुन्हा असं करशील ? " त्याने विचारले. त्याच वेळी वेलायुधने छडी पाहिली.

" मी तुला किती वेळा सांगितलंय की परसाकडला जाताना मला हाक मार. "

पहिली छडी खांद्यावर लागली; पण नेहमीसारखा वेलायुधन त्या दिवशी रडला नाही. संतापाने त्याचे मन आणि डोळे जळत होते.

" असा पहातोय की जणू जाळून टाकील. "

पुन्हा मार बसला.

" पुन्हा करशील ! तुझं वेडेपण आता दुरुस्त करतो. " नायर म्हणत राहयचा, मारीत राहयचा.

" पुन्हा करशील असं ? "

आवाज ऐकून दाराशी आजी आली व नंतर मोठी आईदेखील.

आजी दाटल्या कंठाने म्हणाली,' ' अच्युतन मारू नकोस. ईश्वर तुला क्षमा करणार नाही. "

" हे सगळं ढोंग आहे, आजी. "

आजीने ' सुकृत्क्षयम् ' ची पुनरुक्ती केली.

" माराहून चांगलं दुसरं औषध नाही. "

आतापर्यंत मामाजीही आले. दाराजवळ येताच त्यांनी नाक झाकून घेतले. अच्युतन नायर स्पष्ट शब्दांत म्हणाला, " सकाळसंध्याकाळ वेलायुधनला बाहेर घेऊन जातो. तरीही हा खोली घाण करतो. "

" खोलीतही बंद करता येत नाही ? "

" मी काय सांगणार ? "

" तसं असेल, तर घरात कसं ठेवायचं ? इतक्या घाणीत काही खाता कसं येईल ? "

" उत्तरेकडच्या छोटया खोलीत ठेवलं तर ? " मामाजींनी विचारले.

" तिला सोयीचा दरवाजा नाही अन तिथंही घाण केली तर ? शिवाय ती खोली स्वयंपाकघराजवळ आहे. "

अच्युतन नायर चुगली केल्यासारखे बोलला.

चिपड आलेल्या व मिचमिचणाऱ्या डोळयांच्या आजीनेही हे संभाषण ऐकले. डोळे पुशीत ' सुकृत्क्षयम् ... सुकृत्क्षयम् ' म्हणू लागली. " हे सगळं पहायला मी का जिवंत राहिले ? "

तिच्या बोलण्याकडे कोणीच लक्ष दिले नाही. ती लटलटा कापत निघून गेली.

त्या दिवशी वेलायुधनने भात खाल्ला नाही. मामाजी आणि अच्युतन नायर यांच्या संभाषणाने तो भडकला होता, ' त्यांनी मला मारायचा निश्चय केलाय. भातात नक्की विष असेल. ताशमामांनाही कोंबडीत विष मिसळून खायाला दिलं होतं नं ?'

वेदनेने सगळे शरीर कापत होते.

लोखंडाच्या ताटातील भात जमिनीवर फेकला. अरेरे ... सगळी जमीन घाण झाली. ... हे केव्हा झाले ? त्याला ओकारी होऊ लागली.

पानांनी झाकलेल्या खिडकीतून आवाज दिला. एक चाकू मिळाला तर ... अच्युतन् नायर खिडकीमागे उभा राहून पहात आहे. मारायची संधी पहात आहे.

नारळाच्या पानांतून डोकावणारे दोन डोळे.

भितीजवळ उभे राहून भ्यालेल्या आवाजात तो म्हणाला, " असं करणार नाही ... असं करणार नाही ... मला मारू नका. "

" दादा ... " बाहेरून कोणाचा तरी स्निग्ध आवाज आला.

" कोण आहे ? "

" ही मी आहे दादा, अम्मुकुट्टी "

" अम्मुकुट्टी ... अ ... अ ... अ " त्याला मजा वाटली.

" दादा ! "

त्याबरोबरच रडण्याचाही आवाज. त्याने रडण्याचे अनुकरण केले आणि मग थरकाप उडाल्यासारखे ओरडला.

मृदू स्वरात पुन्हा तोच आवाज ऐकू आला.

खिडकी पकडून उभा राहिला. मग म्हणाला, ' मी डोकं कापीन. "

नाही ! पुन्हा आवाज आला नाही. वातावरण शांत झाले. लोक उगीच सतावतात. ... खिडकी पकडून बराच वेळ उभा होता. पानांमधून मंद झुळूक आत येत होती. शीतल हवेमुळे दुखणाऱ्या खांद्याला आणि गळ्याला तेवढेच बरे वाटले.

कुणी हाक मारली होती बरं ? ... काय काय ऐकलं ? काही समजत नाही.... आठवत नाही. ... तो जणू अंधारात हरवलेली वस्तू शोधीत होता.

त्याला असे वाटले की त्याच आवाजाच्या लाटा पुन्हा कानांवर येत आहेत.

" दादा ! "

... खरे आहे ! तो दचकला, त्याचे डोळे भरून आले.

३

वेलायुधन फुटक्या खापराचा तुकडा हातात घेऊन जमिनीवर पायऱ्यांचे चित्र काढीत बसला होता.

अंधाराच्या रेषा डोळ्याआड होत आहेत. आता कुठे आहेत ?

चारही बाजूंना डोळे फिरवले. दक्षिणेकडील खोलीत पडलोय. उठून उभे राहिले, तर डोके जड वाटते. पाय दुखतात. हलताना पायांतून एक आवाज आला. पाहिले तर पायात साखळी बांधलेली होती. वाकून बसला आणि साखळी काळजीपूर्वक पाहू

लागला. तिचे दुसरे टोक लाकडी खुंट्याला छिद्र करून बांधले आहे. साखळी घासल्यामुळे पाय सोलले गेले आहेत व ती जागा लाल झाली आहे. कुणी बांधली पायात साखळी ?

वेलायुधन विचार करू लागला, " या खोलीत केव्हा आलो ? असं कुणी केलं ? सगळे अशीच माझी चेष्टा करतात. "

सगळी जमीन धुळीने भरली आहे. भोवताली किती घाण आहे !

वेलायुधन आठवू लागला. नीटसे काही आठवत नाही. जुन्या घटना धुक्यात हरवल्या आहेत. त्यातून एक प्रश्न वारंवार घुमतो. माणसानाही साखळी बांधतात? कुत्र्यासारखी ... आजारी होतो, म्हणूनच या लहान खोलीत ठेवले असेल; पण माणसाला साखळी बांधतात का ? – कुत्र्यासारखी ... ?

बाहेर संध्याकाळची निस्तेज किरणे आहेत. अंगणातल्या केळयाच्या झाडाचे दूध खार पीत आहे. पानांची सुरळी ती दातांनी उलगडते. एका पानातून दुसऱ्या पानात ... मग तिथून दुसऱ्या केळयावर ...

स्वयंपाकघरातून आवाज येत आहेत. कुणी बाहेर आले तर ? ... कदाचित मी आजारी असल्यामुळे त्यांनी मला या खोलीत ठेवले आहे. बाहेरचा कुणी आला तर मांगता येईल की मला कसलेच आजारपण नाही ... आता आजारपण संपले आहे, पायांतली साखळी काढा ... माणसांनाही कधी साखळी बांधतात का ?

स्वयपाकघराची खिडकी उघडून कोणीतरी विहिरीतून पाणी काढीत आहे. बादलीत पाणी टाकल्याचा आवाज येत आहे.

" मोठी आई ... मोठी आई. "

उत्तर आले नाही.

कुणाला बोलवू ? सगळी माणसे कशी विचित्र आहेत ? मला आता काही नाही... काही नाही.

घाणेरडे शरीर आणि कळकट कपडे यांची त्याला किळस आली. शरीर निरखून पाहिल्यावर त्याला शरम वाटली. कमरेखाली कपडा नाही, हाय ... कोणी पाहिले तर काय सांगायचं ? बिन-कपड्याचं कोणी पाहू नये. तो काय लहान मूल आहे, मोठा झालाय. दाट दाढी वाढल्याने गळा खाजवतो. मग बिना कपड्यांनी ...

वेलायुधन मान वाकवून बसला. 'एक कपडा हवा. कुणाला बोलवावं ? मोठ्या आईला ?... नको.' त्याने गोपीला बोलावले. जोरजोराने पुन्हा हाका मारल्या.

" कपडे घालण्यापूर्वी कुणी खोलीत न येवो. " – कोणीतरी खोलीजवळ येऊन

विचारले. " काय आहे ? "

" इकडे येऊ नका. गोपी कुठाय ? "

" मी गोपीच आहे. "

गोपीने लाल काठांची चड्डी आणि सदरा घातला होता. हुशार झाला आहे.

" मला कशाला हाक मारली ? "

" मला एक कपडा हवाय. "

" फाडायला नं ? उं – हूं – "

" नाही फाडणार, गोपी, लवकर आण,... कुणी यायच्या आधी... "

गोपी बुचकळ्यात पडला.

" शहाणा मुलगा आहेस नं – लवकर आण... " गोपी एक चांगला कपडा घेऊन आला, वेलायुधन खूष झाला. एकदम स्वच्छ होता –

" फाडशील ? "

" फाडीन ! कशाला ? "

" फाडायला नाही देणार. "

" इकडं दे, गोपी ... कुणी पाहिलं तर – "

गोपीने कपडा दुरून फेकला.

वेलायुधनला कपडा मिळाल्याने अपार संतोष झाला. आता कोणी आले तरी हरकत नाही.

" माझ्या पायांना साखळी कुणी अडकवली ? "

गोपीने काहीच उत्तर दिले नाही.

" ती सोडायला कुठं ... "

गोपी थोडा हसला.

" अरे ही सोडून द्या, मी काय कुत्रं आहे ? "

गोपी परतला.

" ही साखळी सोडायला कुणी नाही. "

त्याने आजीला हाक मारली मग मोठ्या आईला हाक मारली, पण कोणी आले नाही, कोणी ऐकले नाही, कोणाच्या तरी खडावांचा 'खट् खट्' आवाज दुरून आला, थोड्या वेळाने मामाजी खोलीजवळ येऊन उभे राहिले.

वेलायुधन आदरपूर्वक उठून उभा राहिला. मामाजींपुढे तो बसू शकत नाही.

" काय आहे रे ? "

त्याने या प्रश्नाचे काहीच उत्तर दिले नाही.

" हूं ? "

" हे जरा उघडा... "

" लोकांच्या अंगावर चढायला ? "

" मला साखळीनं कशाला बांधलंय ? "

तुझ्या घमेंडीपणामुळं आणि वेड्यासारख्या वागण्यामुळं. तुझा वेडेपणा काही कमी होतो का – जरा पाहू या– "

मामाजी खट्खट् करीत निघून गेले. वेलायुधनने विचार केला, ' त्यानं कोणती घमेंड दाखवली ? आराम नव्हता... आता काही नाही ... काहीच नाही. '

आपल्याशीच मोठ्याने बोलण्याची सवय त्याला जडली आहे.

" मला काही झालं नाही, मी वेडा नाही... "

साखळीमुळे तो फार हैराण झाला, ही सोडायला कोणीच येणार नाही ? तो गळा काढून रडू लागला. कोणी येणार नाही ? नाही येणार ?

असहाय होऊन तो बाहेर पाहू लागला. दूर चिंचेच्या पानांतून निळे आकाश दिसत आहे. लाल-काळ्या रंगाचा ढग तिथे पसरला आहे. कपाळाचा घाम पुसून त्याने हातांनी पाय दाबले. साखळी खणखणली.

रडे आवरून तो काही आठवू लागला. कसकसे वागले आहेत लोक त्याच्याशी ?

मी आजारी होतो, असे सगळे म्हणायचे... ' पण आता मला काही झालं नाही, काही नाही... मला मोकळं करा. '

उधई लागलेल्या जुन्या खांबाला टेकून तो बसला. थोड्या वेळापूर्वी अंगावर कपडाही नव्हता. न जाणे कोणी कोणी पाहिले असेल ?

अम्मुकुट्टी–

अम्मुकुट्टीला एकदा पाहिले तर ?

तिला किळस वाटेल. माझ्या शरीरावर धुळीची पुटं जमली आहेत. एकदा तिचा चेहरा दिसला तर... दाढीही फार वाढलीय.

अम्मुकुट्टीच्या शरीरावर मळ अजिबात नाही. तिच्याजवळ बसले की तेलाचा आणि फुलांचा सुगंध येतो.

ती पहाते तेव्हा...

अम्मुकुट्टीची आठवण झाली की एक रहस्यमय स्मृती जागृत होते. कुणाला माहीत नाही, कुणाला सांगणारही नाही. आंब्याच्या झाडाखाली आम्ही दोघं एकत्र

आंबा पडण्याची वाट पहात होतो तेव्हा...

मी तिच्या गालावर हलकीशी चापट मारली होती. तेव्हा ती रागावून मला ओरबाडू लागली.

तेव्हा आम्ही लहान होतो. फार जुनी गोष्ट आहे. आता किती मोठे झालो आहोत !

त्यानंतर कशाचे काय झाले ? पुष्कळ गोष्टी अस्पष्ट आहेत. एक बंद दरवाजा, केळयाच्या पानांनी झाकलेली खिडकी, त्या अंधारात न जाणे काय काय घटना घडल्या. ही साखळी माझ्या पायांना केव्हा बांधली ?

" दादाचा आजार बरा होईल. " तो गोड आवाज अजून घुमतो. त्याला आजार होता--असे लोक म्हणत. सगळे लोक असेच म्हणाले होते--भगवती, हे सगळं खरं आहे का ? तिचं म्हणणं खरं आहे ?

गुडघ्यात डोके लपवून खूप रडला. साखळी काचणारी जागा खूप दुखत होती. पण आनंद याचा आहे की आजार बरा झाला.

" मला काही झालं नाही. मला कुठलाच आजार नाही--"

तो जोरजोराने किंचाळू लागला. " मला मोकळं करा ... ही साखळी तोडून टाका..."

कोणी आले नाही. किंचाळयाही कोणी ऐकत नाही ! माणसाला साखळी बांधीत नाहीत. मी काही पिसाळलेलं कुत्रं नाही. " मला सोडून द्या...सोडा मला..."

तो पडवीकडे आशाळभूतपणाने पाहू लागला.

बाहेरून कोणीतरी डोकावत होते. तो शंकरनकुट्टी आहे का ? हो, तोच आहे.

" शंकरनकुट्टी ? "

तो समोर आला.

" शंकरनकुट्टी जरा जवळ ये. "

त्याने नुसते डोके हलवले.

" जवळ ये नं. एक विचारायचंय. "

" मार खायला ?"

" नाही, शंकरनकुट्टी मी मारणार नाही. " त्याचा गळा दाटून आला.

शंकरनकुट्टीला तरीही शंका वाटली.

मी काही करणार नाही, भैया !"

भीत भीत शंकरनकुट्टी थोडा समोर आला आणि म्हणाला, " तिथं यायची मनाई आहे. "

" मनाई कुणी केली ? "

" वडिलांनी—"

" शंकरनकुट्टी माझ्या पायांत साखळी कुणी बांधली ? "

शंकरनकुट्टी वेलायुधनकडे भीत भीत पहात होता.

" कुणी ? "

" वडील म्हणाले म्हणून लोहारानं. "

" ही जरा सोडून दे. "

" मी नाही सोडणार. "

" शंकरनकुट्टी मला काही झालं नाही. जरा उघडून दे. "

" उं...हू. "

रडू आवरण्याचा प्रयत्न करीत वेलायुधन म्हणाला, " नाही, मी वेडा नाही. शंकरनकुट्टी......ही कोण सोडील ? आजी आली असती तर तिनं लगेच उघडून दिली असती. " त्याचे म्हणणे तिलाच समजते – अम्मुकुट्टी आली तर...

" शंकरनकुट्टी, आजीला बोलावून आणशील ?"

शंकरनकुट्टी टाळ्या पिटून हसू लागला.

" जरा बोलाव नं ! "

" वेलायुधन वेडा आहेस. आजी तर मेली. "

हे ऐकून वेलायुधन दुःखी झाला. ती बातमी त्याला व्यथित करून गेली. या अंधारात त्याची पर्वा न करता किती घटना घडल्या ! किती दिवस ? किती महिने ?

साखळी पुन्हा खणखणली.

" ही कोण सोडील ? कुणी ऐकतच नाही...कुणी ऐकत नाही..."तो आपल्याशीच बडबडला.

" शंकरनकुटी, जरा ताईला चुपचाप इकडं बोलाव. "

अम्मुकुट्टीला सांगितले तर कदाचित ती समजू शकेल की माझा आजार आता राहिला नाही.

" ताई, मामाजी अन सगळे लोक गेले आहेत. "

शंकरनकुट्टीच्या चेहऱ्यावर थट्टेपेक्षा सहानुभूती अधिक होती.

" केव्हा गेले ? "

" काही दिवस झाले. मीही गेलो होतो. काल पिताजींबरोबर परत आलो."

" केव्हा येतील ? "

" आता नाही येणार. "

" का ? "

" येत्या महिन्यात ताईचं लग्न आहे नं ?"

वेलायुधन मग काही बोलला नाही.

काहीच माहीत नाही. आजारपण होते. नेहमी बंद रहाणारा दरवाजा. नारळाच्या पानांनी झाकलेली खिडकी. केसाळ खरखरित हात अन...

" दादा बरे होतील..."

तिला आता भेटायचे होते. अम्मुकुट्टी, मी आता बरा झालो...तिला माहीत नाही. आता कधीच येणार नाही.

लोखंडाच्या ताटात भात-भाजी घेऊन एक बाई आली. थोड्या अंतरावरूनच तिने ते ताट त्याच्या दिशेने सारले. तिचे दात मोठे मोठे होते, वक्षावर वस्त्र नव्हते. ती कोण आहे ते वेलायुधनला माहीत नव्हते. तरीही म्हणाला, " ही साखळी जरा उघडून दे--" भेवडावणाऱ्या दृष्टीने त्याच्याकडे पहात म्हणाली, " तुझं डोकं फिरलंय, ते ठीक झाल्यावर. "

" मला—मला काही झालं नाही. मला सोडा. "

बाहेर निघालेल्या दातांच्या फटीतून थुंकून ती निघून गेली.

आतून कोलाहल ऐकू आला. मोठ्या आईचा आवाज. ती गोपीला दाटीत आहे.

" तो चांगला कपडा त्याला कशाला दिलास ? तो फाडून फेकणार नाही ? "

" मला फक्त तोच दिसला. "

" तुला आता काय म्हणू ? वेलायुधनच नाही, तूही वेडा झाला आहेस..."

" मोठी आई ! मी वेडा नाही. " असे म्हणण्याची इच्छा वेलायुधनला झाली.

भूक लागली आहे. ताट थोडे चिवडले. अंधार केळयाच्या बागेतून निघून येत होता. खुरपे आणि दांडा घेऊन कोणीतरी केळयाच्या झाडांतून चालले होते. खुरप्याच्या टोकाशिवाय दृष्टीला काही पडत नाही.

पहाता पहाता तो खुरप्याने एक केळफूल कापतो आणि आतला मध चोखतो. अम्मुकुट्टीला मध आवडत नाही. तिला केळफुलाचा गाभा आवडतो. तक्केकाट्ट जानकीलाही तोच आवडतो. तशी कळी मिळाली तर त्या दोघी भांडतात.

" पानं टाकून पाहू या. "

" मी टाकतो. "

" नाही, दादाला टाकू द्या. "

तो तुळशीची पाने तोडून विचारतो, " वरचं की खालचं ? "

पान पडेपर्यंत अम्मुकुट्टी गप्प राहील. जशी काही भगवतीची प्रार्थना करीत आहे !

आता अम्मुकुट्टी कुठे गेली ? का गेली ? लहानपणापासून तर इथेच होती.

मी मामाजीबरोबर मामीकडे गेलो होतो. तिथे वेगळ्याच जातीची खूप झाडे आहेत. रस्त्यावरही रोपटी उगवलेली असतात. त्यांचे घर कालव्याजवळ आहे. आठवण्याचा प्रयत्न केला की त्याला डोळ्यांसमोर आरशातली प्रतिबिंबे आणि भिंतीवर टांगलेली हरणांची शिंगे दिसतात. आता अम्मुकुट्टी तिथे काय करीत असेल ?

स्नानानंतर अंगणाच्या दक्षिणेकडे ती केस विंचरीत असेल, आता येणार नाही ? अम्मुकुट्टीला एकदा पहाता आले असते तर ?...लग्न झाल्यावर ती इथे कधी येणार नाही. एकदा पहाता आले असते तर !...

वेलायुधन भिंतीवर पाठ रगडू लागला. पायातली साखळी खळखळली. ही सुटली तर कोठडीबाहेर जाता येईल. साखळी ओढल्यावर बोटे कापली. ही सुटणार नाही ? कोणीच येऊन सोडणार नाही का ?...

मोठी आई बकरी बांधायला कोठडीजवळून गेली. तिने इकडे पाहिलेही नाही.

पडवीत बसून गोपी आणि शंकरनकुट्टी रामनामाचा जप करीत होते.

मोठाल्या दातांची बाई ताट परत न्यायला आली. साखळी थोडीशी उघडावी म्हणून तिची वारंवार विनवणी केली.

" जरा ही सोडून दे नं ?"

" लोकांच्या पाठीवर बसायला ?"

डबडबलेले डोळे पुशीत तो आकाशाकडे पाहू लागला. भिजलेल्या चमकत्या माणकासारखा रंग, जिकडे पहावे तिकडे काळिमाच काळिमा. फक्त एक चमकता तारा. त्यानेच खोली भरल्यासारखी दिसते.

रामनामानंतर ते रामायण वाचू लागले. हा मामाजीचा आवाज. त्याच्या कोठडीकडे उत्तरेकडून प्रकाश आला.

आत दिवा जळत आहे. स्वयंपाकघरातून भांड्यांचा खणखणाट ऐकू येतो. त्यांच्यातले कोणी आता इकडे येणार नाही अंधारात. तो हळूच म्हणाला, " मला सोडा...मला सोडून द्या..."

" शेजारी कूणी नाही? ही बेडी थोडीशी उघडून द्या नं ?" तो जोराने ओरडला. " आई. आई..."

ओसरीवर एक दिवा दिसला. सोबतच एक आवाज आला–"वेलायुधन !"

" मला सोडून द्या...मला सोडून द्या..."

" चुपचाप पडून रहा, नाही तर हाडं मोडून ठेवीन." दिव्याचा प्रकाश पुन्हा अदृश्य झाला.

घरातले आवाज थांबले आहेत. अंगणातल्या अंधारात कोणीही असो, त्याचा मृत्यू आहे. चावऱ्या कुत्र्याला साखळीने बांधून ठेवतात; पण माणसाला...साखळी थोडी सोडून द्या नं...एक कडी तुटली तर छान होईल.

विक्षिप्त आहेत. ते सगळे विक्षिप्त आहेत. नाही तर उगीच इतके का सतावतात ?

" मला काही झालं नाही...मी वेडा नाही."

त्याने जोराने साखळी ओढली. हाताला कळ आली तरी ओढीत राहिला.

छाती धडधडू लागली. जीव गुदमरला तेव्हा तो डोळे बंद करून झोपला. डोळे उघडल्यावर कळले की तो स्वप्न पहात होता! माणिकमोती मिळणाऱ्या राजाची कहाणी. लहानपणी आजी कुशीत घेऊन सांगत असे. एका राक्षसाने राजकुमाराला सरोवराच्या मधोमध महालात साखळीने जखडून ठेवले होते. ती साखळी कापली जायची नाही आणि विस्तवामुळे वितळायची नाही. फार मजबूत होती. आई झिलप्या वेचायला आली. तिने मंतरलेला चाकू दिला. तो दिसताच साखळी तुटली. पांढऱ्या शुभ्र घोड्यावर बसून राजकुमार आणि राजकुमारी सातव्या मजल्यावर पोहोचले...

डोळे उघडले तो महाल नव्हता, नव्हते माणिक-मोती, पांढरा शुभ्र घोडाही नव्हता. कोठडीत चांदणे डोकावत होते, अंगणात सावली चित्रे काढीत होती. तो विचार करू लागला, 'आता मी कुठं आहे ?' हलल्याबरोबर साखळी खणखणली.

संतापाच्या भरात साखळी पकडून भिंतीशी पाय रोवून जोराने ओढली. एक कडी तुटली तर चांगले––एक कडी––एकदा पुन्हा जोराने...

अरे......

तो मागल्या बाजूला घसरला. बेडी तुटली.

उठला तेव्हा सगळे शरीर ठणकत होते. लंगडत अंगणात पळाला. एक एक पाऊल टाकताना अडखळायचे आणि साखळीचा खणखण आवाज यायचा.

पायऱ्या उतरून फाटक उघडले आणि तो बाहेर आला.

समोर शेते आहेत. त्यातल्या पाऊल वाटेने जाताना त्याने विचार केला, 'कुठं जायचं ?'

कोठडीबाहेर आत्ताच पडायला हवे होते. सकाळी त्या लोकांसमोर निघालो, तर पुन्हा बेडी...

कुठेही निघून जावे--

हवेत डोलणाऱ्या नारळाच्या पानांच्या लयीवर साखळीचा आवाज झाला. मग एका कुत्र्याचे आर्त केकाटणे ऐकू आले. वेलायुधनने विचार केला-- 'साखळीने जखडलेला कुत्रा असावा.

वर काळे आकाश होते; पण चांदण्यात पाऊलवाट दिसत होती.

नि:शब्द वातावरणात फक्त साखळीची खळखळ ऐकू येत होती. शेते सडकेपर्यंत पसरलेली आहेत, केतकीच्या बनातून मार्ग काढीत तो सडकेवर आला. इथून पुढे सडक नदीकाठाने गेली आहे.

सकाळी ते पहातील तेव्हा हा वेलायुधन नामक कुत्रा साखळीच्या बंधनातून मुक्त झालेला असेल. त्याला यावर जोरजोराने हसावेसे वाटले; पण त्यांच्या तावडीतून पूर्णपणे सुटणे आवश्यक आहे. कुठे गेल्यावर त्यांच्या नजरेआड होईन बरे ? माझ्यावर कोणी विश्वास ठेवणार नाही ... माझे बोलणे कोणी ऐकूनही घेणार नाही.

तो स्वत:शीच म्हणाला, " मी वेडा नाही. मला कुठला आजार नाही. "

अम्मुकुट्टी म्हणाली होती, " दादाचा आजार जाईल. "

माझी लाडकी अम्मुकुट्टी ! मला कोणलाच रोग नाही. माझ्या बोलण्यावर फक्त तिचाच विश्वास बसेल.

रस्त्यावरील माती ओली आहे. दंव पडल्याने झाली असेल. या रस्त्यावरून चालल्याला युगे झाली. बंद दुकाने, घाटाजवळील मशीद मागे टाकून तो पुढे चालला होता. स्मशान आणि वेताळ रहातो ते वडाचे झाड आज ओलांडले; पण त्याला मुळीच भीती वाटली नाही.

डोक्यावरील पिवळे आकाश हळुहळू स्वच्छ होत होते. सावलीच्या बाजूला प्रकाशाचा त्रास होतो. सडकेच्या काठावर उंच दगडाला टेकून वेलायुधन उभा राहिला. पूर्वेकडे गुलाल पसरला होता

"मी कुठं उभा आहे ? "

शेतामधील शाळा पाहिल्यावर आपण कुठे आहोत, ते कळते. शेताच्या पलीकडे एक मोठा तलाव आणि तलावाकाठी लहान मंदिर आहे. तिथे आईबरोबर दर महिन्याला येत असे, शाळेच्या पटांगणात एकदा नाटकही झाले होते.

शेतावर धुके पसरले आहे. वेलायुधन शेतात उतरला. खळ्ळ खळ्ळ आवाज करीत पुढे गेला. खांद्यावर नांगर घेऊन एक काळासा माणूस त्याच्याकडे येत होता. जवळ आल्यावर तो थांबला, " कोण ?"

वेलायुधनने उत्तर दिले नाही. काही क्षण गेले. तो एक पाऊल पुढे गेला ´तोच तो माणूस नांगर जमिनीवर टाकून शेताकडे उडया मारीत पळू लागला.

त्याची पर्वा न करता वेलायुधन पुढे चालू लागला, पहाटेचा उगवता प्रकाश त्याला प्रसन्न वाटला. दूरवर पसरलेल्या शेतात उभे राहून त्याने चारही बाजूंना पाहिले.

डोईवर पाण्याचा माठ घेऊन येणाऱ्या हरिजन स्त्रिया वेलायुधनला पाहून पळू लागल्या.

" वेडा... वेडा... "

मागे आरडाओरडा आणि धावपळ ऐकू आली. वेलायुधन जोराने चालू लागला. लोक त्याचा पाठलाग करीत आहेत ? वरच्या शेताकडे चढताना पायावर केतकीचा ओरखडा आला. तिथून तो अरुंद रस्त्यावर उतरला.

मागे कोलाहल होता पण समोर येऊन त्याला कोणी अडविले नाही. म्हणूनच तो शांत होता. त्याला पहाणारांनी आपला रस्ता बदलला होता. त्याला भीतीपेक्षा थकवा अधिक आला होता.

" मला वेडेपणाचा आजार नाही... मला वेडा म्हणू नका. "

मागच्या लोकांनी आरोळ्या ठोकल्या, " वेडा वेडा. "

बाजूचा एक खडक पकडून तो उभा राहिला.

किती थकला आहे. पुन्हा पुढे चालू लागला तेव्हा मागून एक धारदार आवाज आला, " अरे थांब. "

तिकडे पाहिल्यावर कळले की, एक धष्टपुष्ट गडी हाक मारीत आहे. त्याने डोक्यावर कपडा लपेटला आहे.

वेलायुधन धापा टाकीत म्हणाला, " मला वेडेपण नाही... मी वेडा नाही..."

" तुझं वेडेपण मी आत्ता दूर करतो ! "

त्याने लपवलेली छडी मारायला पुढे काढली तेव्हा वेलायुधनच्या हृदयात

आगडोंब भडकला. जमिनीवरून एक गोल दगड उचलून वेलायुधनने त्याला दाखवला आणि तो तिथेच उभा राहिला.

तो माणूस मागे सरकला.

वेलायुधन पुढे निघाला.

हा रस्ता टेकडीच्या पायथ्याशी पोचतो. मला वरच्या बाजूला गेले पाहिजे, असा विचार करून तो वेगाने पावले उचलू लागला, उंचवटयावर पोचल्यावर दूर एक वडाचे झाड दिसले

त्याच्याजवळ लाल दगडांनी बांधलेले लहानसे मंदिर आहे. ती जागा त्याच्या चांगल्या ओळखीची आहे, त्या मोठ्या झाडाखाली उतरले की काजूची बाग लागते, मग अरुंद रस्ता आणि नाला...

त्या नाल्याच्या काठावरील घरासमोर वनस्पती विखुरलेल्या आहेत.

माझ्या लाडक्या अम्मुकुट्टी मी वेडा नाही.

टकडीवर एकान्त आहे. फक्त एक काळा बैल तिथे चरत आहे.

गवतातून चालल्यामुळे पायावर आणि गवतावर पडलेले दवबिंदू झटकले गेले आहेत.

जवळपास कोणी माणूस नाही, म्हणून जरा आरामात बसून घेतो. त्या उंच झाडापर्यंत पोचता पोचता गुडघे फुटले. तो झाडाजवळच्या मोठ्या दगडावर जाऊन बसला.

वाऱ्याच्या शीतल स्पर्शाने त्याला झोप येऊ लागली होती. पाठ ठणकत होती. ओल्या गवतावर पालथा निजला. पाठीवर काहीतरी पडल्यामुळे एकदम जाग आली. उठून चारही बाजूंना पाहिले. काही अंतरावर चारपाच गुराखी उभे होते. ते निरखून पहात होते. तेवढ्यात एक ढेकूळ पुन्हा येऊन पडले. एक समोर पडला आणि दुसरा डोक्यावरून मागे गेला.

वेलायुधन भयभीत होऊन उभा राहिला, पायातली साखळी खणखणली. दगडावरून साखळी ओढीत भराभर खाली उतरला आणि अरुंद रस्त्यावरून त्याने मागे वळून पाहिले.

" आई ग ! " तो जोराने ओरडला. माथा पुसला तर दिसले, हात रक्ताने थबथबला आहे.

" पकडा,... अरे पकडा त्याला... तो येतोय.... अरे तिकडून दूर व्हा... "

शेतात उतरून पाहिले की लोक इतस्ततः पळत आहेत. रस्त्याच्या काठाशी एक

मुलगा जोराने ओरडला, " वेडा... वेडा... माणसांना सतावील... हटा, बाजूला व्हा... "

आवाज त्याचा पाठलाग करीत होते. वेलायुधन कुंपणाच्या बाजूने नाल्याजवळ पोचला. पुढे अरुंद रस्ता होता. दोन्ही काठांवर मोठे मोठे वृक्ष लागलेले आहेत. पुढे जमिनीवर वनस्पती विखुरल्या आहे.

लहानपणी या रस्त्यावर कितीदा खेळलो होतो ! लाल गेरूचा रंग दिलेल्या एका घरावर उड्डाण करणाऱ्या हनुमानाचे चित्र काढले आहे. ते पाहिल्यावर वेलायुधनचे हृदय तडफडले. " तिथे आहे... तिथे आहे माझी अम्मुकुट्टी, एकदा ती दिसली असती तर... अम्मुकुट्टी माझा आजार दूर झालाय. मला आता काही झालं नाही,... काही झालं नाही... "

तो पायऱ्या चढू लागला.

अंगणात बसलेला एक मुलगा नारळाच्या पानांचा चेंडू बनवीत होता. सारवलेल्या अंगणात सूर्याची कोवळी किरणे पसरली होती. वेलायुधनने अंगणात चारही बाजूंना पाहिले.

तो मुलगा पानांचा चेंडू घेऊन घाईघाईने घरात घुसला.

" अम्मुकुट्टी आहे इथं ?... अम्मुकुट्टी ? "

तो अंगणात चारपाच पावले आत आला. एक बाई दांडीवर ओले कपडे वाळत घालीत होती.

साखळी दुसऱ्यांदा खणखणली. तिने वळून पाहिले.

एक पळभर वेलायुधन सुन्न झाला. त्याने पाहिले, " अ... अम्मुकुट्टी... "

ती हातातले कपडे जमिनीवर टाकून खोलीत पळाली आणि जोराने ओरडली, " वेडा... वेडा... "

" मी आहे, अम्मुकुट्टी – मी वेडा नाही." – वेलायुधनला म्हणायचे होते; पण तोंडातून आवाज उमटला नाही. एकदा पुन्हा हाक मारली, " अम्मुकुट्टी... "

ती आत लपली होती.

आतून दुसरा आवाज आला, " वेडा... वेडा... "

" छडी दे, तू आत जा. "

" वेडा... वेडा... "

वेलायुधनला आता तिथे उभे रहावे ना, त्याने ओठांवर जीभ फिरवली तर तोंड

खारट झाले. डोक्यातून रक्त वहात होते. पायातली साखळी ओढीत वेलायुधन तिथून निघून गेला.

शरीर भयंकर थकले होते. तो थकव्याने कोसळणार होता; पण तुफानासारखा पुढे पळू लागला. कोलाहल त्याचा पाठलाग करीत होता...

...फाटक उघडून अंगणात प्रवेश केल्यावर पाहिले––मामाजी आणि दुसरी दोन माणसे तिथे बसली होती. साखळीचा आवाज ऐकताच ते दचकून उभे राहिले.

वेलायुधन भिंतीच्या आधाराने उभा होता. मामाजी काठी घेऊन अंगणात त्याच्याकडे येत असलेले त्याने पाहिले.

थकलेल्या डोळ्यांनी त्याने आपले शरीर न्याहाळले, तेव्हा कळले की शरीरावर कपडे नाहीत.

तो मोडल्या मनाने ओसरीवर कोसळला, मामाजी आणि दुसऱ्या दोन माणसांना आपल्याकडे येताना पाहून तो धापा टाकीत म्हणाला, " मी वेडा आहे... मला साखळीनं बांधा... "

# राधेचे पत्र

— माधवी कुट्टी

माझ्या जिवा,

वियोगाच्या आदल्या दिवशी माझं सांत्वन करताना तू म्हणाला होतास की सगळ्या पुरुषांत माझंच रूप पहा.

त्या रात्री तुझा निरोप घेऊन मी घरी आले तेव्हा पतिराज पलंगावर पडल्या पडल्या माझी प्रतीक्षा करीत होते. पोचताच म्हणाले, " तू फार उशीर केलास. मी विचार करीत होतो, तुला काही झालं तर नाही ?"

मला वाटलं सांगून टाकावं, " तारे ढगाआड लपल्यामुळं मी रस्ता विसरले होते." पण त्या दिवशी मी अशा तऱ्हेनं खोटं का बोलू शकले नाही ? भिजलेले कपडे बदलून मीही पलंगावर आडवी झाले. त्यांच्या आलिंगनात ऊब येण्याऐवजी मी वर्फासारखी थंड झाले. माझ्या गिरिधर गोपाला, तुझा वियोग झाल्यापासून मी वस्तुतः मेले होते, माझा जड देह फक्त शिल्लक राहिला होता.

त्यांनी विचारलं, " माझ्या चुंबनाची तुला घृणा वाटते का ?"

" नाही !" मी हळूच म्हटले, " नाही, नाही." लचके तोडणाऱ्या गिधाडाची प्रेताला कधी घृणा वाटते का ?

आपल्या पतीच्या आलिंगनात मी पुन्हा एकदा व्यभिचारिणी झाले. अन्न आणि वस्त्रासाठी कोणा परपुरुषाचा आश्रय घेणं व्यभिचारिणीचंच काम. माझ्यावर प्रेमाचा वर्षाव करणाऱ्या तुझ्या बाहुपाशात मी एकदम निर्मल होते, चारित्र्यवान होते. केवळ स्पर्शसुखासाठी मी तुझ्यावर प्रेम केलं नव्हतं. मला असा आभास व्हायचा की अस्थि-पेशींच्या या शरीरात माझा विशुद्ध विचार लपलाय, जो मला आजपर्यंत स्पष्ट कळला नाही; पण एवढा विश्वास अवश्य होता की माझी आशा पूर्ण होईल, माझं जीवन सफल होईल. तू माझ्यावर निजला होतास, तेव्हा आकाशासारख्या सुंदर नील वदनाखाली मी पूर्ण सुरक्षित होते. भूमीसारखा जंगली भुकेचा अनुभव घेत होते. दोन ध्रुवांना जोडणाऱ्या अक्षाप्रमाणे माझं नारीत्व थोडा वेळ पृथ्वीचं भ्रमणच

थांबवीत होते

तू म्हणाला होतास, "राधे ! तू दावाग्नी आहेस अन मी अरण्य आहे. आग लागून जाईल मला --"

पण पेटून विझलेल्या अग्नीवरील राखेसारखा तू माझ्यावर निजला होतास, "भौतिक आग !" मी स्वतःच म्हणाले, "जळून जा–जळून जा" तुझ्या नित्य अन शाश्वत शरीरातून नदीसारखी वहाणारी जीवनाची उष्ण अनुभूती मला मिळो.

तुझ्या व्यतिरिक्त मी भविष्याचा विचार करूच शकले नाही. प्रियकराचं दर्शन किती दुर्लभ आहे ! तुझा वियोग सोसून शुष्क आणि नीरस जग पहाण्याची इच्छा मला नव्हती. कारण, तुझ्या शरीराच्या सीमेपार माझं जगच नव्हतं. माझ्या शरीराचं उत्तरदायित्व मान्य करणारं छोटंसं जग !

आरंभी तू माझ्यासाठी प्रश्नस्वरूप होतास. तुझ्या प्रेमानं मी क्षीण झाले होते. तुझा आसरा मिळाल्यावर मी अनेकदा विचारलं होतं की 'तुझं माझ्यावर प्रेम नाही का ?' उत्तरादाखल तू मौन धारण करून राहिलास.

एके दिवशी रडत रडत मी पुन्हा प्रश्न विचारला होता, "कमीत कमी आता सांग तरी, तुझं माझ्यावर प्रेम नाही का ?"

तुझ्या आधरांनी माझ्या जांघेवर एक रक्तिम चिन्ह अंकित केलं, हेच तुझं उत्तर. ती तुझी प्रेममुद्रा होती ? कोण जाणे ? पण माझं मन शांत नव्हतं. सूर्यप्रकाशासारखा उजेड असला, तरी प्रेमाची भीती वाटते. प्रेमाच्या राज्यात मी आले, यशस्वी झाले पण मला विश्रांती मिळाली नाही. माझा अस्वस्थ आत्मा तुला संतुष्ट केल्यावर डोळ्यांतून प्रत्यक्ष प्रकट होऊ लागला.

"राधे ! तू जे सुखस्वप्न पहात आहेस, ते प्रेम दृढ आहे ?" तो विचारील, "हा संबंध शाश्वत आहे ?"

"तुझा देह अनेकदा आपलासा करून मी विजयी बनले. जो जो किल्ला मी सर केला, त्याच्या त्याच्या रक्षणासाठी मी निरंतर अविश्रान्त पहारा देत राहिले, मला हेही माहीत होतं की एखादं लौकिक क्रूर साहस तुला सोडून परपुरुषाकडं जायला भाग पाडील. म्हणूनच अनेकदा मी तुझ्या मिटलेल्या नेत्रांचं चुंबन घेतलं होतं अन तुझं मुख छातीशी लपवलं होतं. माझी ही दृढ अभिलाषा होती की, माझ्या व्यतिरिक्त तुझ्या डोळ्यांत दुसरं कुणी न भरो अन तुला माझ्याहून वेगळं विश्व नसो.

तुझी इच्छा करून मी रूपवती बनले. तुझ्या सुंदर हस्तस्पर्शानं माझं शरीर घासलेल्या पितळी भांड्यासारखं लखलखू लागलं. माझ्या सगळ्या अंगावर तुझी

बोटं किती प्रेमानं फिरायची ! एकदा मी चंदनाचं तेल लावून तुला भेटायला आले होते, पण तू संकेतस्थली आलाच नाहीस. तेव्हा मी यमुनेकाठी डोकं हातात धरून बसले की जगात किती वस्तू फुकट जातात ! चंदनाचं किती तेल आणि किती स्त्रियांचा आत्मसन्मान व्यर्थ ठरतो !

दुसऱ्या दिवशी मी तुला विचारलं, " तुझी दुसरी कुणी प्रेयसी आहे काय ?"

मत्सराची मेखला तोपर्यंत मला अपरिचित होती. म्हणूनच मी अलिप्ततेच्या अडखळत्या पावलांनीच चालू शकले. तू मला काहीच उत्तर दिलं नाहीस.

पण तू हसत विचारलंस, " राधे ! मी गेल्यावर दुसऱ्या कामी पुरुषांना तू भेटशील नं ?"

मी म्हणाले, " असं का ? तू रस्त्याचं शेवटचं टोक आहेस. त्यापलीकडे शून्य." मी तुझ्या कुशीत निजले होते. तू म्हणालास, " राधे, मी कुणाच्या शरीराला माझ्या चरणांचा स्पर्श केला, तर त्याचं कारण तूच असशील. कारण, तुझामाझा अनुराग इतरांनाही आकृष्ट करील. पुरुषाला प्राप्त होणाऱ्या सगळ्या स्त्रिया तुझंच रूप आहेत. सृष्टीच्या अंतापर्यंत पुरुषाचं शरीर तुझ्या देहक्षुधेचं निवासस्थान राहील."

तुझं वाक्य मला परतंत्र करतंय. म्हणूनच माझ्या अपरिपक्व मनानं तुझा आदेश ग्रहण केला. "हे मन आकर्षिक कर," असं मन म्हणालं, "हे शरीर वश करून घे."

मी नखक्षतांनी आणि दंतव्रणांनी तुला घायाळ केलं अन विजयानं गर्विष्ठ अहंकारी झाले. मग तुझं घायाळ शरीर मी दुःखित होऊन चुंबिलं अन अश्रूंनी धुतलं.

एके दिवशी प्रेमानं तुझे हात हातात घेत मी म्हणाले होते, " कृष्णा ! आपण एक घर केलं पाहिजे. आपल्या दोघांच एक घर. त्याच्या चारही बाजूंना काटेरी झाडांचं कुंपण. लाल पाकळ्यांची फुलं बहरतील. प्रातःकाळी गवाक्षांतून प्रवेश करणारे सूर्यकिरण तुझ्या श्यामल शरीरानं माझं विवस्त्र शरीर झाकतील. माझ्या जिवा, आपण असं घर करू नं ?"

" असच घर कुठं तरी असेल. तू त्या वेळी माझ्या मिठीत निजलेली असशील. त्या काटेरी फांद्यांत चांदणं अडकलेलं असेल. हे सगळं घडणार नाही, हे तुला कसं कळलं ?"

तेव्हा मी विचारलं, " मी मेल्यावरही त्या घरातली राधा काय कधी मरणार नाही ?"

तू म्हणालास, " तिथल्या राधेचा अन कृष्णाचा मृत्यू होणार नाही. ते स्वप्नरूप आहेत अन जगाच्या अंतापर्यंत जिवंत रहातील.

त्या दिवसापासून तुला बिलगून शांतपणे निजले होते. जाग आल्यावर पाहिलं, चांदणं आपल्या मार्गानं निघून गेलं. जंगलात अंधार भीतिदायक होता. हाताला हात सापडत नव्हता. नदीकिनारा, वृक्षराजीतून घरी जायचा रस्ता, सगळं अंधारात बुडालं होतं. वाट चुकल्यामुळं मीं खूप वेळ रडत राहिले.

हे सुंदर कृष्णा ! तू माझा आनंद होतास अन दुःखही. आनंद तर मला सोडून निघून गेला, तू दिलेली वेदना अजूनही आहे, ती मात्र पुरुषसुखाची अनुभूती देते. शंभर मैल दूर सुंदर रमणींच्या सहवासात मी क्रीडारत होते, तेव्हाही तू विलग नव्हतास. तुझं प्रेम त्या रमणींनाही आकर्षित करीत होतं. माझी अनंत आशाही शोभत होती.

आज सकाळी त्या रमणी मला पाहून आपापसांत म्हणत होत्या, " ती पहा राधा जात आहे ! कृष्णराजाची पुरातन प्रिया. तिच्या डोळयांकडे पाहू नका. त्यात तिचा आत्मा डोकावत आहे. सोडून दिलेल्या कोळ्याच्या जाळ्यासारखं दुःख तिच्या डोळ्यांतून ओसंडत आहे. "

तेव्हा यौवनाच्या गर्वानं उद्धत झालेली एक नवयुवती म्हणाली, " ती जिवंत कशाला राहिलीय, मरत का नाही ? "

ठीक आहे मी मरू शकले असते. तू कधी मला नदीकाठी शोधू नकोस. मग कधी मी तुला पाहू शकणार नाही !

तरीही तुझी राधा जिवंत आहे. कारण, माणसाचं आयुष्य फार दीर्घ आहे.

--- आपली

राधा

# लेखक परिचय

**१. पी. केशवदेव**

पी. केशवदेवांचा जन्म पखूर (केरळ) येथे १९०५ साली झाला. त्यांनी लहानपणीच शाळा सोडली. ते केरळमधील श्रमिक संघ आंदोलनाच्या संस्थापकांपैकी आहेत. ते साम्यवादी पक्षाचे सदस्य झाले होते, पण तो पक्ष त्यांनी लवकरच सोडला. राजकीय चळवळीत भाग घेतल्यामुळे त्यांना करावास घडलेला आहे. त्रिवेंद्रम येथील नभोवाणीकेंद्रावर ते काही काळ 'ड्रामा प्रोड्यूसर' होते.

पी. केशवदेव गेली चाळीस वर्षे सतत आर्थिक आणि सामाजिक अन्यायांविरुद्ध लेखणी चालवीत आले आहेत. वैयक्तिक किंवा कौटुंबिक समस्यांचे चित्रण करताना त्यांचे मानसशास्त्रीय अवधान कधी सुटत नाही. आपल्या मानसप्रजेला वाचकांची सहानुभूती मिळवून देण्यात ते विशेष कुशल आहेत.

आतापर्यंत त्यांच्या २२ कादंबऱ्या, १६ कथासंग्रह, ११ नाटके, ७ एकांकिकासंग्रह, १ निबंधसंग्रह आणि आत्मचरित्र प्रसिद्ध झाले आहे.

'शेजारी' नावाच्या कादंबरीला साहित्य अकादमी आणि सोव्हिएत लँड नेहरू पारितोषिक मिळाले आहे.

सध्या ते केरळ साहित्य अकादमीचे सदस्य आहेत.

**२. तकषी शिवशंकर पिल्लै**

तकषी शिवशंकर पिल्लै यांचा जन्म तकषी (केरळ) येथे १९१४ साली झाला. वकिलीची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर काही काळ वकिली केली. सध्या ते लेखन आणि शेती या उद्योगात व्यग्र आहेत. त्यांनी युरोप आणि अमेरिकेचा प्रवास केला आहे.

तकषी यांची गणना आधुनिक मल्याळम कथेच्या प्रवर्तकांत केली जाते. आपल्या सोप्या, सुस्पष्ट शैलीने त्यांनी सामान्य जनतेच्या आशा, अभिलाषा, निराशा आणि उद्विग्नता यांना वाचा फोडली आहे. पुरोगामी साहित्यिकांच्या चळवळीला मार्गदर्शन करण्याचे कठीण कार्य ते करीत आले आहेत. तथापि, वेगवेगळ्या कारणांनी ते आतापर्यंत कारावासात असत.

त्यांच्या आतापर्यंत २१ कादंबऱ्या, १८ कथासंग्रह, १ नाटक, १ प्रवासवर्णन आणि १ आत्मचरित्र प्रसिद्ध झाले आहे. साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळवणारी 'चेम्मीन' कादंबरी आणि इतरही कादंबऱ्या भारतीयच केवळ नव्हे तर परदेशी भाषांतही अनुवादित झाल्या आहेत. 'चेम्मी'चा अनुवाद 'युनेस्को'ने 'स्पॉन्सर' केला होता. तकषी जनरल कौन्सिल, केरळ साहित्य अकादमी; प्रबंधक समिती, साहित्य अकादमी, भारत सरकार सल्लागार समिती (मल्याळम) आणि नॅशनल बुक ट्रस्ट, इंडियाचे ते सदस्य आहेत.

### ३. वैक्कम मुहम्मद बषीर

वैक्कम मुहम्मद बषीर यांचा जन्म मध्य केरळातील वैक्कम येथे झाला. शालेय शिक्षणानंतर त्यांनी भारतभ्रमणासाठी घर सोडले. त्यांनी राजकीय चळवळीत आणि सत्याग्रहात स्वतःला झोकून दिले. त्यानंतर काही काळ ते पुस्तकभांडाराचे संचालन करीत असत.

आधुनिक मल्याळम कथाकारांत बषीर यांचे स्थान वैशिष्टयपूर्ण आहे. कारण, मुस्लीम समाजातील अंधश्रद्धेवर त्यांनी निस्संकोच प्रहार केले. जीवनातील दुःखपूर्ण अनुभवांविषयी वाचकांची सहानुभूती जागृत करून त्यांना अंतर्मुख करण्याचे कार्य त्यांच्या कथा करतात.

१९६९ साली बषीर साहित्य अकादमीचे 'फेलो' झाले होते.

आतापर्यंत त्यांचे १७ कथासंग्रह आणि ८ कादंबऱ्या प्रकाशित झाल्या आहेत. ते सिनेकथाकारही आहेत.

### ४. पोन्कुन्नम वर्की

पोन्कुन्नम वर्की यांचा जन्म पोन्कुन्नम (केरळ) गावातील एका कॅथॉलिक कुटुंबात १९१० साली झाला. ते मल्याळम भाषेतील 'विद्वान' ही परीक्षा उत्तीर्ण झाले. काही काळ अध्यापक होते, पण राजकीय मतभेदामुळे नोकरी सोडावी लागली. कॅथॉलिक धर्मातील अंधश्रद्धा आणि त्यांचा लाभ घेणारे पाद्री यांच्या विरुद्ध त्यांच्या प्रतिभेच्या उन्मेषांनी एवढे विलक्षण लोकजागृतीचे कार्य केले की त्यांना मल्याळम कथाकारांत अग्रपूजेचा मान मिळतो. त्यांनी स्वातंत्र्याच्या लढ्यात भाग घेतला. बराच काळ ते 'केरळ प्रगतिशील साहित्यकार समिती'चे सेक्रेटरी होते.

आतापर्यंत त्यांचे १८ कथासंग्रह, १५ नाटके, २ गद्यकाव्ये, आत्मचरित्राचा

पहिला भाग आणि तूलिक चित्रांचा पहिला भाग प्रसिद्ध झाला आहे. त्यांनी अनेक मल्याळम पटकथा लिहिल्या आहेत.

ते साहित्यप्रवर्तक सहकारी संघाचे संस्थापक सदस्य आहेत. या संस्थेचे ते काही वर्षे अध्यक्षही होते. सध्या केरळ साहित्य अकादमीचे प्रबंधक सदस्य आहेत.

### ५. एस. के. पोट्टेकाट

एस. के. पोट्टेकाट यांचा जन्म १९१३ साली कालिकत (केरळ) येथे झाला. मद्रास विद्यापीठातून इंटरची परीक्षा पास झाल्यावर तीन वर्षे शिक्षकाची नोकरी केली. १९४५ पर्यंत त्यांनी अनेक नोकऱ्या धरल्या आणि सोडल्या. नंतर स्वतःला लेखनाला वाहून घेतले. त्यांनी भारत, आफ्रिका, युरोप, आग्नेय आशिया आणि रशिया या देशांत प्रवास केला असून आपल्या व्यापक अनुभवांचा लाभ मल्याळम साहित्याला करून दिला आहे.

पोट्टेकाट यांचे नाव प्रसिद्ध आहे ते सामाजिक प्रचारापेक्षा कलेच्या सौंदर्यमय उपासनेला महत्त्व दिल्याबद्दल. त्यांची काव्यपूर्ण शैली वास्तवालाही स्वर्गीय आकर्षण प्राप्त करून देते. त्यांच्या कथांतील निसर्गाचे साहचर्य लक्षणीय असते.

पोट्टेकाट १९६२ ते ६७ साली उत्तर केरळ मतदार संघातून लोकसभेत स्वतंत्र सदस्य म्हणून निवडून गेले होते.

त्यांचे आतापर्यंत २ कवितासंग्रह, २ निबंधसंग्रह, २१ कथासंग्रह, १३ प्रवास-वर्णने आणि ६ कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत.

### ६. ललितांबिका अंतर्जनम

ललितांबिका अंतर्जनम यांचा जन्म कोट्टारकरा (केरळ) येथील नंबूतिरी ब्राह्मण कुटुंबात १९०७ साली झाला. बहुतेक शिक्षण घरीच झाले. मल्याळम आणि संस्कृतचे अध्ययन झाल्यावर त्यांनी कविता आणि कथा-लेखनाला आरंभ केला.

परंपरागत दडपणाखाली तडफडणाऱ्या नंबूतिरी स्त्रियांचे दुःख हा त्यांच्या लेख-नाचा प्रमुख विषय आहे. त्यांची शैली प्रासादिक, रसपूर्ण आणि काव्यमय आहे.

आतापर्यंत त्यांचे १३ कथासंग्रह, ७ कवितासंग्रह, २ बालसाहित्य आणि १ नाटक प्रकाशित झाले आहे.

### ७. कारूर नीलकंठ पिल्लै

कारूर नीलकंठ पिल्लै यांचा जन्म १८९८ साली झाला. उच्च शिक्षणानंतर त्यांनी

अध्यापकाचा पेशा पत्करला. सामान्य माणसाच्या जीवनातील सुखदुःखांचे प्रसंग चित्रित करीत असता ते आपली सत्यावरील श्रद्धा ढळू देत नाहीत की वाचकाला निराशेच्या गर्तेकडे लोटीत नाहीत. त्यांची शैली प्रासादिक आणि रसपूर्ण आहे.

ते साहित्यप्रवर्तक सहकारी संघाचे संस्थापक सेक्रेटरी होते. त्यांना केरळसाहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाला आहे.

त्यांचे २२ कथासंग्रह, २ कादंबऱ्या, ९ बालसाहित्य आणि १ एकांकिकासंग्रह प्रकाशित झाले आहेत.

## ८. पी. सी. कुट्टिकृष्णन 'उरूब'

पी. सी. कुट्टिकृष्णन 'उरूब' यांचा जन्म उत्तर मलबारमधील पोन्नानी या ठिकाणी १९१५ साली झाला. शालेय शिक्षणानंतर त्यांनी अनेक ठिकाणी नोकरी पत्करली. १९५० सालापासून ते आकाशवाणीच्या कालिकत केंद्रावर नोकरीला आहेत. सध्या ते 'प्रोडयूसर' या पदावर आहेत.

'उरूब' हे त्यांचे उपनाव. ग्रामीण जीवनाचे चित्रण करण्यात त्यांचा हातखंडा आहे. वायनाडच्या जवळपासच्या प्रगतिशील ग्रामीण मुसलमान जनतेचे जीवन प्रकाशात आले, ते यांच्या लेखणीमुळे.

त्यांच्या कथांतील विनोदगर्भ निवेदनशैली मल्याळम साहित्यात विशेष प्रसिद्ध आहे.

ते केरळ साहित्य अकादमीचे सदस्य होते. आतापर्यंत त्यांचे १५ कथासंग्रह, ८ कादंबऱ्या, ३ नाटके, २ बालसाहित्य आणि काही पटकथा प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांच्या काही कथा रजतपटावरही गाजल्या आहेत. त्यांच्या 'सुंदरिकलु सुंदरन्मारूम' या ग्रंथाला साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाला आहे.

## ९. वेट्टूर रामन नायर

वेट्टूर रामन नायर यांचा जन्म पालै (मध्य केरळ) येथे १९१९ साली झाला. त्यांनी राजकीय आणि सामाजिक चळवळीत नेहमीच उडी घेतली. मध्यम वर्गाच्या सुखदुःखांवर त्यांच्या कथा आधारित असतात. तथापि, लेखकवर्गाचे लक्ष त्यांच्याकडे पुरेसे गेले नाही, त्यांनी ग्रंथालय-चळवळीत सक्रिय भाग घेतला, साहित्यप्रवर्तक सहकरण संघाशी त्यांचा निकट संबंध आहे. सध्या ते संघाच्या विक्रीविभागाचे प्रबंधक आहेत. केरळ साहित्य अकादमीच्या प्रबंधक समितीचेही ते सदस्य आहेत.

आतापर्यंत त्यांचे १२ कथासंग्रह, १ कादंबरी, १ कवितासंग्रह, १ टीकात्मक ग्रंथ आणि १ प्रवासवर्णन प्रसिद्ध झाले आहे.

## १० नागवल्ली आर. एस. कुरूप

नागवल्ली आर. एस. कुरूप यांचा जन्म अंबलप्पुषा (मध्य केरळ) येथे १९१७ साली झाला. त्रावणकोर विद्यापीठातून बी. ए. आणि बी. टी. या पदव्या घेतल्यावर ते दशकापेक्षा अधिक काळ अध्यापन करीत होते. सध्या ते आकाशवाणीवर प्रोड्यूसर आहेत.

आतापर्यंत त्यांचे १३ कथासंग्रह, ५ कादंबऱ्या, ७ नाटके, २ निबंधसंग्रह आणि १ बालसाहित्य प्रकाशित झाले आहेत.

नागवल्ली यांच्या कथा अनुभूतीच्या गाढतेसाठी प्रसिद्ध आहेत. आपल्या कथांत त्यांनी विशेषतः कुट्टनाडच्या कष्टाळू शेतकऱ्यांचे जीवन समरसतेने रेखाटले आहे.

## ११. ई. एम. कोवूर

ई. एम. कोवूर यांचा जन्म तिरुवल्ला (केरळ) येथे १९०६ साली झाला. त्यांनी त्रिवेन्द्रमच्या आर्टस कॉलेज आणि लॉ कॉलेज यांतून पदवी मिळविली.

व्यवसायाला वकिलीने प्रारंभ करून ते सध्या डिस्ट्रिक्ट अँड सेशन्स जज म्हणून निवृत्त झाले आहेत. विनोदी लेखनशैलीसाठी ते प्रसिद्ध आहेत.

आतापर्यंत त्यांचे १५ कथासंग्रह, ४ कादंबऱ्या, ३ नाटके, ५ हास्यचित्रे प्रकाशित झाले आहेत.

## १२. पोंजिक्करा राफी

पोंजिक्करा राफी यांचा जन्म एर्नाकुलम जवळील पोंजिक्करा या ठिकाणी १९२४ साली झाला. त्यांनी जीवनाचा आरंभ कोचीन बंदरावर कामगार म्हणून केला. ते स्वतःच इंग्रजी शिकले. त्यांच्या कथांतून मजुरांच्या आणि अन्य सामान्य जनतेच्या सुखदुःखांचे आणि आशाआकांक्षांचे प्रत्ययकारी चित्रण आढळते. त्यांनी नॅशनल बुक स्टॉल आणि साहित्य प्रवर्तक सहकारी संघ, कोट्टयम येथेही काम केले आहे.

## १३. के. टी. मुहम्मद

के. टी. मुहम्मद यांचा जन्म मंचेरी (केरळ) येथे १९२७ साली झाला. प्राथमिक

शिक्षणानंतर नियमित शिक्षणाचा लाभ त्यांना झाला नाही. त्यांनी कालिकत पोस्टात पॅकर म्हणून जीवनाला प्रारंभ केला.

वृत्तपत्रांनी आयोजित केलेल्या अखिल भारतीय कथास्पर्धेत त्यांच्या 'डोळे' या कथेला प्रथम पारितोषिक मिळाले व ते प्रसिद्धीच्या शिखरावर जाऊन बसले. जीवनातील नाटयपूर्ण आणि संघर्षमय क्षण त्यांना विशेषत: आकृष्ट करतात.

आतापर्यंत त्यांची १२ नाटके, २ एकांकिकासंग्रह, १ कथासंग्रह आणि १ कादंबरी प्रसिद्ध झाली आहे.

ते संगीत नाटक अकादमीचे सदस्य होते.

## १४. नंदनार

नंदनार (पी. सी. गोपालन) यांचा जन्म १९२६ साली झाला. 'नंदनार' हे त्यांचे टोपण नाव. माध्यमिक शिक्षणानंतर वयाच्या सोळाव्या वर्षी ते सैन्यात दाखल झाले. बावीस वर्षे नोकरी केल्यानंतर निवृत्त होऊन सध्या ते फॅक्ट (आलुवा)च्या प्रकाशन विभागात नोकरीला आहेत.

सैनिकी जीवनाचे प्रत्ययकारी चित्रण नंदनार यांच्या कथांत आढळते. त्यांची मानसप्रजा वाचकांची सहानुभूती सहजच जागृत करते.

आतापर्यंत त्यांचे ८ कथासंग्रह, ७ कादंबऱ्या आणि १ एकांकिकासंग्रह प्रसिद्ध झाला आहे.

## १५. टी. पद्मनाभ

टी. पद्मनाभ यांचे वय सध्या ४१ वर्षांचे असून ते 'फॅक्ट'च्या कोचीन प्रोजेक्टचे एस्टेट मॅनेजर म्हणून काम पहात आहेत. कला आणि विधी यांतील पदवी मिळविल्यावर त्यांनी काही काळ वकिली केली.

त्यांची गणना प्रयोगशील कथाकारांत होते. मानसिक द्वंद्वाचे चित्रण हे त्यांचे वैशिष्टय आहे.

आतापर्यंत त्यांचे ५ कथासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत.

## १६. एम. टी. वासुदेवन नायर

एम. टी. वासुदेवन नायर यांचा जन्म पोन्नानी (केरळ) येथे १९३३ साली झाला. व्हिक्टोरिया कॉलेज, पालघाट येथून पदवी मिळवल्यावर एका टयुटोरियल कॉलेजात

काही वर्षे अध्यापन केले. १९५६ सालापासून ते 'मातृभूमी' साप्ताहिकाचे सह-संपादक आहेत.

एखाद्या शिल्पकृतीसारखी कातीव रचना आणि संगीतपूर्ण भाषाशैली यांनी नव्या कथाकारांत त्यांना मानाची जागा मिळवून दिली आहे. सूक्ष्म भावच्छटा नेमकी शब्दबद्ध करण्याचे त्यांचे कौशल्य अजोड आहे. कथा आणि कादंबरी या दोन्ही वाङ्मयप्रकारांत त्यांचा सारखाच गौरव होतो. आतापर्यंत त्यांचे १३ कथासंग्रह, ६ कादंबऱ्या, २ टीकात्मक संशोधन प्रबंध, १ प्रवासवर्णन आणि अनेक पटकथा प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांच्या कादंबऱ्या आणि कथा रुपेरी पडद्यावरही यशस्वी झाल्या आहेत.

## १७. माधवीकुट्टी

माधवीकुट्टी हे टोपण नाव साहित्य अकादमी पुरस्कार सन्मानित कवयित्री श्रीमती बालामणिअम्मा यांची कन्या कमला यांचे आहे. त्यांचा जन्म १९३२ साली झाला. त्यांचे ८ कथासंग्रह मल्याळम भाषेत आणि २ कवितासंग्रह इंग्रजीत प्रकाशित झाले आहेत.

त्यांच्या कथांत आधुनिक जीवनातील अंतर्विरोध आणि कठोर वास्तव यांचे यथार्थ चित्रण आढळते. स्त्री-पुरुष संबंधांतील मानसिक गुंतागुंत हाही त्यांचा प्रिय विषय आहे.

Printed at Decent Offset Naraina Indl. Area Ph. I, New Delhi-110 028.